सुलभ राष्ट्रीय ग्रंथमाला : पुष्प २२ वें

# जिवंत व्रतोत्सव

लेखक

आचार्य काका कालेलकर

अनुवादक

भाऊ धर्माधिकारी



द्वितीयावृत्ति : १९४७ ]

[ मूल्य ३।।। रुपये

# आमचें प्रकाशन

---

* हीं पुस्तकें मुंबई, मध्यप्रांत व वऱ्हाड यांतील सरकारी विद्याखात्यांनीं शाळांतील वाचनालयांकरितां व बक्षिसांकरितां मंजूर केलीं आहेत.

# वाचकमित्र —

लोकशिक्षक काकासाहेबांचें हें पुस्तक आपल्या हातीं देतांना मला आनंद होत आहे. काकासाहेब कसलेले आणि अनुभवी समाजशिक्षक आहेत. निर्जीव समाजजीवन चैतन्यमय करण्याचे प्रसंग शोधून काढून, त्यांची व्यवस्थित आंखणी करून, त्यांच्याविषयीं अुद्बोधक माहिती देअून संस्थांच्या व विद्यापीठांच्या द्वारा ते प्रकट व्हावेत म्हणून '**जिवंत व्रतोत्सवा**'च्या रूपानें त्यांनीं ते आपल्या हातीं दिले आहेत.

मूळ गुजराती पुस्तकाचा हा अनुवाद आहे. तथापि स्वतः काकासाहेबांनीं या मराठी आवृत्तीकरितां म्हणून लिहिलेलीं कांहीं स्वतंत्र प्रकरणेंहि यांत आहेत. यांत महाराष्ट्रीय संतांवरील सर्व प्रकरणें त्यांनींच स्वतः लिहिलीं आहेत. काकासाहेबांचा अनुभव दांडगा, अध्ययन विस्तृत, रसिकता मार्मिक- तीं सर्व या पुस्तकांत प्रकट झालीं आहेत.

मूळची गोडी जशीच्या तशी अनुवादांत अुतरणें कठीण आहे. तथापि काकासाहेबांच्या गुजराती भाषेची बैठक मराठीच असल्यासारखी आहे. त्यामुळें तसा प्रयत्न करणें थोडें सोपें झालें आहे अेवढेंच.

मूळ गुजराती पुस्तकाला नसलेली 'टीपा व स्पष्टीकरणा'ची पुस्ती या पुस्तकाला जोडली आहे, ती आपणांला अुपयुक्त वाटेल.

हें पुस्तक मराठींत आणण्यासाठीं केलेली पहिली निवड आचार्य श्री. भागवत यांची आहे. हें पुस्तक शिक्षणक्षेत्रांत अुत्कृष्ट कार्य बजावील असें त्यांना दिसून आलें आणि म्हणून त्यांनीं तें मराठींत आणविण्याचा प्रयत्न केला. निरनिराळ्या शिक्षणसंस्थांतील शिक्षकांनीं आणि विद्यार्थ्यांनीं यांत दिशासूचन केल्याप्रमाणें व्रतें आणि अुत्सव साजरे करण्याचा अुपक्रम केला, तर अुभयतांनाहि सामाजिक शिक्षणाचें अेक मोठें द्वार खुलें झाल्याचा व प्राणदायी वातावरण निर्माण झाल्याचा अनुभव येअील अशी आचार्यांना व मला खात्री वाटते, आणि तसें झालें तरच या पुस्तकाचें सार्थक होअील.

सर्वांचा नम्र,
**भाअू धर्माधिकारी**

# दुसऱ्या आवृत्तीसंबंधीं

या पुस्तकाची दुसरी आवृत्ति काढण्याचा योग येत आहे, यावरून मराठी वाचकवर्गाला हें पुस्तक आवडलें व अुपयुक्त वाटलें असें समजण्यास हरकत नाहीं.

या आवृत्तींत पूर्वींचीं सर्व प्रकरणें ठेवलीं आहेत. आणि शिवाय 'स्वातंत्र्यदिन '( २६ जानेवारी ), ' सौ. कस्तुरबादिन ' ( महाशिवरात्र ) ' क्रांति-दिन '( ९ ऑगस्ट ) हीं प्रकरणें नवीं घातलीं आहेत. या मराठी आवृत्तीसाठींच स्वतः काकासाहेबांनीं तीं लिहिलीं आहेत. ' चरखाद्वादशी'चा कार्यक्रम व प्रकरण पूर्वींचें ( अुपप्रकरण २ रें ) काढून टाकून नवीन घातलें आहे, ' धनत्रयोदशी'वर पूर्वींच्या आवृत्तींत लेख नव्हता तो या आवृत्तींत काकासाहेबांनीं घातला आहे.

स्वतंत्र भारतांतील नागरिकांना आणि शिक्षणसंस्थांना–शिक्षकांना आणि विद्यार्थ्यांना–या पुस्तकाचा आतां अधिक लाभ घेतां येअील, अशी अपेक्षा आहे.

—प्रकाशक

# अनुक्रमाणिका

# ग्रंथकर्त्याचें निवेदन

म्हातारीं माणसें मरतात, नवीं जन्माला येतात. गेलेल्या लोकांसाठीं आपण हळहळतों आणि नव्यांचें स्वागत करतों; आणि नव्या लोकांना जुन्या लोकांची थोडी माहिती देऊन त्यांचेसंबंधानें आदर अुत्पन्न करून जरी ते शरीरानें गेले असले, तरी स्मरणरूपी शरीरांत त्यांना जिवंत ठेवण्याचा प्रयत्न करतों. अेका शरीरांत राहण्यापेक्षां अनेकांच्या हृदयांत राहण्याचें काव्य अेकपरी अधिक महत्त्वाचें आणि कल्पनेमध्यें अधिक सुखदायी असतें.

व्यक्तीपेक्षां कुटुंब दीर्घजीवी असतें. कुटुंबधर्माची जीवनशक्ति फारच चिवट असते. समाजांची किंवा प्रजांची जीवनशक्ति त्यांच्या संस्कृतीमधून व्यक्त होत असते. या जीवनशक्तीची ज्या निरनिराळ्या संस्थांतून आपण अुपासना करतों त्यापैकींच सण, अुत्सव, अुपवास आणि व्रतें ही अेक संस्था आहे. सणदेखील नवीन जन्माला येतात, लहानांचे मोठे होतात, राज्यें मिळवितात, साम्राज्यवैभव भोगतात आणि शेवटीं लयाला जातात. या सणांची माहिती होणें, त्यांचा बोध समजून घेणें अुपयोगी आहेच, पण त्यांचें काव्य अनुभवणें हें त्याहूनहि अधिक महत्त्वाचें आहे. सण जुने झाले म्हणजे त्यांच्यामध्यें अेक प्रकारचें सौम्य सौंदर्य आणि प्रसन्न गांभीर्य येत असतें. अशा सणांचा पौष्टिक आहार ज्या जीवनाला मिळाला आहे तें जीवन सुदृढ आणि समृद्ध व्हावयाचेंच. आपला समाज अशा संस्कृतिसात्त्विक आहारावरच आजवर जगलेला आहे. पण आतां तो आहार कमी होअूं लागला आहे. हा तुटवडा भरून काढण्यासाठीं जो कांहीं नवीन पुरुषार्थ समाजाकडून झाला पाहिजे तो सध्यां होत नाहीं. समाजहितचिंतकांना याबद्दल वाअीट वाटलेलें दिसतें. पण दुःख करण्यानें श्राद्ध होत नसतें. आणि लोकांवर चिडल्यानें ते जागे होत नसतात. यापेक्षां स्मरणांजलि अर्पण करून श्राद्ध करणें हेंच समाजाला हितकर आणि स्वतःला संतोषदायक आहे.

गुजरातमध्यें असतांना ज्या निरनिराळ्या संस्थांतून मीं माझें जीवन अनुभवलें तेथें त्या त्या प्रसंगीं आपल्या अनेक सणांचें स्मरण घडलें; तेंच स्मरण त्या त्या काळच्या वृत्तीप्रमाणें लिहून काढलें. पुढें त्यांचा संग्रह करणें मित्रमंडळींना योग्य वाटल्यावरून 'जिवता तहेवारो' या नांवाखालीं त्यांना अेकत्र आणण्यांत आलें. हीं सर्व स्मरणें अेकाच पंक्तीला बसविण्याच्या अुद्देशानें केलीं नव्हतीं. यांचा सुरंगी हार होअील अशी कल्पनाहि नव्हती. यामुळें हा संग्रह कोणत्याहि योजने–कल्पनेबरहुकूम झालेला नाहीं.

याचे मराठी करण्यांत यानंतर दुसरी अडचण अुत्पन्न झाली आहे. गुजरातला अुद्देशून लिहिलेली ही श्रद्धांजलि महाराष्ट्रीय कानांना कशी लागेल हा अेक मोठा प्रश्न आहे हें सर्व लिखाण स्वतःला अुद्देशून लिहिलेलें नाहीं, पण लेखक दुसऱ्या कोणाशीं तरी अगदीं आत्मीयतेनें बोलत आहे आणि आपण बाजूला बसून अैकत आहों, असें वाचकांना वाटल्यास त्यांचा विरस होअीलच पण लेखकालाहि चमत्कारिक वाटेल.

ही अडचण ओळखून अनुवादकर्त्यांनी आपलेकडून हें सर्व सुधारून घेण्याचा विचार केला, पण हें काम सोपें नाहीं हें त्यांच्या लक्षांत सहज आलें. मींच तें काम करावें अशी त्यांची अुत्कट अिच्छा होती; पण तेंहि शक्य झालें नाहीं.

प्रत्येक प्रांतांतील संस्कृति निराळी असें मानणारे लोक आजकाल बरेच वाढूं लागले आहेत. पण प्रांताप्रांतांमधील भेदाचीं तत्त्वें परिमित, अुथळ आणि अल्पजीवी आहेत, आणि या क्षणजीवी तरंगांच्या खालीं अैक्याचा—समानतेचा विशाल गंभीर आणि सनातन महासागर भरलेला आहे, हें सत्य भेदातीत बुद्धीला सहज पटेल. गुजरातसाठीं जें लिहिलें तेंच थोडासा फरक करून महाराष्ट्रासाठीं बोलावें लागणार. तेव्हां सरळ भाषांतर करून आहे तसेंच महाराष्ट्र—वाचकां पुढें हें सर्व लिखाण ठेवल्यास विशेषशी हानि होणार नाहीं असें वाटल्यावरून तसेंच करण्याचा येथें प्रयत्न केला आहे.

आणि माझ्या मतें यांत अेक मोठा फायदाहि आहे. अेक स्वजन शेजारच्या प्रांतांतील लोकांशीं आत्मीयतेनें काय बोलतो, कसा बोलतो आणि तेथील लोकांशीं तद्रूप कसा होतो याचें दृश्य महाराष्ट्रीयांपुढें व्यक्त झाल्यास तें निरुपयोगी ठरणार नाहीं. अेकच गोष्ट निरनिराळ्या दृष्टिकोनांनीं पाहाण्याची संवय असणें हें कोणत्याहि समाजाला फायदेशीर आणि अुद्बोधक असतें. तेव्हां सगळी ठेवण बदलण्याचें श्रमहि वांचवावेत आणि परोक्ष शैलीचें दर्शनहि वाचकांना घडवावें हेंच अुचित आहे, असें येथें ठरविलें आहे. वाचकांना हें कितपत रुचतें हें पहावयाचें आहे.

येथवर ठरल्यानंतर निदान मला जास्त कांहीं करावें लागणार नाहीं अशी आशा होती. पण भाअूंनीं आपल्या आग्रहानें मजकडून या मराठी आवृत्तीसाठीं थोडेंसें लिहून घेतलेंच. त्यामुळें मधूनमधून वाचकांना आपली तटस्थता नष्ट झाल्याची जाणीव होअून थोडेसें आश्चर्य वाटेल. जें होणार असेल तें होवो; भाअूंनीं वाचकांच्या हातीं ‘ जिवंत व्रतोत्सवां ’चा हा गुच्छ दिला आहे, आणि त्यामुळें मला बरें वाटलें आहे. वाचकांना जर तो आवडला तर आम्ही दोघे कृतार्थता अनुभवूं.

पुणें, ३–११–३९ — दत्तात्रेय बाळकृष्ण कालेलकर

# जिवंत व्रतोत्सव :: १

लांडग्यासारखें खावें, मांजरासारख्या जांभया द्याव्या, आणि अजगरासारखें पडून राहावें हें सणांचें मुख्य लक्षण कांहीं कांहीं ठिकाणीं होअून बसलें आहे. अेक सण म्हणजे तीन दिवस बिघाड अेवढें तरी निदान ठरलेलेच. अशा अवस्थेंतून सणांना वांचविणें हे आपलें मुख्य काम आहे.

‘ सण काढूनच टाकले तर कसें ? ’ या दृष्टीचाहि आम्ही विचार केला. रोजची आवश्यक आणि स्फूर्तिदायक प्रवृत्ति शिथिल करायची, आपल्या परिस्थितीला नेहमीं झेपणार नाहींत असे कपडे घालायचे, निरनिराळ्या प्रकारचीं मिष्टान्नें अुडवून अिंद्रियांना लोलुपतेची चटक लावायची, आणि पत्ते, बुद्धिबळें, सोंगट्या वगैरे निरर्थक बैठ्या खेळांत वेळेचा नाश करण्याला अेकमेकांना अुत्तेजन द्यायचें, अेवढाच जर सणांचा अर्थ असला तर सण काढून टाकावेत हेंच योग्य आहे.

पण आमच्या कल्पनेप्रमाणें सणांना आणि अुत्सवांना जीवनांत अेक विशिष्ट आणि महत्त्वाचें स्थान आहे. सणांच्या द्वाराच आपल्याला संस्कृतीचीं कित्येक अंगें चांगल्या प्रकारे टिकविनां येनात आणि वाढवितां येतात; विशिष्ट प्रसंग आणि त्यांचें महत्त्व स्मरणांत ठेवनां येतें; अृतूंच्या फेरफाराप्रमाणें जीवनांत विशिष्ट फेरफार यथाकाली संकल्पपूर्वक सुरू करतां येतात; आणि सामाजिक जीवनांत परस्परसहकाराबरोबरच अैक्य आणतां येतें.

कित्येक वृत्ती मनुष्यहृदयाला अितक्या स्वाभाविक आहेत कीं, त्यांचें जर नियमन केलें नाहीं तर, त्या अमर्याद वाढून सगळ्या जीवनाचा नाश करून टाकतात. त्यांना सरळ विरोध करणें किंवा त्यांचा बाह्य निरोध करणें शक्य किंवा सुरक्षित असत नाहीं. दडपणानें त्या विकृत बनतात आणि मग लपून छपून अथवा अस्वाभाविक रीतीनें त्या स्वतःची तृप्ति करून घ्यायला पाहतात. यांपैकीं कित्येक वृत्ती मर्यादित स्वरूपांत क्षम्य असतात, अितकेंच नव्हे तर हितकराहि असतात. त्यांचा नाश करण्याअैवजीं त्यांना विशुद्ध बनवून जर उन्नतीच्या मार्गाकडे वळविण्यांत आलें तर संपूर्ण शिक्षणाच्या बाबतींत त्यांची पुष्कळच मदत होते. हें कार्य कांहीं

कांहीं वेळां सामाजिक रीत्याच चांगलें साधतें. याला सणांची मदत पुष्कळ होण्या-जोगी आहे.

सणांच्यासंबंधीं आम्ही असा दृष्टिबिंदु ठेवला आहे कीं, सणाचा दिवस हा वाटेल तसा वेळ अुधळण्याचा किंवा आराम घेण्याचा सुटीचा दिवस नाहीं. सण आणि अुत्सव हें शिक्षणाचें अेक नैमित्तिक आणि मोलाचें अंग आहे. आणि याच कारणानें, जुनी रूढी शक्य तितकी लक्षांत ठेवून सणांचे कार्यक्रम असे सुचविले आहेत कीं, त्या त्या दिवसाचें वैशिष्ट्य तर त्यांतून लक्षांत यावें आणि तरीसुद्धां प्रत्येक कार्यक्रम अितका कांहीं सुटसुटीत राहावा कीं, सणामुळें आलेला थकवा अुतरण्यासाठीं सणानंतरचा दिवस नासावा लागू नये, अेक रात्रीं जागरण तर दुसऱ्या दिवशीं दिवानिद्रा अशी अनिष्ट स्थिति येअू नये.

कित्येक सणच असे आहेत कीं, जे महत्वाचे असूनहि त्यांच्यामागें विशेष कार्यक्रम असणार नाहीं. यांना आम्ही अर्ध्या दिवसाचे सण गणले आहेत.

याच्यापुढें जाअून आम्ही कित्येक प्रसंग असे कल्पिले आहेत कीं, जे आज अुत्सव म्हणून किंवा सण म्हणून धरतां येणार नाहींत आणि तरीहि त्यांचें महत्त्व विद्यार्थ्यांच्या दृष्टीपुढें दरसाल ठेवावेंच लागेल. अशा प्रसंगांकरितां दिवसाच्या कार्यक्रमांमधून एखादा तास दिला तरी पुरे होण्याजोगा आहे. ४० मिनिटें, पाअूण तास किंवा तास—जसा समयविभाग असेल त्याप्रमाणें एक विभाग अशा प्रसंगासाठीं राखून ठेवावा, अशी आमची शिफारस आहे.

उत्साही संस्थांना दरवर्षी नवे नवे सण शोधून काढतां येतील आणि सणांच्या मोठ्या संख्येंत अधिक भर टाकतां येअील. पण त्यांत जर योग्य संयम नसेल तर अल्पजीवि क्षुल्लक सण वाढण्याचा संभव जास्त. कित्येक सणांनीं जीवनधर्माला अनुसरून विस्मृतीच्या पोटांत लुप्त व्हावें आणि नव्या सणांना जागा करून द्यावी. सण हे मानवजीवनासाठीं आहेत. मानवजीवनाबरोबर त्यांच्यांतहि परिवर्तन झालेंच पाहिजे.

कांहीं सण महावृक्षाप्रमाणें शेंकडो वा हजारों वर्षे जगतात, कांहीं सामान्य वन-स्पतीप्रमाणें थोडा वेळ जगून आपलें कार्य समाप्त करतात. पुराणप्रिय सनातन धर्मांत जे कित्येक दीर्घजीवी सण आहेत त्यांची आमच्या योजनेंत कदर केलेली दिसून येअील. कित्येक नवीन सणांची त्यांत भर घातली आहे. तीहि संयमपूर्वकच घातलेली आहे.

या नव्या भरण्यांतील एकूण एक सण दीर्घजीवी व्हावे अशी कांहीं आमची अपेक्षा नाहीं, अिच्छाहि नाहीं. आज त्यांचें महत्त्व आहे. हें महत्त्व जोंवर कायम आहे तोंवर हे सण टिकले तरी पुष्कळ झालें.

'श्रीविष्णूच्या आज्ञेनें प्रवर्तित असलेल्या' अितिहासक्रमाच्या योगानें हिंदुस्थानांत जगांतील बहुतेक सर्व धर्म गोळा झाले आहेत. हिंदमातेच्या अमृतदृष्टीमुळें हे सर्व धर्म एका कुटुंबांतील मुलांप्रमाणें या ठिकाणीं राहातील. हा कुटुंबधर्म स्वीकारून प्रत्येक धर्मानें अितर धर्मांतील सणांना आपल्या मताप्रमाणें स्वतःच्या जीवनांत स्थान देणें योग्य आहे. हें तत्त्व लक्षांत ठेवून कित्येक सण आम्ही आमच्या योजनेंत घातले आहेत. या तत्त्वाचा स्वीकार केला असूनसुद्धां आम्ही त्याचा नियम असा बनविलेला नाहीं. आपल्या जीवनांत जी जी वस्तु स्वाभाविकपणें दाखल होअील तिचें विचारपूर्वक स्वागत करणें हाच क्रम योग्य होअील. आमच्या या योजनेंत पारशी सणांना स्थान दिलें गेलेलें नाहीं याचें कारण त्या धर्माचें महत्त्व आम्ही कमी समजतों हें नाहीं तर आपल्या संस्थांमध्यें अजून असा सहकार वाढलेला नाहीं हेंच त्याचें कारण आहे.

आम्हांला निश्चितपणें असें वाटतें कीं, हिंदुस्थानांत वसलेल्या सर्व धर्मांमागें हिंद-मातेचा अेक सर्वसंग्राहक विश्वप्रेमी प्रेमधर्म आहे. या उदार आणि सर्वसहिष्णु धर्माचा प्रभाव जसजसा प्रत्येक धर्मावर पडेल तसतसा सर्व धर्मांमध्यें कौटुंबिक भाव वाढत जाअील. आमच्या योजनेंत या गोष्टीचा स्वीकार केला गेला आहे. तरी भविष्य-काळाच्या प्रवाहानें अमुक मार्गानेंच वाहावें असा मुद्दाम प्रयत्न आम्ही केलेला नाहीं. जुन्यांतील जें कांहीं सार्वभौम धर्मतत्त्वाला विरोधी किंवा देशकालाला अनुचित वाटलें तें आम्हीं सोडून दिलें आहे. जें निर्दोष असूनहि क्षीणसत्त्व आणि कालग्रस्त झालें आहे तें कृत्रिमपणें टिकविण्याचा आम्ही प्रयत्न केला नाहीं. आमच्या योजनेंत भविष्यकाळा-साठीं करावयाच्या तयारीची दृष्टि आहे. तरी त्या दृष्टीची विशेष छाप योजनेवर पडूं दिलेली नाहीं, कारण भविष्यकाळाच्या दिशेचें निश्चित दर्शन होण्यास अजून थोडा अवकाश आहे. वर्तमानकाळांतील आकांक्षा आणि भूतकाळाकडून मिळालेला रोख वारसा याचाच आम्ही विशेष विचार केला आहे.

निरुत्साही, निर्जीव शाळाखात्याची शिक्षणप्रथा सर्वत्र फैलावली असल्यामुळें शाळां-मार्फत सण साजरे करण्याचें काम होणें अवघड आहे असें जाणून, आणि निरुद्यमी समाजाच्या उद्यमी होण्याच्या प्रयत्नांत सण बाधारूप न व्हावेत एवढ्यासाठीं प्रत्येक

सणाचा कार्यक्रम मुद्दामच हलका ठेवला आहे. तरी त्यांत उत्पादनात्मक अथवा विधायक शिक्षणाच्या विकासाचें बीजारोपण स्पष्ट आहे. शाळांतील जीवन जसजसें समृद्ध होत जाईल तसतसा या बीजाचा विकास आपोआप होईल—पण हें सारें शिक्षकाच्या प्रतिभेवर आणि विद्यार्थ्यांच्या अुत्साहावरच अवलंबून आहे.

कांही नाहीं तरी निदान शिक्षक, विद्यार्थी आणि आअीबाप यांना प्रसन्न परिस्थितींत अेकत्र आणण्याचे प्रसंग या दृष्टीनें तरी हे सण महत्त्वाचे आहेतच. समाज-सुस्थितीचें चिंतन करणारे चतुर शिक्षक अशा अुत्सवांचा लाभ घेअून अनायासें सामाजिक प्रश्नांविषयी लोकमानस जागृत करतील आणि लोकशिक्षणाला लहानसा प्रारंभ करतील. दुसऱ्या बाजूनें, वाढत जाणाऱ्या आपल्या सामाजिक जीवनांत एकाच दिशेनें पण भिन्न भिन्न मार्गांनीं जाणाऱ्या संस्थांचा परस्पर-परिचय वाढविण्याच्या कामांतहि आपले अुत्सव मोठी कामगिरी बजावूं शकतील. स्नेहसंमेलनापेक्षां समाज-मान्य अशा अुत्सवांचे प्रसंग असा परिचय नम्रतेच्या वातावरणांत अधिक स्वाभाविक रीतीनें करून देतात. तात्पर्य विद्यार्थ्यांचा सर्वांगीण विकास व्हावा, हृदयांतील अुच्च भावना विशिष्ट रीतीनें खुलाव्या आणि तद्द्वारा मुख्यतः धार्मिक आणि सामाजिक शिक्षणाचें आह्लाददायक साधन अुपलब्ध व्हावें या अुद्देशानें हें सणांचें टांचण आम्हीं तयार केलें आहे.

मुख्य अुद्देश आपली आश्रमाची शाळा आणि आपलें आश्रमजीवन अेवढ्या-पुरताच आहे. तरी अितर ठिकाणच्या अनेक शाळांनाहि यांतून थोडेंफार सूचन मिळेल अशी आशा मनांत नाहीं असें नाहीं.

## आवश्यक वाचन : : २

पुढें सणांचीं जीं टांचणें दिलीं आहेत तीं कांहीं सणांचें निबंधन ( code ) तयार करण्यासाठीं म्हणून नाहींत, तर सणांच्या पाठीमागें असलेलें परंपरागत रहस्य आणि त्यांत घालतां येतील अशीं नवीं तत्त्वें यांकडे वाढत्या पिढीचें लक्ष जावें म्हणून तीं दिलीं आहेत. याच्या संबंधीं वाचण्यालायक साहित्य पुष्कळ आहे आणि नाहीं. सणांचेंच महत्त्व प्रतिपादन करणारीं अशीं पुस्तकें मराठींत फारतर दोन तीनच असतील. श्री. ऋग्वेदी यांचें ' आर्यांच्या सणांचा अितिहास ' हें अेकच पुस्तक या क्षेत्राला व्यापणारें आहे. श्री. ऋग्वेदी यांनीं नव्या माहितीची भर घालून त्याची नवी आवृत्तीहि काढली आहे. सणांचें स्वतंत्र संशोधन करून, त्याचप्रमाणें हिंदी भाषांत या विषयावर जीं दोन पुस्तकें लिहिलीं गेलीं आहेत त्यांचा अुपयोग करून घेअून त्याची नवी आवृत्ति काढण्याची आवश्यकता आहे. ' Hindu Fasts and Feasts ' या सारखीं पुस्तकेंहि नवी दृष्टि देअू शकतील. प्रजाजीवनाचा आणि समाजशास्त्राचा अभ्यास करणारे कित्येक गोरे लोक वेगवेगळ्या सणांवर कांहींसें सहानुभूतिपूर्वक आणि कांहींशी गंमत किंवा कौतुक म्हणून लिहितात, त्यांतूनहि तुलनेला अुपयोगी असा कांहीं भाग सांपडतो. बंगाली लेखकांनींहि अिंग्रजींत तशींच बंगालींत पुष्कळ माहिती गोळा केली आहे. जामनगरचे मणिशंकर शास्त्री यांचें पुस्तक अगदीं जुन्या धर्तीचें आहे, पण शोधकाला त्यांतूनहि कांहीं मिळवितां येअील. याच धर्तीचें मराठी पुस्तक 'आर्योत्सव प्रकाश' ( खानापूर ) म्हणून आहे. लोकमान्य टिळकांच्या ' ओरायन' (मृगशीर्ष ) वरून सुचलेल्या होळीच्या सणावरील 'शिमगा' नांवाचें एक मराठी पुस्तक आहे. तें संशोधनाच्या दृष्टीनें मोलाचें आहे म्हणतात. सुरतेला भाअी काजी यांनी सणांवर एक व्याख्यान दिलें होतें तेंही पाहून टाकण्यासारखें आहे. आपल्या देशाच्या वातावरणाचें ऋतुचक्र, व्यापारी आणि प्रवासी यांच्या गरजा आणि खेडूतांचें जीवन या सर्वांचा आपल्या सणांशीं संबंध आहे. परदेशी लोकांत हिंदू जीवनाचा पुष्कळ खोल अभ्यास भगिनी निवेदिता यांनीं केला आहे. त्यांचे कित्येक लेखहि बहुमोल सूचना देतील.

आपलें प्राचीन राष्ट्रीय जीवन मुख्यत्वें रामायण, महाभारत आणि भागवत यांमध्यें प्रतिबिंबित झालें आहे. देवी–उपासकाचें वैशिष्ट्य देवीभागवतांमध्यें मिळण्याजोगे

आहे. या महाग्रंथांचा परिचय सर्वांनाच असला पाहिजे. किशोरलालभाअींच्या अवतारमालेंतील 'राम अने कृष्ण,' 'बुद्ध अने महावीर,' आणि 'सहजानंद' हीं पुस्तकें मुलांना अुपयुक्त आहेत. 'सीताहरण' हेंहि मुलांना उपयोगी आहे. कृष्ण-चरित्रासाठीं चिंतामणराव वैद्यांचें 'कृष्णचरित्र' आणि बंकिमबाबूंचें 'कृष्णचरित्र' हीं दोन विशेष उपयोगी आहेत.

याच विषयासंबंधीं जैन साहित्य मुद्दाम पाहण्यासारखें आहे. 'त्रिशष्टिशलाकापुरुष या ग्रंथांत तीर्थंकरांची माहिती तर मिळेलच. पण जसजसा जैन आगमांचा सुलभ सारानुवाद आजच्या वाचक वर्गापुढें रुजूं होत जाअील तसतशी जैन जीवनपद्धति अधिकाधिक समजूं लागेल. जैन हा केवळ संप्रदाय नाहीं, ती विश्वव्यापी होअूं शकेल अशी जीवन दृष्टि आहे हें समजून येअील तेव्हा त्याची छाप सर्वच सणांवर कमीजास्त पडेल.

आपल्या येथें बौद्ध साहित्य थोडें फार तयार झालें आहे. 'बुद्धलीलासारसंग्रह' 'धम्मपद', 'सुत्तनिपात', 'बौद्ध संघाचा परिचय,' 'समाधिमार्ग' 'बुद्ध, धर्म आणि संघ,' 'बौद्धपर्व' अितक्या पुस्तकांच्या द्वारा तो धर्म आणि त्याचा 'अवेरा' चा महान संदेश यांचें वातावरण सहज लक्षांत येअील. शांतिदेवाचार्यांच्या 'बोधिचर्यावतारा' मधून अुत्तम श्लोक धर्मानंदजींनीं आपल्याला काढून दिले आहेत ते पारायण करण्यालायक आहेत. जगांतील सुशिक्षित प्रजेला बौद्धधर्म आणि ब्राह्मधर्म (प्रार्थना-समाज) जास्तींत जास्त आकर्षण करतो, कारण त्यांत समजुतींचें आणि वादांचें साम्राज्य कमींत कमी आहे. सदाचाराची साधना यात्राच यांत मुख्य भाग आहे.

सदाचाराच्या साधनेवर अुग्रपणें जोर देणारा एक मोठा धर्म म्हणजे इस्लाम होय. तरी त्यांत मनुष्यस्वभावावर फार अंकुश ठेवला जाअूं नये ही दृष्टि मुद्दाम ठेवलेली आहे. अिस्लामधर्मांत सण फार नाहींत. दोन ओीद तर अिब्राहिमाच्या धर्मांतून घेतलेल्या आहेत. मोहरम हा अैतिहासिक सण म्हणतां येअील. महंमद पैगंबरांच्या वफात (मृत्यु) चा दिवस कांहीं कांहीं ठिकाणीं साजरा केला जातो. अिस्लामी संस्कृतींत विलासितेला कितपत अवकाश आहे हा प्रश्न स्वतंत्र आहे. अिस्लामीधर्म मात्र संयम-धर्मी (puritan) च आहे. कुराने शरीफ, महंमदसाहेबांचें जीवनचरित्र आणि हदिस अेवढें वाचल्यानें त्या संस्कृतीची कल्पना येअूं शकेल. अमीरअलींचें 'sprit of-Islam' आणि आर्नोल्डचें 'Preaching of Islam' हीं दोन पुस्तकें शिक्षकांनीं वाचलेलीं असलीं पाहिजेत. 'कसस-अल्-अंबिया' चें मराठी भाषांतर जर कोणी

करून देअील तर मोठी सोय होअील. अिस्लामधर्मांत प्रतिष्ठा पावलेल्या पैगंबरांचीं चरित्रें त्यांत आपल्याला मिळतील. ‘ मुस्लीम महात्माओ ’ हें गुजराती पुस्तक गुजरातेंत बरेंच लोकप्रिय झालें आहे.

खिस्ती धर्मासाठीं ‘ नवा करार ’, डीन फेरारचें ‘ खिस्ताचें चरित्र ’, केम्पीसचें ‘ अिमिटेशन ऑफ क्राअिस्ट ’, आणि बनियनचें ‘ पिल्ग्रिम्स् प्रोग्रेस ’, अेवढें तर वाचलेलेंच असलें पाहिजे. सेंट पॉल, अिग्नेशियस लॉयला, मार्टिन ल्यूथर यांच्याविषयीं मराठींत लिहिण्याची आवश्यकता आहे. टॉल्स्टॉयनी वाचन परिच्छेदांत मुलांसाठीं अीशूचें चरित्र लिहून ठेवलें आहे तेंहि चांगलें आहे.

शिक्षकांना ब्राह्मसमाज, आर्यसमाज, प्रार्थनासमाज, रामकृष्ण मिशन यांसारख्या व्यापक आणि आधुनिक धर्मसंस्करणाच्या प्रयोगांविषयीं पुष्कळ ज्ञान असलें पाहिजे, कारण भविष्यकाळाची दिशा यांतूनच आपल्याला मिळत आली आहे. थिऑसफीनेंहि अनेक धर्मांच्या अभ्यासाविषयींचें अुपयुक्त साहित्य प्रसिद्ध केलें आहे. आचार्य श्री आनंदशंकर ध्रुव यांनीं तयार केलेलीं गुजराती पुस्तकें वाचण्याजोगीं आहेत. विशेषतः त्यांच्या ‘ धर्मवर्णन ’ या पुस्तकांत सर्व धर्मांविषयीं थोडी थोडी माहिती दिलेली आहे.

शीख धर्माची कामगिरी बहुमोल आहे. त्या धर्माविषयी अधिक ज्ञान करून घेणें इष्ट आहे. मगनभाई देसाई यांच्या ‘ सुखमनी ’ आणि ‘ जपजी ’ या गुजराती पुस्तकांच्या प्रस्तावना बऱ्याच अुपयोगी पडतील. ज्ञानदेव, नामदेव, एकनाथ, तुकाराम, रामदास यांच्यासारख्या महाराष्ट्रीय संतांविषयीं जें मुबलक साहित्य आहे त्याविषयीं महाराष्ट्रीयांना सांगण्याची आवश्यकता नाहीं. तुलसीदास, सूरदास आणि कबीर यांच्यासंबधीं माहिती हिंदीतून घ्यावी.

हिंदुस्तानांतील मुख्य मुख्य संत–कवींचें अध्ययन प्रत्येक संस्थेंत नेहमीं चाललें पाहिजे.

सणांची योजना तयार करणें हें अेकप्रकारें हिंदुस्तानच्या विविधरंगी संपूर्ण संस्कृतीचें प्रतिबिंब पाडण्यासारखें आहे, आणि तेंहि साहित्याच्या द्वारा नव्हे तर जीवनांतील अुत्सवांच्या द्वारा हें मोठें काम प्रस्तुत कार्यक्षेत्राच्या बाहेरचें आहे आणि हें काम अेकसमयावच्छेदानें होण्यापेक्षां हळूहळू तें वाढावें हेच ठीक आहे.

व्यापक दृष्टीनें अभ्यास करावयाचा असेल तर आवश्यक वाचनाची यादी हवी तेवढी वाढवितां येअील. फ्रेझरचें Golden Bough हें पुस्तक नास्तिक दृष्टीनें

लिहिलें असलें तरी अत्यंत वाचनीय आहे. मूळ ग्रंथाचे १०।१२ भाग वाचण्याची जरूर नाहीं. ग्रंथकारानेंच केलेला सारांशाचा एक भाग मिळतो तो पुरेसा आहे.

प्रस्तुत पुस्तकांत प्रत्येक सणाच्या म्हणजे व्रताच्या व अुत्सवाच्या शेवटीं तो कसा साजरा करावा याविषयीं त्रोटक सूचना दिल्या आहेत. पण महाराष्ट्रांत हे सण अगदीं परवां परवांपर्यंत मोठ्या अुत्साहानें आणि भक्तीनें साजरे केले जात असत; त्यांचीं वर्णनें अजून कोणी लिहून ठेवलेलीं नाहींत. सीमोल्लंघन, काकडआरती, गोपाळकाला, गोप, गौर, वसंतपूजा, वेदपाठ, गोकुळपूजा, हदगा, वटसावित्री, दिंड्या, श्रावणी, समुद्रपूजा गणपतिअुत्सव, खंडेपूजा, भाअुबीज, तिळगुळ, शिमगा वगैरे सणांचे जे लोकप्रिय प्रकार आपल्याकडे चालत असत ते आजहि कोठें कोठें दिसून येतात. यांचीं सविस्तर वर्णनें व त्यांतून घेण्याजोगें काय आहे, काढण्याजोगें काय आहे, आणि त्यांत वाढविण्याजोगें काय आहे या सर्व बाबींचा अूहापोह करणारे लेख अथवा ग्रंथ तयार झाले पाहिजेत. राष्ट्रीय जीवन अगदीं मुनक्यासारखें नीरस, अथवा असंस्कारी, विलासी लोकांप्रमाणें अुथळ केल्यानें समाजाची प्रगति होणार नाहीं. आपल्या देशांतील शिख, जैन, बौद्धप्रभृती हिंदू, आणि मुसलमान, यहुदी, ख्रिस्ती आदि अन्य धर्मी या सर्वांचा घरोबा जोंपर्यंत वाढला नाहीं तोंपर्यंत राष्ट्रीय अैक्य साधावयाचें नाहीं आणि भारतीय संस्कृति सिद्ध होणार नाहीं. दंगे आणि मारामाऱ्या करून व अेकमेकांच्या अुखाळ्यापाखाळ्या काढून अथवा राजकीय करारनाम्याच्या द्वारा देवाणघेवाण करून हा प्रश्न कायमचा सुटणारा नव्हे. एकमेकांला ओळखून, एकमेकांविषयीं प्रेमादर अुत्पन्न करून ओतप्रोत झाल्यानेंच—अर्थात् व्यापक आणि अुदार, खरी आणि खोल धार्मिकता वाढविल्यानेंच–तें सिद्ध होणार आहे.

या दृष्टीनें यहुदी आणि ख्रिस्ती, शिया आणि सुन्नी, पार्शी आणि सीरियन वगैरे सर्व समाजांच्या व्रतांचा आणि अुत्सवांचा प्रत्यक्ष प्रकार पाहिला पाहिजे आणि शक्य असेल तेंवर त्यांत भाग घेतला पाहिजे.

# अुत्सवांतील अुपवास : : ३

एक मित्र विचारतात, “ जन्माष्टमी किंवा रामनवमी यासारखे दिवस वास्तविक अुत्सवाचे आणि आनंदाचे मानले पाहिजेत त्या दिवशीं मिष्टान्न–भोजन करण्या-अैवजीं अुपवास करण्याची चाल कां बरें पडली ? ”

पृच्छक असें समजून असलेले दिसतात कीं अुपवास हा दुःखाच्या किंवा शोकाच्या प्रसंगींच करावा. तसेंच असेल तर हटीभक्त लोक मोठमोठ्या जेवणावळी कां बरें घालतात ? अुपवास हा कांहीं दुःखाचें किंवा संकटाचें चिह्न नाहीं. चित्तामध्यें ग्लानि असेल, दुःखाचें दडपण पडलें असेल त्यावेळीं आरोग्याच्या नियमाप्रमाणें न खाणें हें योग्य आहे. हृदयांतील स्वाभाविक भावनासुद्धां तशीच सूचना देते. आरोग्याच्या नियमाच्या दृष्टीनें पाहिलें तर जेव्हां मनाला हर्ष झाला असेल त्यावेळीं देखील आपण कांहींहि खातां कामा नये; मिष्टान्नभोजन किंवा अतिआहार हा तर करतांच कामा नये. ज्याप्रमाणें दुःखाच्या वेळीं पचनशक्ति कमी झालेली असते त्याचप्रमाणें आनंदाच्या अुत्तेजनांत आणि क्षोभाच्या वेळीं सुद्धां ती तशीच असते. म्हणून कोणत्याहि कारणानें जरी चित्ताचें स्वास्थ्य नाहींसें झालें असलें तरी त्यावेळीं अनशन किंवा अल्पाहार हाच विहित आहे.

जन्माष्टमीसारख्या उत्सवप्रसंगीं आपण जो अुपवास करतों त्याचा अुद्देश याहूनाहि विशेष आहे. जन्माष्टमी हा कृष्णजन्माचा अुत्सव नाहीं, तर ती अेक साधना आहे. द्वापरयुगांत किंवा त्रेतायुगांत कृष्णजन्म झाला असेल, त्याचं आपल्यास काय होय ? जेव्हां आपल्या हृदयांत कृष्णजन्म होअील तेव्हांच आपण धन्य होअूं. लहानपणीं आम्हांला असे अुपवास करण्याचा अधिकार नव्हता; अुपवास हा घरांतल्या प्रौढ माणसांनीच करायचा. आम्ही पडलों मुलें. आम्ही दोन वेळां यथास्थित जेवावें आणि पूजेंत मदत करावी, अेवढाच आमचा धर्म. मोठीं माणसें अुपवास करतात हें बघून आम्हांलाहि अुपवास करायचा आहे असा आम्ही हट्ट धरून बसावें, आणि रडून रडून, आणि क्वचितप्रसंगीं मार खाअून, न खाण्याचा हक्क मिळवावा, अशी स्थिति होती. कारण अुपवास ही एक साधना आहे.

आंघोळ केल्यानें जसा पवित्रतेचा अनुभव येतो, मौन धारण केल्यानें जसें आध्यात्मिक वातावरण मिळवितां येतें, तसेंच अुपवासानें अंतर्मुख होतां येतें आणि सात्विक वृत्तीहि विकसित करतां येते. भोजन करतांच प्रत्येक वेळीं शरीरांत एक प्रकारची जडता येते. ती टाळून शरीराचा बोजा हलका करण्यानें ध्यानाला किंवा अुपासनेला अनुकूल परिस्थिति मिळते. अुपनयन, अुपनिषद, अुपवास आणि अुपासना हे चारी शब्द सारखेच आहेत. अुपवासाचा मूळ अर्थ अनशन नव्हे, जसा ब्रह्मचर्याचा मूळ अर्थ वीर्यरक्षण नव्हे. ब्रह्मचर्य म्हणजे अीश्वरप्राप्त्यर्थ वेदशास्त्रांच्या अध्ययनांत तन्मय होणें. वीर्यरक्षणानेंच हें शक्य होत असल्यामुळें त्यालाच विशेषेंकरून ब्रह्मचर्य हें नांव दिलें गेलें. अुपवास या शब्दांतहि असाच भाव आहे. अुप–वास म्हणजे परमात्म्याच्या जवळ राहणें, त्याचें सान्निध्य अनुभवणें. अिंद्रियांची तृप्ति करण्यामागें जो लागतो तो अीश्वराचें नाम घेत असला तरी अीश्वराचें सान्निध्य अनुभवूं शकत नाहीं. आहार तेवढा त्यागून अथवा शरीरप्रकृतीचें साम्य संभाळण्यासाठी अल्प प्रमाणांत सात्त्विक आहार करून परमात्म्याचें स्मरण करणें, त्याची भक्ति करणें, त्याचा निकटवास अनुभवणें, याचें नांव अुपवास; हीच अुपासना. अुपासकाला आहार कमी करण्यावांचून गत्यंतर नाहीं, असें पाहून धार्मिक साधनेंप्रीत्यर्थ केलेल्या अन्नत्यागालाच अुपवास म्हणूं लागले. कृष्णजन्माच्या किंवा रामजन्माच्या दिवशीं ही आध्यात्मिकता, ही साधक वृत्ति अंगीं आणण्यासाठीं अुपवास ठेवलेला आहे.

# जयन्ती : : ४

अीश्वराच्या सृष्टींत असंख्य माणसें जन्माला येतात. त्या सर्वांची जयंती कांहीं आपण साजरी करीत नाहीं. ज्यांच्या जीवनरहस्याचा आपल्या हृदयांत पुण्यपावन अुदय झाला असेल त्यांचीच जयंती आपण साजरी करतों. कोटयवधि लोकांचें जीवन हें आला दिवस कसावसा पुरा करण्यांतच संपतें. माणसाला त्रास देणारे—त्याला पामर बनविणारे जे असंख्य शत्रू आहेत त्यांच्याविरुद्ध झुंजणाऱ्यांची संख्या अत्यंत अल्प असते. शत्रूला कांहींहि करून टाळावें, किंवा नामर्दपणा पत्करून त्याच्याशीं

चालढकल करावी आणि युद्धाच्या त्रासांतून सुटावें हाच सामान्य लोकांचा जीवन-क्रम असतो. पण या रीतीनें कांहीं शत्रू टळत नाहीं. तो आपला पुनः पुनः समोर येअून अुभा राहातोच आणि प्रत्येक वेळीं चालढकलीची किंमत अधिकाधिक मागत जातो. ही किंमत फक्त पैशाचीच नसते; ही किंमत प्राणाची, तेजस्वितेची आणि स्वतंत्रतेची असते. प्रत्येक मनुष्यांत या तिन्ही गोष्टींची अिच्छा तर असतेच; पण डोक्याची किंमत देअून आपली तेजस्विता आणि स्वतंत्रता संभाळण्याचा किंवा मिळविण्याचा प्राण ज्याच्यांत असतो त्यालाच वीर पुरुष म्हणायचें—त्याचीच आपण जयंती साजरी करतों. जयंतीचा अर्थच मुळीं हा आहे.

पण जयंती आपण साजरी करतों तरी कशासाठीं ?

दोन प्रकारचे लोक जयंत्या साजऱ्या करतात. ज्यांना वीर पुरुषांकडून प्रेरणा मिळविण्याची अिच्छा असते ते, आणि वीर पुरुषांकडून रक्षण अिच्छितात ते. अेक वर्ग वीरांचा अुपासक असतो आणि दुसरा वर्ग त्यांचा आश्रित असतो. प्रथम वर्गाला वीरांच्या वीरकर्मांनीं प्रेरणा, अुत्साह आणि प्राण मिळतो, वीरांची अुपासना करून ते स्वतः वीर बनतात. दुसरा वर्ग पामर असतो. हे लोक नेहमीं भयभीत अवस्थेंत राहातात, ते त्यागाला भितात. ते म्हणतात, 'या भयभीत दशेंतून जो आम्हांला सोडवील, आम्हांला आश्वासन देअील, तोच आमचा नाथ. त्याचाच आम्ही जयजयकार करूं त्याची प्रसन्नता मिळवूं आणि त्याच्या वीरकर्मांच्या आश्रयाखालीं सुखानें राहूं. तो जर गेला तर अीश्वरापाशीं प्रार्थना करूं कीं हे प्रभो ! आम्हांला दुसरा कोणी नाथ दे, आम्हांला सनाथ कर.'

अनाथ लोक जेव्हां वीरपूजा करतात तेव्हां त्या पूजपाठीमागें अशाच प्रकारची याचनावृत्ति असते.

मांजरीचें पिलूं म्हणतें; 'माझे आअी, ये आणि मला अुचलून सुरक्षित स्थळीं ठेव.' पक्ष्यांचीं पिलें म्हणतात, 'आमची आअी आम्हांला आपली पंखं फडफडायची कशीं तें दाखवील तर आम्हीहि तसेंच करूं.' अशा प्रकारें जयंत्या दोन तऱ्हांनीं साजऱ्या होत असतात.

हिंदुस्थानांत जोंवर अनाथवृत्तीनें जयंत्या चालू राहतील तोंवर देशांत पुरुषार्थ येणार नाहीं. जशी श्रद्धा तसें फळ. 'विश्वंभर प्रभूच्या मनांत जेव्हां दया स्फुरेल तेव्हां तो आपल्याला अलौकिक पुरुष देअील आणि आपण त्याला पिळून काढून—त्याला

बाजारांत विकून–सुखी होऊं; अशा वृत्तींमध्यें जितकी सुरक्षितता आहे तितकेंच अध:पतनहि आहे. पुण्यपुरुषांचें बलिदान करून अिहलोकींचें वैभव प्राप्त करून घेण्यांत पुण्यक्षय आहे, प्राणक्षय आहे. पुण्यपुरुषाच्या बलिदानानें जेव्हां आपल्यांतहि बलिदानाची वृत्ति जागी होअील तेव्हांच आपण त्या पुरुषाची खरी अुपासना केली असें म्हणतां येईल आणि तेव्हांच आपला खरा अुत्कर्ष होअील.

आज आपण अीश्वराजवळ ' आम्ही आपले पामरच राहाणार. तूं अवतार धारण करून आमचें दुःख निवारण कर ' अशी प्रार्थना करतां कामा नये. आपण परमात्म्याला सांगितलें पाहिजे कीं, ' हे जनार्दना, तुझा अवतार आमच्या हृदयांत होवो. वानरांचे सुद्धां वीरपुरुष करून सोडणारे अवतार आम्हांला पाहिजेत; जो आम्हांला स्वावलंबन शिकवील असा अवतार आम्हांला पाहिजे; कारण स्वावलंबनांतच आमचा कायमचा अुद्धार आहे; परावलंबनांतच आमची अवनति आहे, आमचा अपमान आहे. '

स्वावलंबनाच्या वीरवृत्तीनें महात्म्यांची जयंती साजरी करण्यानें आपण त्यांच्या महात्म्याचे अधिकारी बनत असतों. परावलंबी वैश्यवृत्तीनें जयंती साजरी करण्यानें आपण महात्म्यांकडून कींव करून घेण्याला पात्र होत असतों.

आणि कींव म्हणजे तिरस्काराचें सज्जन स्वरूप.

## सणांची यादी : : ५

**चैत्र**

| | | | |
|---|---|---|---|
| शुद्ध | १ | ध्वजारोपण | अेक समय |
| ,, | ९ | रामनवमी | १ दिवस |
| ,, | १३ | महावीर जयंती | १ ,, |
| ,, | १५ | हनुमान जयंती | १ |

**वैशाख**

| | | | | |
|---|---|---|---|---|
| शुद्ध | ३ | अक्षय्यतृतीया | -॥- | ,, |
| ,, | १० | शंकरजयंती | -॥- | ,, |
| ,, | १५ | बोधिजयंती | -॥- | ,, |
| वद्य | १३ | चोखामेळा पुण्यतिथि | १ | ,, |

**ज्येष्ठ**

| | | | | |
|---|---|---|---|---|
| शुद्ध | १५ | वटसावित्री | १ | ,, |

**आषाढ**

| | | | | |
|---|---|---|---|---|
| शुद्ध | ११ | महा अेकादशी | ॥- | ,, |
| ,, | १५ | गुरूपूर्णिमा | १ | ,, |
| वद्य | १३ | जनाबाई पुण्यतिथि | १ | ,, |

**श्रावण**

| | | | | |
|---|---|---|---|---|
| शुद्ध | ५ | नागपंचमी | १ | ,, |
| सर्व सोमवार | | श्रावणी सोमवार | -॥- | ,, |
| शुद्ध | १५ | श्रावण पूर्णिमा | १ | ,, |
| वद्य | ८ | गोकुळाष्टमी | १ | ,, |

**भाद्रपद**

| | | | | |
|---|---|---|---|---|
| शुद्ध | ४ | गणेशचतुर्थी | १ | दिवस |
| ,, | ५ | ॠषिपंचमी आणि | १ | ,, |
| | | पजुसण ( पर्युषण ) | १ | ,, |

**आश्विन**

| | | | | |
|---|---|---|---|---|
| शुद्ध | ८-९ | सरस्वतीपूजन | २ | ,, |
| ,, | १० | दसरा | १ | ,, |
| ,, | १५ | शरत्पूर्णिमा | १ | ,, |
| वद्य | १३ | धनत्रयोदशी | १ | ,, |
| ,, | १४ | नरकचतुर्दशी | १ | ,, |
| ,, | ३० | दिवाळी | १ | ,, |

**कार्तिक**

| | | | |
|---|---|---|---|
| शुद्ध | १ | विक्रमवर्षारंभ | १ ,, |
| ,, | २ | भाअूबीज | १ ,, |
| ,, | ११ | महा अेकादशी | -॥- ,, |
| वद्य | १३ | ज्ञानेश्वर पुण्यतिथि | १ ,, |

**मार्गशीर्ष**

| | | | |
|---|---|---|---|
| शुद्ध | ११ | गीताजयंती | -॥- ,, |
| ,, | १५ | दत्तजयंती | १ ,, |

**पौष** मकरसंक्रांति १ ,,

**माघ**

| | | | |
|---|---|---|---|
| शुद्ध | ५ | वसंतपंचमी | १ ,, |
| ,, | ८ | भीष्माष्टमी | अेक समय-विभाग |
| वद्य | ९ | रामदास पुण्यतिथि | १ दिवस |
| ,, | १४ | महाशिवरात्र | -॥- ,, |

**फाल्गुन**

| | | | |
|---|---|---|---|
| शुद्ध | १५ | होळी | १ दिवस |
| वद्य | २ | तुकाराम पुण्यतिथि | अेक समय |
| ,, | ३ | शिवाजी जयंती | १ दिवस |
| ,, | ६ | अेकनाथ पुण्यतिथि | १ ,, |

**अन्यधर्मीय सण**

| | | | |
|---|---|---|---|
| डिसें. | २५ | नाताळ | १ ,, |
| | | मोहरम | १ ,, |
| | | बक्र–अीद | १ ,, |

**राष्ट्रीय अुत्सव**

| | | | |
|---|---|---|---|
| जानेवारी | २६ | स्वातंत्र्यदिन | १ ,, |
| फेब्रुवारी | १९ | गोखले पुण्यतिथि | अेक समय |

| | | |
|---|---|---|
| फेब्रुवारी २२ | सौ. कस्तुरबा पुण्यतिथि | ,, ,, |
| ( अथवा महाशिवरात्र ) | | ,, ,, |
| एप्रिल ६ ते १३ | राष्ट्रीय सप्ताह | ८ दिवस |
| जून १६ | देशबंधु पुण्यतिथि | अेक समय |
| जून ३० | दादाभाअी नवरोजी पुण्यतिथि | ,, ,, |
| ऑगस्ट १ | टिळक पुण्यतिथि | १ दिवस |
| ऑगस्ट ९ | क्रांतिदिन | १ ,, |
| ऑक्टोबर २ | चरखाद्वादशी | १ दिवस |
| ( अथवा भाद्रपद वद्य १२ ) ( गांधीजयंती ) | | ,, ,, |

# गुढीपाडवा : : ६

## ( चैत्र शुद्ध १ )

### अेक पत्र

"...आज आमचा वर्षारंभ आहे. वानरराज वालीच्या त्रासांतून दक्षिणेकडील भूमि सुटली या आनंदांत घरोघर अुत्सव करून लोकांनीं त्यावेळी गुढ्या अुभ्या केल्या होत्या, तो रिवाज अजूनहि चालू आहे. वर्षारंभाला गुढी पाडवा म्हणतात.

वर्षारंभीं नवा संकल्प करायचा असतो, कारण वर्षारंभाचा दिवस म्हणजे एक प्रकारची सकाळ आहे. सकाळ झाली म्हणजे जसा थकवा नाहींसा होऊन नवी स्फूर्ति येते तसें वर्षारंभाच्या दिवशीं नवें पान अुघडायचें असतें. आतांपर्यंत झालें तें झालें, आजपासून नवीन आरंभ, असें स्वतःशीं समजून मनुष्य नवा संकल्प करतो. नवा संकल्प करण्यापूर्वी सिंहावलोकन करणें हाहि अेक माणसाचा स्वभाव आहे. सिंहावलोकन म्हणजे सिंहाप्रमाणें मागें वळून पाहाणें. असें म्हणतात कीं, अुड्या टाकीत धांवतां धांवतां सिंह मध्यें मध्यें थबकून आपण कोठपर्यंत आलों, किती रस्ता कापला, याचें निरीक्षण करतो. प्रगतिशील मनुष्याला सुद्धां ही संवय अुपयोगाची आहे. आतांपर्यंत

आपण काय काय संकल्प केले, त्यांतले किती पार पडले, किती संकल्पांत दुरुस्त्या कराव्या लागल्या, कोणते संकल्प काढून टाकाव लागले, याचें सार काढल्या-नंतरच नवा संकल्प करतां येतो. प्रथम प्रथम अुत्साहाच्या भरांत येअून मनुष्य आपला संकल्प बोलून टाकतो. जणूं बोलले म्हणजे केलेंच. बोलण्यानें बुद्धि दृढ होते, स्नेही मंडळींच्या सहानुभूतीनें संकल्प पार पाडण्याकरितां अनुकूलता उत्पन्न होते; बोलतांना विचार स्पष्ट होतात; कार्यांत अेकाग्रता येते; आणि स्वतःच्या बाबतींत स्वतःच्या वाणीचेंच बंधन अुत्पन्न होतें. पण बोलण्यांत संयम पाहिजे, नाहींपेक्षां जुने लोक म्हणतात तसें—बोलण्यानें तोंडची वाफ दवडली जाते, लक्ष शिथिल होतें, आणि संकल्पाचें आयुष्य वाणीपुरतेंच राहातें. अशासारखा विचार करूनच पुढील श्लोक रचला गेला आहे:

**मनसा चिंतितं कार्यं वचसा न प्रकाशयेत् ।**
**अन्यलक्षितकार्यस्य यतः सिद्धिर्न जायते ॥**

[ मनानें चिंतिलेलें कार्य बोलून प्रकट करूं नये. कारण दुसऱ्यांचें लक्ष असलेल्या कार्याला कधीं सिद्धि मिळत नाहीं. ]

हा श्लोक रचणारा कोणी व्यवहारी मनुष्य असला पाहिजे. त्याचा युक्तिवाद आपल्या गळीं अुतरला नाहीं तरी त्याची शिकवण मात्र बरोबर आहे.

वर्षारंभाच्या दिवशीं संकल्पसिद्ध्यर्थ अेखादें व्रत घ्यायचें असतें. अुत्तम व्रत म्हणजे चित्तरक्षाव्रत.

**चित्तरक्षव्रतं मुक्त्वा बहुभिः किं मम व्रतैः**

[ अेक चित्तरक्षाव्रत सोडून अितर भाराभर व्रतें घेअून मला काय करायचीं ? ]

तरी या महाव्रताच्या मदतीला म्हणून अेक लहानसें व्रत आपणां सर्वांना घेतां येअील. आणि त्यासाठीं वर्षारंभाची किंवा अितर मुहूर्ताची आवश्यकताहि नाहीं.

आपला अनुभव जर आपण तपासून पाहिला तर असें दिसून येअील कीं पुष्कळ वेळां आहे त्याच्या अुलट वस्तुस्थिति डोक्यांत घेअून आपण आजूबाजूच्या लोकांना अन्याय केलेला असतो. जितक्या वेळां आपण केलेला अन्याय आपल्या लक्षांत येअील तितक्या वेळां जर आपण दुसऱ्या माणसाची माफी मागायला गेलों तर

गैरसमज करून घेण्याची आपल्यांत किती शक्ति आहे हें आपल्याला समजून येअील. पावलोपावली माफी मागण्याचे अितके कांहीं प्रसंग येतील कीं आपली आपल्यालाच लाज वाटायला लागेल. तें सोडून दिलें तरी दुसऱ्या मनुष्याला-सुद्धां आपली चंचलवृत्ति बघून कंटाळा येअील. माफी मागितली तर आपली किंमत कमी होअील अशी भीति असते. आणि ही भीति गिळून टाकली तरी माफीची किंमत कमी होअील ही भीति तर खरीच आहे. तेव्हां मग माफीची किंमत कमी व्हावी हें चांगलें की परस्परांविषयीं गैरसमज चालू ठेवावा हें चांगलें? व्यवहारकुशल समाजाला माफीच्या निखालसपणापेक्षां प्रतिष्ठेची स्थिरताच अधिक बरी वाटते. पण यायोगें समाजानें काय मिळविलें आहे ?

जितके गैरसमज आपल्या लक्षांत आले त्यांची ही गोष्ट झाली. पण जेथें आपल्याला असें वाटतें कीं अमुक गोष्ट निश्चित आहे, त्यांत गैरसमजाला जागाच नाहीं अशा ठिकाणींसुद्धां कांहीं कांहीं वेळां घोर गैरसमज असतो. त्याला काय करावें ?

अुपाय एकच आहे. तो असा कीं, कोणाविषयींहि मत बांधण्याची घाअीच करूं नये; दोन हेतूंचा जिथें विकल्प संभवतो तेथें चांगल्या हेतूचीच कल्पना करावी. मनुष्याचा चांगला परिचय असूनसुद्धां त्याचें बाह्य स्वरूपच आपल्यापुढें अुघडें राहातें, अंतर जाणणें कठीण असतें. कित्येक लोकांना आपलें अंतःकरण अुघडें करतांच येत नाहीं. विचार किंवा कल्पना व्यक्त करण्याची भाषा माणसानें तयार केली आहे. पण हृदय व्यक्त करण्याची भाषा अजून तयार झालेली नाहीं. त्यामुळ मनुष्य प्रगट करतो अेक आणि लोक समजतात दुसरेंच. ही स्थिति सर्वत्र आहे. अेवढे आपण लक्षांत ठेवलें तरी पुष्कळ झालें. जे लोक पुष्कळ बोलतात, पुष्कळ गप्पा मारतात, गोष्टी-वेल्हाळ किंवा विनोदप्रिय म्हणून ओळखले जातात ते आंतून किती दुःखी असतात हें कोणाला समजतच नाहीं. बहुभाषी मनुष्य पुष्कळ वेळां अंतःकरणाचा अेकाकी असतो हें आपण जाणलें तरी पुष्कळ झालें. न्याय करणारे आपण कोण !

अितका विचार केला तरीसुद्धां अितर लोकांविषयीं कांहींसे तीव्र मत आपल्या मनांत असणारच. त्यावेळीं तोच दोष आपणां स्वतःमध्यें किती आहे हें तपासून पाहतां आलें तर किती बरें चांगलें ! आपण जर स्वतःला स्वतःच्या कितीहि दोषांची क्षमा करूं शकतों तर अितरांच्या आपल्यापुरत्या अेखाद्या दोषाकडे आपण दुर्लक्ष करूं शकणार नाहीं का ?

...२

अितकें करूनहि जर अमुक मनुष्याविषयीं आपल्या मनांत सद्भाव अुत्पन्न झालाच नाहीं तर कडवटपणाचे प्रसंग अुत्पन्न करण्यापेक्षां त्याच्याबरोबरच्या संबंधाचा संकोच करणेंच योग्य होय. जेथें सद्भाव नाहीं तेथें सहकार करण्याचा आपल्याला हक्कच नाहीं. जगांत श्रमविभागाच्या नांवानें जो जगद्व्यापी सहकार चालू आहे त्या योगें श्रेयच झालें आहे असें कांहीं नाहीं. आपल्या हृदयाचा जितका विकास झाला असेल तितकाच आपण व्याप राखावा हें अुचित. सत्य हें हृदयानेंच कळतें असें ॠषी सांगतात.

मिळून काम करण्यासाठीं ' महामनाःस्यात् ' हें व्रत आवश्यक आहे.

फेब्रुवारी १९२६

# ध्वजारोपण

## चैत्र शु. १ — १ समय

ज्योतिःशास्त्राचें वर्ष चैत्रापासून सुरू होतें. शालिवाहन शकाचीसुद्धां चैत्री पाडव्यापासून सुरुवात होते. याच दिवशीं श्रीरामचंद्रांनीं दक्षिण भूमीला वालीच्य जुलुमांतून सोडविलें होतें अशी समजूत असल्यामुळे या दिवशीं ध्वजा अुभारण्यांत येते, कारण हा स्वातंत्र्याचा दिवस आहे. या सणाविषयींच्या पौराणिक कथा विद्यार्थ्यांना समजावून सांगण्याव्यतिरिक्त आणि ध्वजा (गुढी) कशासाठीं असते हें समजावून देण्याव्यतिरिक्त या दिवशीं विशेष कांहीं करण्याजोगें नाहीं.

या ॠतूंत लिंबाचा पाला खाण्याची चाल वैद्यकीच्या दृष्टीनें चांगली आहे. लिंबाची कोंवळीं पानें मिरें, हिंग, मीठ, जिरे, यांच्यासह सकाळीं उठून खावयाचीं हा चैत्री पाडव्याचा विशिष्ट विधि आहे. आपण आपलें कोंवळीं पानें आणि मीठ अेवढेंच खावें.

या दिवशीं जर आपण पुष्परचना करूं शकलों तर वसंताचा खरा अुत्सव होअील आणि पुष्परचना करणें शक्य झालें तर तो अर्ध्या दिवसाचा अुत्सव समजला जावा.

तिरंगी राष्ट्रीय झेंडयाचें अभिवादन या दिवशीं ठेवावेंच. त्याच्याबरोबर झेंडागीत आणि राष्ट्रगीत दोन्हीं गावींत.

## रामनवमी : : ७

### ( चैत्र शुद्ध ९ )

रामजन्माचा आनंद अपूर्व आहे. रामजन्माच्या अगोदरची स्थिति आदिकवि वाल्मीकीनें वर्णन केली आहे. विश्वामित्र जेव्हां धर्मरक्षणार्थ दोन विद्यार्थ्यांची दशरथापुढें याचना करतो तेव्हां राजा प्रथम मोहवश होअून नाहीं म्हणतो, पण लगेच कर्तव्याची जाणिव होतांच आपल्या प्राणासारख्या प्रिय पुत्रांना ऋषींच्या हवालीं करतो.

आतां रामलक्ष्मणांचें रोजचें शिक्षण बंद पडतें. राजपुत्रांचें शिक्षण बहुविध असतें. अनेक विषय त्यांना शिकवावे लागतात. सर्व अिंद्रियांचा विकास व्हावा या हेतूनें कुलपती वसिष्ठांनीं त्यांना शिक्षण देण्याचा विचार केला होता, पण विश्वामित्रांनीं तें सारें बदलून टाकलें. विश्वामित्र राजपुत्रांना प्रवासाला घेऊन गेले. तिकडे त्यांनीं त्यांची निसर्गाशीं ओळख करून दिली. देशाची स्थिति प्रत्यक्ष पाहून रामचंद्र विचारतात: ' या प्रदेशांत अितक्या नद्या वाहात आहेत, अितकी नैसर्गिक विपुलता आहे, तरी या ठिकाणीं लोकवस्ति कां नाहीं ? आणि जी थोडीशीं आहे ती अशी भयग्रस्त कां ? '

विश्वामित्र मग त्यांना त्या प्रदेशाचा अितिहास सांगू लागतात कीं, अेकेकाळीं हा प्रदेश सुखी होता, समृद्ध होता; पण नंतर प्रजाभक्षक असुरांचें येथें राज्य झालें, त्यामुळें लोकांची अशी दशा झाली आहे; आणि आपल्या तेजस्वी नेत्रांनीं रामलक्ष्मणांकडे पाहून ते राजर्षि म्हणतात, ' युवकांनो, हा सगळा त्रास दूर करण्याचा भार तुमच्या माथ्यावर आहे ! ' संध्याकाळ झाली म्हणजे विश्वामित्र या राजपुत्रांना रघुकुळाची अुज्वल कीर्ति सांगतात; राजा दिलीपाचा दिग्विजय, भगीरथाचें महान् तप, हें सर्व ते सांगतात. सकाळीं अुठून, स्नान करून रामलक्ष्मण जेव्हां वंदन करण्यासाठी येतात तेव्हां देशांत सुरू असलेला त्रास दूर करण्याच्या युक्त्याप्रयुक्त्या, अुपाय, मंत्र आणि अस्त्रें तें त्यांना शिकवितात

हीच यथार्थ स्थिति काव्यमय भाषेंत दुसऱ्या अेका ठिकाणीं वाल्मीकीनें वर्णन केली आहे. प्रसंग रामजन्मापूर्वीचा आहे. असुर अुन्मत्त झाले आहेत. शूर्पणखा आपल्या

तीक्ष्ण नखांनीं साऱ्या देशाला ओरबाडते आहे; खर आणि दूषण देशभर अनीतीचा फैलाव करीत आहेत; कुंभकर्ण प्रजेंतील मोठ्यामोठ्या वर्गांना तशाचा तसाच खाऊन टाकीत आहे. सात्विक बुद्धीचा बिभीषण रावणाच्या दरबारांत धर्माच्या नांवानें अरण्य-रुदन करीत आहे; त्याच्या अुपदेशाचा साम्राज्यमदानें अुन्मत्त झालेले राक्षस अुपहास करीत आहेत; आपल्या भावाशीं सहकार करावा कीं असहकार करावा याचा त्याला निर्णय करतां येत नाही; आणि रावण आपल्या राज्यांतील दशविध खात्यांच्या द्वारा अेकसुखी सत्ता चालवीत आहे. नैसर्गिक शक्तींचें बिचाऱ्या काय-नवग्रह सुद्धां त्याच्या घरी पाणी भरतात. जगताचा प्रभु अीश्वर कीं रावण याविषयींहि लोकांत शंका अुत्पन्न होते. आपल्या बेटांत राहिल्या राहिल्या त्याला देशांतल्या कोनाकोपऱ्यांतलें दिसतें, रावणापासून गुप्त असें कांहीं सुद्धां राहूं शकत नाहीं.

रावणाच्या अभिमानाला सीमा राहिलेली नाहीं. रावण आपल्या मनांत आणि आपल्य दरबारांत सुद्धां अुघडपणें असें सांगतोः ' हा अेक शत्रु मी मारला. असेच दुसरेहि मारीन. मी सर्वांत श्रेष्ठ आहे. मीच सुखोपभोग घेअीन. साऱ्या सिद्धी माझ्या दासी आहेत. माझें बळ सर्वश्रेष्ठ आहे. माझी जात सर्वांहून श्रेष्ठ माझीच संस्कृति सर्वोच्च. जगाचें हित करण्याचा भार माझ्याच माथ्यावर आहे. मीच दानी आहे. सर्व प्रकारचीं सुखें माझ्यासाठींच आहेत.' अशी गर्वोक्ति करूनच रावणाला संतोष वाटत नाहीं. सर्वांच्या तोंडूनहि आपलें हेंच गुणगान तो वदवितो. सर्वजण त्याचे बंदीजन झाले आहेत. पंडित त्याच्या अिच्छेप्रमाणें शास्त्रार्थ करून सांगतात. पुराणवस्तुसंशोधक त्याचें यश अितिहास, भूगर्भ अित्यादींतून शोधून काढतात. प्रत्येक गुणी मनुष्य आपली शक्ति या मदांधाच्या चरणीं अर्पण करण्यांतच स्वतःला धन्य समजण्याअितका पामर होअून गेला आहे !

अशा स्थितींत दीनहीन झालेली पृथ्वी विधात्याकडे जाते आणि म्हणतेः ' प्रभो, आतां हा भार असह्य झाला आहे. मानवाची मांगल्यावरील श्रद्धा उडून गेली आहे. तपस्या सोडून लोक सुरापान करूं लागले आहेत. लंकेची साम्राज्यदेवी रोज असंख्य प्राण्यांचा बळी घेत आहे. दारूच्या कोठ्याच्या कोठ्या रोज रित्या होत आहेत. देवांचे सर्व व्यवहार बंद पडले आहेत. ही स्थिति कुठवर चालायची ? ' विधाता म्हणतो ' हे पृथ्वी ! तूं श्रद्धा सोडूं नकोस. चराचरांत व्यापून राहिलेल्या अीश्वरतत्त्वाला शरण गेल्यानें सर्व दुःखांचें निवारण होतें. राक्षस

आणि मनुष्यें ज्यांना जंगली 'वानर म्हणतात, अडाणी म्हणतात, राक्षसी संस्कृतीचा ज्यांना स्पर्श झालेला नाहीं, जे मनुष्य आहेत कीं नाहींत अशा शंकेनें 'वा–नर' म्हटलें जात आहेत अशा भोळ्या लोकांत ही ओीश्वरी शक्ति प्रगट होओील. त्यांच्या द्वारानेंच या रावणाचा पराभव होओील. आर्यावर्तांतील माना पर्वतावर बसून जी तपश्चर्या करीत आहेत ती अवश्य सफल होओील आणि वज्रकाय, वज्रकौपीन बालकें देशांत अुत्पन्न होतील, धर्माची पुनः जागृति होओील आणि परमात्मा स्वतः अवतार घेओील.' परमात्म्याचा अवतार झाला हें कसें समजायचें अशी पृथ्वीला शंका अुत्पन्न होते तेव्हां विधाता सांगतोः' देशांत ज्यावेळीं ब्रह्मचारी अुत्पन्न होतील, गृहस्थ जेव्हां अेकपत्नीव्रताचें पालन करतील, विद्यार्थी जेव्हां धर्मरक्षक गुरूंच्या आधीन राहातील, आओीबाप आपला मोह सोडून देअुन आपल्या मुलांना जेव्हां मख (यज्ञ)–रक्षणार्थ स्वाधीन करतील, जेव्हां भाअुभाअु अपूर्व प्रेमानें परस्परांशीं संबद्ध होतील, जेव्हां अुच्च कुळांतील लोक पतित स्त्रियांचाहि अुद्धार करतील, जेव्हां राजपुत्र भिल्ल आणि गुहक यांसारख्या लोकांशीं समानभावानें मैत्री करतील, जेव्हां ब्राह्मण आपल्या अभिमानाची अट सोडून देतील, जेव्हां ब्रह्मचर्याचें तेज सत्याची आणि धर्माची सेवा अंगीकारील आणि जेव्हां प्रजेमध्यें श्रद्धा जागृत होओील, जेव्हां अुच्च कुळांतील तरुण शहरी जीवनाचा विलास सोडून खेड्यापाड्यांतून आणि रानावनांतून फिरतील, तेव्हां ओीश्वराचा अवतार झाला आहे असें समजावें.' पृथ्वीला संतोष झाला, तिला आश्वासन मिळालें आणि ती स्वस्थानीं शांत झाली.

दशरथानें तपश्चर्या आरंभून धर्माचा अग्नि चेतविला. यज्ञपुरुषानें पायसरूपी चैतन्य दिलें. जग वाट पाहूं लागलें. सारे संयोग अनुकूल होअूं लागले. ग्रह आणि अुपग्रह अेकमेकांला अनुकूल झाले. पापाची घटका भरली, पुण्याचा अुदय झाला. आणि रामजन्म झाला.

त्या दिवशीं प्रजेनें अुत्सव केला. अजून कांहीं रावणराज्य नष्ट झालें नव्हतें. अजून ताटकेचा वध झाला नव्हता. अजून कांचनमृग मारीचाची माया अुघड झाली नव्हती. तरीहि लोकांनीं अुत्सव केला, कारण रामजन्म होअून चुकला होता. अेखाद्या खेडूताला जसें आकाशांतील मेघांत सोळा आणे पीक दिसून यावें, तसें लोकांनीं मेघश्याम रामचंद्रामध्यें स्वातंत्र्य पाहिलें, धर्मराज्य पाहिलें, मुक्ति पाहिली. त्या दिवसापासून आतापर्यंत लोकांनीं चैत्र शुक्ल नवमीला अुत्सव केला आहे, कारण त्या दिवशीं माणसांमध्यें सत्यावर, ब्रह्मचर्यावर, धर्मावर श्रद्धा जागृत झाली.

# रामनवमी

**शुद्ध ९** **१ दिवस**

रामनवमी आणि गोकुळाष्टमी हे दोन्ही सण भक्तीचेच सण आहेत. राम-कृष्णांच्या अुपासनेनें हिंदुधर्म जितका रंगला आहे तितका दुसऱ्या कशानेंहि रंगलेला नाहीं. म्हणून रामनवमीचा आपल्याला जास्तींत जास्त अुपयोग करून घेतां आला पाहिजे. रामनवमीच्या दिवशीं अुपवास करण्याची चाल सुंदर आहे. लहान मुलांनीसुद्धां शक्य तर बारा वाजेपर्यंत कांहीं खाअू नये.

हृदयांत आणि समाजांत कशा कशा प्रकारचे राक्षस मातलेले आहेत तें शोधण्यांत सकाळचा वेळ घालवितां आला तर चांगलें. दहा वाजतां मुक्तिकोपनिषदांतून चांगले चांगले अुतारे विद्यार्थ्यांना वाचून दाखवावेत; सर्व मंडळींनीं अेकत्र जमा होअून रामजन्माची कथा बरोबर बारा वाजतां संपेल अशा रीतीनें अैकावी. त्यानंतर भजन-कीर्तन. दुपारीं गायनाचा कार्यक्रम ठेवून त्यानंतर रामचरित्राच्या वेगळ्या वेगळ्या प्रसंगांचें विवेचन करावें. रामराज्याविषयींची आपली कल्पना अनेक रीतींना विस्तारून त्याची चर्चा करावी. मनुष्यजातीला आदर्श राजा कसा असावा याचें जें अुदाहरण श्रीरामचंद्रांनी घालून दिलें त्याचें रहस्य समजावून द्यावें. रामनवमीच्या सणाबरोबर आपला राष्ट्रीय ग्रंथ रामायण याचें अध्ययन नव्या नव्या पद्धतीनें होईल असें केलें पाहिजे. प्रजातंत्र ( लोकशाही ) ची कल्पना या दिवशीं गांवोगांवीं स्पष्ट केली जावी.

रामनवमीच्या दिवशीं सर्वांनीं मिळून सकाळीं अेकत्र स्नानाला जावें, तऱ्हतऱ्हेचीं फुलें गोळा करावीं, रामचंद्राची पूजा करावी, पूजेच्या खोलींत रांगोळ्या काढाव्या, अुदबत्ती, धूप, चंदन अित्यादींच्या सुगंधानें पूजेची खोली पवित्र करावी, आणि लहानमोठ्या सर्वांना आनंदी ठेवून हा दिवस प्रसन्नतेंत घालवावा. या दिवशीं सीतासतीच्या चरित्रावर काव्यें रचावीं आणि स्वराज्यप्राप्त्यर्थ जीवन अर्पण केल्याची प्रतिज्ञा करावी.

# महावीर जयंती : : ८

## ( चैत्र शु. १३ )

### १ महावीर स्वामी

हिंदुधर्म आणि त्यांतील समजुती अितक्या कांहीं जुन्या होअून गेल्या होत्या कीं, कांहीं संस्कार केल्यावांचून लोकांना त्यांतून आश्वासन मिळेल असें त्यांच्यांत कांहीं राहिलें नव्हतें. असा संस्कार करणारा अेक महापुरुष गौतमबुद्ध होअून गेला. पण संस्कार करणारे असे ते अेकटेच नव्हते. त्यांच्या काळीं अशा पांचसहा संस्कारकांचीं नांवें मिळतात. त्यांत गौतमबुद्धाअितकीच प्रसिद्धि पावलेले वर्धमान महावीर हेच होते. वर्धमान महावीर हे जैन धर्माचे संस्थापक म्हटले जातात.

तसें म्हटलें तर जैनमत पुष्कळच प्राचीन आहे. भगवान ऋषभदेवापासून त्या धर्माचे २४ तीर्थंकर होअून गेले. वर्धमान महावीर हे शेवटचे तीर्थंकर होत. गौतम-बुद्धाप्रमाणें महावीरसुद्धां बिहार प्रांतांतच जन्माला आले होते. वैशाली नगरीजवळच्या अेका लहानशा गांवांत ज्ञातृ नांवाच्या कुळांत वर्धमानांचा जन्म झाला होता. त्यांची आअी ही लिच्छवी राजा कटक याची बहीण होती. लहानपणापासूनच त्यांच्या मनांत वैराग्य उत्पन्न झालें, पण वर्धमान हे अेकनिष्ठ मातृपितृभक्त असल्यामुळें वृद्धांनां संतुष्ट ठेवण्यासाठीं यशोदा नांवाच्या अेका राजपुत्रीबरोबर विवाह करून ते गृहसंसार चालवूं लागले. त्यांना प्रियदर्शना नांवाची अेक कन्याही झाली होती. तिसाव्या वर्षी मातापिता विदेह झाले आणि वर्धमान हे गृहसंसारांतून सुटले. त्यांनीं घोर तप आरंभिलें आणि पार्श्वनाथाच्या पंथांत शिरून शांति मिळविली.

महावीरांमध्यें अहिंसाधर्माचा असामान्य उत्कर्ष झालेला आपल्याला दिसून येतो. जवळजवळ चाळिस वर्षांच्या वयापासून त्यांनी उपदेश करायला सुरुवात केली आणि हें काम बत्तीस वर्षेपर्यंत केलें. बुद्ध भगवान मध्यम मार्गाचा उपदेश करीत होते तर महावीर विषयसुखाचा आत्यंतिक त्याग पसंत करीत होते. तपश्चर्या करून अिंद्रियनिग्रह करण्याची जुनी परंपरा महावीरानें चालविली. आणि [redacted] महत्त्व

वाढ केलें. हिंदुस्थानांत बौद्ध संप्रदाय अेकेकाळीं पुष्कळ पसरला होता, पण आज तो नष्टप्राय झाला आहे. जैनधर्महि. बौद्ध धर्माअितकाच पसरलेला दिसतो, पण बौद्ध-धर्माप्रमाणें त्याचा नाश झाला नाहीं. आज बंगालकडे, गुजराथमध्यें आणि दुसऱ्या अनेक ठिकाणीं जैन लोकांची वस्ती पुष्कळ प्रमाणांत आहे.

बौद्ध धर्माप्रमाणें जैनधर्माचा प्रचार करण्याकरितां अेखाद्या समर्थ राजाकडून (गुजराथमधील राजा कुमारपाळ सोडून) किंवा अितर रीतीनीं प्रयत्न झालेला नाहीं.

अहिंसाधर्माचा विचार करतां करतां सूक्ष्म जीव कुठें कुठें असतात याचा जैन लोकांनीं चांगला शोध केला आहे. वनस्पतींत किती जीव असतो, हवेंत आणि पाण्यांत जीव कशा प्रकारें राहतो वगैरे बाबींचें त्यांनीं अेक मोठें शास्त्र रचलें आहे. जैन पंडितांनीं साहित्याची पुष्कळ सेवा केली आहे. संस्कृतांत अनेक शास्त्रांवर जैन लोकांनीं लिहिलेले ग्रंथ आहेत. जैन लोकसुद्धां मूर्तिपूजक असल्यामुळें त्यांनीं स्थापत्यकलेंत आणि शिल्पकलेंत चांगलीच अुन्नति केली आहे. गुजरातेंत जैन लोकांनीं बांधलेलीं कित्येक देवळें हिंदुस्थानांत असामान्य समजलीं जातात. आबू–देलवाडा येथील जैनमंदिरांची कारागिरी पाहून सर्व देशांतील प्रवासी आश्चर्यचकित होतात. कठीण दगडांत मेणाची किंवा फुलांची कोमलता आणण्याची शक्ति हिंदुस्थानांतील कारागिरांत आहे हें या जैनमंदिरांवरून सिद्ध होतें.

जैनांत श्वेतांबर आणि दिगंबर असे भेद पडलेले आहेत. महावीरांनीं कैवल्य-प्राप्तीनंतर वस्त्राचाही त्याग केला होता, म्हणून त्यांची पूजा वस्त्रानिशी करावी कीं वस्त्रविरहित करावी या मतभेदामुळें दोन पंथ अुत्पन्न झाले आणि आतां तर त्यांच्यांत पूजाविधि आणि कलेचा आदर्श यांचाहि भेद पडला आहे.

जैनधर्माचे पहिले तीर्थंकर ऋषभदेव यांचा उल्लेख श्रीमद्भागवतांत आला आहे. त्यांत त्यांच्या त्याग—वैराग्याचें आदरपूर्वक वर्णन केलेलें आहे. हिंदु समाजाला सुसंस्कारी बनविण्याच्या कामीं ऋषभदेवांचा हिस्सा मोठा होता असें दिसतें. लग्न-व्यवस्था, पाकशास्त्र, गणित, लेखन अित्यादि संस्कृतीचीं मूळ बीजें ऋषभदेवांनी समाजांत टाकलीं असें म्हणतात. हें सर्व करून शेवटीं या सर्वांचा त्याग करून ऋषभदेवांनीं प्रवृत्ति आणि निवृत्ति हे दोन्ही मार्ग लोकांना आचरून दाखविले असें म्हटलें तरी चालेल.

अृषभदेवानंतर आणि महावीरांच्या अगोदर दुसरे बावीस तीर्थंकर झाले. त्यांतील शेवटचे जे पार्श्वनाथ त्यांच्या पंथाची छाप महावीरावर पुष्कळ पडली. महावीरांनीं आपल्या अनुभवानें पार्श्वनाथांच्या अुपदेशांत भर घातली आणि संयमधर्म अधिक स्पष्ट व संपूर्ण केला. सत्य, ब्रह्मचर्य, अहिंसा आणि अस्तेयरूपी यमाला संपूर्ण बनविण्यासाठीं त्यांनीं अपरिग्रहाचें व्रत त्यांत अधिक घातलें. पार्श्वनाथांच्या मताप्रमाणें पापाची कबूली देण्याचा विधि व्यक्तीच्या मर्जीवर सोंपविलेला होता. महावीरांनीं तो आवश्यक केला.

महावीरस्वामी हे शेवटचे तीर्थंकर समजले जातात. तीर्थंकर म्हणजे स्वतः तरून दुसऱ्या असंख्य जीवांना भवसागरांतून तारणारा. तीर्थ म्हणजे मार्ग. सच्छास्त्ररूपी मार्ग बांधून देणारा तो तीर्थंकर.

बौद्धधर्मांत जशी बोधिसत्त्वाची कल्पना आहे तशी जैन धर्मांत तीर्थंकराची कल्पना आहे वैदिकधर्मानें जैन धर्माची आणि बौद्धधर्माची नक्कल करून तशीच अवताराची कल्पना उभी केली आहे असें कित्येकांचें मत आहे. विष्णूचे दहा अवतार मानले जातात. दुसऱ्या हिशेबाप्रमाणें चोवीस अवतार समजतात. दहा अवतारांत बुद्धावतार मानला आहे आणि चोवीस अवतारांत अृषभदेव आहेत हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे.

गौतमबुद्धाच्या तपश्चर्येप्रमाणें महावीराची तपश्चर्यासुद्धां अतिशय उग्र होती. तितिक्षेची त्यांनीं कमाल करून दाखविली. लाट देशांत* वीरप्रभूला पुष्कळ अुपसर्ग सहन करावा लागला. प्रवास करीत असतांना कुत्रीं येऊन त्यांच्या अंगावर पडत आणि त्यांना चावीत तेव्हां तेथील लोक कुत्र्यांना हुसकून लावीत नसत, अितकेंच नव्हे तर भगवानांना ते मारीत आणि कुत्र्यांना छुः करून त्यांच्या अंगावर सोडीत. पण महावीरांनीं तें सर्व सहन केलें आणि विजय मिळविला. आज त्याच देशांत त्यांची आदरपूर्वक पूजा होत आहे.

पापाची जबाबदारी फक्त पाप न केल्यानें संपत नाहीं; पाप करायचें नाहीं, करवायचें नाहीं आणि त्याला अनुमोदनहि द्यायचें नाहीं, म्हणजेच पापांतून मुक्ति

---

* भडोचच्या आसपासच्या प्रदेशाचें प्राचीन नांव.

मिळते, असा उपदेश महावीर स्वामींनीं केला आहे. महावीर स्वामींनीं पापाशीं संपूर्ण असहकार उपदेशिला आहे.

जैन तत्त्वज्ञान आणि जैनविधी यांत अेकच वस्तु सर्वत्र दिसून येते आणि ती ही कीं, माणसाला संयमी बनवून त्याला आत्मप्राप्तीकडे नेणें. जैन परिभाषेंत बाह्य प्रवृत्तीला ' आस्रव ' म्हणतात. या आस्रवांतून परावृत्त होऊन आत्माभिमुख होणें याचें नांव ' संवर. '

जैनधर्मांत आणि योगदर्शनांत पुष्कळ साम्य आहे. अहिंसा, सुनृत, अस्तेय, ब्रह्मचर्य आणि अपरिग्रह हीं पंचमहाव्रतें; मैत्री, करुणा, मुदिता आणि उपेक्षा या चार भावना; धर्माचें दशविध लक्षण; अित्यादि गोष्टी वैदिक, बौद्ध आणि जैनधर्मांत समानच आहेत. यात्रा आणि व्रतें यांचें माहात्म्य तीन्हींत सारखेंच आहे. भेद फक्त परिभाषेचा आहे.

जैनधर्मांत दिगंबर आणि श्वेतांबर या पंथांव्यतिरिक्त स्थानकवासी नांवाचा नवीन अेक पंथ निघाला आहे. या पंथांत मूर्तिपूजा नाहीं.

जैनधर्मांत पुराणेंहि पुष्कळ आहेत. त्यांतील कित्येक कथा वैदिक पुराणांतील कथांशी कांहीं अंशांनीं जुळत्या आहेत. जैनपुराणें, शाक्त पुराणें आणि वैदिक पुराणें यांची तुलना केल्यानें पुराणांत अैतिहासिक भाग किती असावा आणि त्याचें स्वरूप कसें असावें याविषयीं अटकळ करतां येण्याजोगी आहे. या दृष्टीनें जुन्यां साहित्याचा अजून पुरता अुपयोग केला गेलेला नाहीं.

बौद्ध आणि जैनधर्मांत वाटेल त्या माणसाला प्रवेश होअूं शकतो आणि वाटेल त्या जातीचा मनुष्य भिक्षु किंवा यति होअूं शकतो. जैन आणि बौद्ध या धर्मांत जातिभेदाविषयीं अुदासीनता आहे, कदाचित् विरोधहि असेल. मग जातिभेदांतील घाण जी अस्पृश्यता तिला जैनधर्मांत स्थान कोठून असणार ?

१९२३.

# २. विश्वधर्म

## ( स्फुट विचार )

‘ महावीर ’ हें नांव श्रीविष्णूला लावण्यांत आलें आहे. त्याचें वाहन गरुड त्यालाहि महावीर म्हणतात. श्रीरामचंद्रांनामुद्धां महावीर म्हणतात. श्रीरामचंद्रांचा एकनिष्ठ सेवक हनुमान हाहि महावीर म्हटला जातो. आज आपण श्रीपार्श्वनाथांचे अनुगामी वर्धमान यांना महावीर म्हणून ओळखीत असतो.

‘ महावीर ’ या शब्दानें काय अर्थबोध होतो ? सर्वत्र व्यापून, आसुरी शक्तींचा पराजय करून विश्वाचें पालन करतो तो विष्णु महावीर आहे. अमृत मिळविण्याची शक्ति ज्याच्यांत आहे असा शक्तिसंपन्न मातृभक्त गरुड हा महावीर. पित्याचें वचन पाळण्याकरितां, प्रजेचें हित करण्याकरितां आणि धर्मनिष्ठेचा आदर्श स्थापण्याकरितां राज्य, सुख आणि पत्नी यांचा त्याग करणारे श्रीरामचंद्र हे महावीर. कांहींहि मोबदल्याची अिच्छा न धरतां सेवा करणारा आणि शक्तीचा उपयोग शिवाच्या सेवेंतच करणारा ब्रह्मचारी सेवानंद हनुमान हा महावीर. मातृभक्ति, सुखोपभोगाचा त्याग, भूतमात्राविषयीं अपार दया आणि अिंद्रियजयाचा उत्कर्ष दाखविणारे ज्ञातृपुत्र वर्धमान हेहि महावीर. आर्यजातीनें सर्वोच्च सद्गुणांची जी मनोमय मूर्ति कल्पिली आहे, जो आदर्श बनविला आहे त्या आदर्शाला पोचणारी व्यक्ति म्हणजे महावीर. विजय मिळवितो तो वीर. अंतर्बाह्य जगावर विजय मिळवितो तो महावीर. वीर म्हणजे आर्य, महावीर म्हणजे अर्हन्.

× × × ×

हिंदुधर्म हा राष्ट्रीय धर्म आहे, अेका महान् राष्ट्राचा तो धर्म असल्यामुळें त्याला महाराष्ट्रीय धर्महि म्हणतां येईल. पण हिंदुधर्माची तत्त्वें सार्वभौम आहेत, विश्व-धर्माचीं आहेत, त्याचा प्रसार सर्वत्र होण्याजोगा आहे. हिंदुधर्मानें मनुष्यजातीचा जीवनधर्म शोधून काढला आहे. काय केलें असतां मानव समाज शांतीनें राहू शकेल, अुत्कर्ष पावेल, परमतत्त्वाला ओळखूं शकेल, हें हिंदुधर्मानें केव्हांच नक्की करून टाकलें आहे. ‘ स्वल्पमप्यस्य धर्मस्य त्रायते महतो भयात् । ’ ( जोडा स्वल्पहि हा धर्म तारी मोठ्या भयांतुनी, ) ‘ न हि कल्याणकृत्कश्चिद्दुर्गतिं तात गच्छति ’

( कल्याणकारी कोणीहि दुर्गतीस न जातसे, ) 'धर्मो रक्षति रक्षितः।' ( धर्माचें रक्षण करणाऱ्याचें धर्म रक्षण करतो ) अशी श्रद्धा किंवा अनुभव या धर्मानें नोंद करून ठेवला आहे. तरी हिंदुधर्म हा प्रचारपरायण ( मिशनरी ) धर्म नाहीं. आपल्या धर्माचा जगांत प्रसार करावा असा हिंदुधर्माचा आग्रह नाहीं. हिंदु हा आपला धर्म स्वतःच्या आचरणांत उतरविण्याचाच प्रयत्न करीत असतो. त्यांत त्याला सफलता मिळाली तर त्याचा प्रभाव शेजाऱ्यावर पडणारच. प्रभाव पाडण्यासाठीं मुद्दाम प्रयत्न करणें यांत उतावीळपणा आणि घाओ आहे, म्हणजेच जीवनाचा कच्चेपणा आहे, असें समजून हिंदु हा अधिक प्रयत्नपूर्वक आत्मशुद्धीच करीत राहील.

सामाजिक हिंदुधर्म म्हणजे हीं सनातन तत्त्वें आपल्या विशिष्ट समाजाला अनुकूल करण्याचा प्रयत्न. दुसऱ्या समाजाला हींच तत्त्वें वेगळ्या रीतीनें आपल्या जीवनांत आणतां येतील. हिंदुधर्माचीं हीं सनातन तत्त्वें समाजांत दाखल करण्याचे अनेक प्रयोग या देशांत झाले आहेत. रूढ सनातन धर्म या देशाच्या बाहेर बिलकुल पसरलेला नाहीं. पसरविण्याचे प्रयत्न कधींकाळीं झाले आहेत कीं नाहींत तें आपल्याला माहीत नाहीं. हा रूढ सनातनधर्म या देशांतूनच नष्ट करण्याचे प्रयत्न झाले आहेत, हे प्रयत्न निष्फळ झाले आहेत अेवढें आपण जाणतों. पण रूढ सनातन पद्धति सोडून दुसऱ्या पद्धतीनें झालेले प्रयोग जगभर चांगलेच प्रसृत झाले आहेत. बौद्धधर्म हा याला पुरावा आहे, बौद्धधर्म हाच अगदीं पहिला मिशनरी धर्म दिसून येतो. याच्या अगोदर मिशनरी कार्य झालें असलें तर त्याची आपल्याला नक्की माहिती नाहीं. वर्ण-व्यवस्थायुक्त जीवनधर्म प्रचारक होऊंच शकणार नाहीं असेंहि वाटतें. ( 'जीवनधर्म' म्हणजे केवळ मनानें मानण्यासाठीं रचलेला धर्म नव्हे तर जगण्यासाठीं तयार केलेला धर्म. )

बौद्ध आणि जैन धर्मांत पुष्कळ भेद आहे, तरी दोहोंत साम्यहि कांहीं कमी नाहीं. दोन्हीहि मिशनरी धर्म होण्याला लायक आहेत. दोन्ही विश्वधर्म आहेत. स्याद्वादरूपी बौद्धिक अहिंसा, जीवदयारूपी नैतिक अहिंसा, आणि तपस्यारूपी आत्मिक अहिंसा ( भोग म्हणजे आत्महत्त्या–आत्म्याची हिंसा; तप म्हणजे आत्म्याचें रक्षण–आत्म्याची अहिंसा. ) जो धारण करूं शकतो त्यालाच विश्वधर्मी होतां येईल, तोच अकुतोभय असा विचरूं शकेल. 'यस्मान्नोद्विजते लोको लोकान्नोद्विजतेच यः।' ( जो न लोकांस कंटाळे ज्यास कंटाळती न ते ) हें वर्णन त्यालाच लागूं पडण्याजोगें आहे.

ही प्रस्थानत्रयी बरोबर बाळगल्यानें सगळ्या जगाची यात्रा होण्यासारखी आहे. आत्म्याच्या शोधांत हेंच पाथेय अुपयोगीं पडण्याजोगें आहे.

× × × ×

मिशनरी धर्मानें तत्त्वाच्या बाबतींत अेकनिष्ठ राहावें पण आपल्या रूपाविषयीं आग्रह ठेवूं नये. ' देश तसा वेष ' हा नियम धर्मालाहि–विशेषेंकरून विश्वधर्माला– लागूं करतां येण्याजोगा आहे. विश्वधर्म खरोखर विश्वधर्म असेल तर तो आपल्या नांवाचाहि आग्रह ठेवणार नाहीं. बौद्धधर्माचीं कितीतरी रूपें झालेलीं आहेत.

× × × ×

विश्वधर्म एकच असावा असें मानण्याचें कारण नाहीं. अेखाद्या खोलींत ठेवलेले चारपांच दिवे जसा आपापला प्रकाश खोलींत सर्वत्र पसरून टाकतात, सबंध खोलीचें राज्य अुपभोगतात, आणि तरीसुद्धां स्वतःचें व्यक्तित्व ठेवूं शकतात, तसे अनेक विश्वधर्म अेकाच वेळीं सगळ्या जगाचें राज्य अुपभोगूं शकतील. धर्मांत द्वेष वा मत्सर कोठून असणार ? अेका म्यानांत दोन तरवारी राहाणार नाहींत, एका दरबारांत दोन मुत्सद्दी कारभार करणार नाहींत, पण जगांत एकाचवेळीं वाटेल तितके धर्म मात्र साम्राज्य चालवूं शकतील, कारण धर्म हा अहिंसकच असणार. धर्म म्हणजेच अद्रोह. जेथें धर्माधर्मांमध्यें झगडे चालतात आणि संख्यावाढीची अुत्सुकता दिसून येते तेथें धार्मिकता राहिलेली नाहीं, धर्माच्या नांवानें अधर्म शिरजोरी दाखवीत आहे, धर्माचें वीर्य क्षीण झालें आहें असें समजावें. अशा स्थितींतून जगाचा उद्धार धर्मवीर असेल, महावीर असेल, तोच करूं शकेल.

अहिंसेचें संपूर्ण स्वरूप आपण समजून घेतलें पाहिजे. अहिंसा हा महावीराचा धर्म आहे, सगळ्या जगताला जिंकण्याची आकांक्षा बाळगणाऱ्या जिनेश्वराचा तो धर्म आहे. जगाच्या अेखाद्या कोपऱ्यांतहि जोंवर हिंसा वास्तव्य करीत असेल तोंवर हा अहिंसाधर्म पराजितच आहे. कृत्रिमरीत्या भरणपोषण देऊन सूक्ष्म जंतूंना जगविणें अेवढ्यानें अहिंसाधर्माला संतोष होऊं नये. महावीराप्रमाणें साऱ्या जगाचें दुःख–पांची खंडांचें दुःख–महावीरानें पाहिलें पाहिजे, आणि आपल्याजवळचें सनातन औषध त्या त्या ठिकाणीं पोचतें केलें पाहिजे. महावीराच्या अनुयायांनीं हृदयाची विशालता आणि अुत्साहाचें शौर्य अंगीं बाणवून घेऊन सर्वत्र विचरलें पाहिजे. संग्रामांतील वीर शस्त्रास्त्रें घेअून धांवेल. अहिंसेचा वीर आत्मशुद्धि आणि करुणा यांनीं सज्ज होअून धांवेल.

साऱ्या जगाचा ‘ अपासरा ’ ( जैन साधूंचा मठ ) बनविला गेला पाहिजे. लहानशा अपासऱ्याचा कितीजणांना आश्रय मिळणार ?

२७-४-२४

# महावीर जयंती

## चैत्र शु. १३ १ दिवस

या दिवशीं ऋषभदेव, पार्श्वनाथ, महावीर, नेमीनाथ वगैरे तीर्थंकरांची माहिती द्यावी, आणि मनुष्येतर प्राणीसुद्धां मानवजातीचे लहान लहान भाऊच आहेत, त्यांना दुःख देऊं नये, त्यांचेंहि भलें अिच्छावें आणि भलें करावें, कारण आपण त्यांचे पुढारी आहोंत, अित्यादि विद्यार्थ्यांना समजावून द्यावें. दुसऱ्याला कमींतकमी पीडा देऊन जें जीवन जगतां येईल तेंच अुत्तम, ही गोष्ट त्यांच्या मनावर ठसवावी. अहिंसा हेंच अमृत आहे, अपरिग्रह हीच श्रीमंती आहे, हा या दिवसाचा विशिष्ट बोध आहे.

# लोकांचा हनुमान :: १

## ( चैत्र शु. १५ )

हिंदुधर्माची अशी कांहीं खुबी आहे कीं, त्यांतील चित्रें लहानमोठ्या, शिक्षित-अशिक्षित, उच्च अभिरुचीच्या तशाच भोळ्याभाबड्या सर्वच लोकांना प्रिय व्हावीं अशी रेखाटलेलीं असतात.

माणसांना माणसांविषयीं जसा राग–द्वेष असतो तसा मनुष्येतरांविषयीं नसतो. पशुपक्ष्यांच्या बाबतींत आपला समभाव स्वाभाविक असतो. त्यांच्यासंबंधी एकतर कौतुकभाव असतो, दयाभाव असतो किंवा उपेक्षा असते. पण ईर्षा, मत्सर, द्वेष असे मिश्र आणि हीन भाव मुळींच असत नाहींत. म्हणून पुराणकारांनीं कित्येक आदर्शांचीं चित्रें पशु-पक्ष्यांच्या रूपानें रेखाटलीं आहेत. आदर्श ब्रह्मचारी, आदर्श सचिव, आदर्श भक्त-सेवक, आणि निष्काम समाजहितकर्ता अशा हनुमानाचें चित्र इतकें भव्य आहे कीं मनुष्यकोटींत तें वास्तविक वाटणार नाहीं म्हणून वाल्मीकीनें त्याला वानराचें रूप दिलें. 'वा–नर' म्हणजे खालच्या प्रतीचा नर. पण हनुमानाच्या बाबतींत मात्र तो नरश्रेष्ठांतहि श्रेष्ठ आहे, 'बुद्धिमतां वरिष्ठ' आहे.

वाल्मीकीनें याच गुणांचा उत्कर्ष मनुष्यांत दाखविण्यासाठीं लक्ष्मण रेखाटला चौदा वर्षेपर्यंत त्यानें कंदमूलफलाहार करून ब्रह्मचर्य पाळलें. राम–सीतेची सेवा त्यानें अनन्यनिष्ठेनें केली, पण तो पडला माणूस. त्याला सीतेचा टपका सहन करावा लागला.

भरतहि असाच आदर्श राजसेवक, राजभक्त. भरतापेक्षां श्रेष्ठ असा व्हाइसरॉय ( राज–प्रतिनिधि ) कोणी पाहिला नाहीं. पण तोहि माणूसच पडला. म्हणूनच कैकेयीनें त्याच्याविषयीं हलकी कल्पना बांधून दशरथाकडून त्याच्यासाठीं राज्य मागून घेतलें. तो मनुष्य होता म्हणूनच कैकेयी त्याचा असा अपमान करूं शकली. हें सोडून दिलें तरी आदर्श बंधु लक्ष्मणसुद्धां अेक वेळ–अेकच वेळ कां होअीना-भरताविषयीं साशंक झाला. माणसामाणसांत आतां याहून श्रेष्ठ संबंध कोठून आणावा ?

अशा रीतीनें हार पावल्यानंतर मनुष्याची माती टाकून देऊन वाल्मीकीनें वानराची माती हातांत घेतली आणि त्यांतून हनुमान बनविला आणि येथें मात्र तो यशस्वी झाला.

२

वाल्मीकीनें हनुमानाला वानर बनविलें आणि बहुजनसमाजाच्या स्वभावांत असलेली वानरवृत्ति त्यानें जागृत केली. हनुमान वानर आहे ही गोष्ट पकडून धरून लोकांनी वाल्मीकिरामायणांत नसलेल्या अशा कित्येक गोष्टी त्यावर रचल्या आहेत. वाल्मीकिरामायण, अध्यात्मरामायण, आनंदरामायण, अद्भुतरामायण, सीतारामायण, तुलसीरामायण, कृत्तिवासरामायण, कंबनरामायण, मंत्ररामायण, 'परंतु' रामायण, दामररामायण, अशीं अगणित रामायणें आहेत. प्रत्येकांतील हनुमान वेगळा आहे. जशी कर्त्याची भूमिका तसा त्यांतला हनुमान. लोकांना चाळे आवडतात. मुलांना कृतींत तर मोठ्या माणसांना स्मरणांत कां होईना, पण चाळे हे पाहिजेतच. आणि म्हणूनच लोकांनीं हनुमानाच्या नव्या नव्या आवृत्त्या काढल्या आहेत. अशा रीतीनें हनुमान लोकमान्य झाला. पण त्यासाठीं त्याला कष्टहि पुष्कळ सहन करावे लागले आहेत. कुठें आपला राजा वचनदुर्बळ झालेला पाहून त्याची खरडपट्टी काढणारा तो सचिव हनुमान आणि कुठें रावणाच्या नाकांत आपल्या शेपटीचें बारीक टोंक घालून त्याला शिंक आणून मुकुट खालीं पाडणारा मर्कट हनुमान. प्रजारंजक राजाला लोकांचें पुष्कळ सहन करावें लागतें, प्रजासेवक लोकनायकाला प्रजेच्या भक्तीखालीं सांपडून दुर्दशा करून घ्यावी लागते; लोकमानसांत महात्म्यांच्या जशा चित्रविचित्र आवृत्त्या तयार होतात, त्याचप्रमाणें राष्ट्रीय वा धार्मिक ग्रंथांना–प्रजेच्या आदर्शांनाहि–लोकसुलभ विकृतींनीं हैराण व्हावें लागतें.

पण यांतच त्यांची अुपयोगिता सांठविलेली आहे. यांतच त्यांची सार्वभौम लोकमान्यता भरलेली आहे. यांतच आदर्शांचें चिरंजीवित्व राहिलें आहे.

३

हनुमान स्वतःला रामसेवक मानीत होता. रामानें कधींकाळीं स्वतःला हनुमान–स्वामी मानलें आहे ? रामाच्या हृदयांत हनुमानाविषयीं काय भाव वास करीत असेल बरे ? पुढारीपणाचा ? पितृवात्सल्याचा ? बंधुप्रेमाचा ? कीं कृतज्ञताबुद्धीचा ?

नारदांना एकवेळ ही शंका उत्पन्न झाली. नारद उठले आणि निघाले रामालाच विचारायला. नारद स्वतःच पडले जगाचे बातमीदार, तेव्हां दुसऱ्याकडून मिळालेल्या बातम्या त्यांच्या काय कामाच्या ? प्रत्यक्षच मुलाखत घ्यावी याहून उत्तम तें काय ? पण बिचाऱ्याला त्याच दिवशीं कटु अनुभव आला. द्वारपाळ कांहीं आंत जाऊं देईना. तो म्हणाला कीं " महाराज रामचंद्र पूजेला बसले आहेत. यावेळीं आंत जातां येणार नाहीं. पूजा संपूं द्या मग खुशाल आंत जा. " आश्चर्यचकित झालेले नारद मुनि मनांत विचार करूं लागले–राम म्हणजे प्रत्यक्ष परमेश्वर, त्रैलोक्याचे स्वामी, ब्रह्मदेव चारी वेद गाऊन थकला तरी रामरहस्य त्याला समजलें नाहीं, योगीराज शंकर हलाहल प्याला तेव्हां रामनामानेंच त्याला शांति मिळाली. असे हे भूतनाथ आणि शरण्य श्रीरामचंद्र, हे आणखी कोणाची बरें पूजा करीत असावेत ? नारदांना अपमानापेक्षां कुतूहल अधिक असह्य झालें. एक एक पळ म्हणजे त्यांना युगासमान लांब वाटूं लागलें. शेवटीं एकदांची परवानगी मिळाली. आंत जाऊन पाहातात तों काय ! कितीतरी सुंदर सुंदर सोन्याच्या मूर्ती पुढें ठेवून रामचंद्र आरती करीत आहेत. तेहतीस कोटी देवांपैकीं कोण बरे असे हे धन्य देव कीं ज्यांची उपासना स्वतः प्रभु रामचंद्र करीत आहेत ? नारद डोळे ताणून ताणून पाहूं लागले......

अरें, हें काय ? हा तर लक्ष्मण, हा भरत आणि त्यांच्याहितर बसविला आहे तो कोण ? भक्तराज हनुमान. आश्चर्य ! आश्चर्य ! नारदांनीं कितीतरी वेळां भगवंताचीं सहस्र नामें गायिलीं होतीं, पण ' भक्ताचा भक्त ' हें ईश्वराचें नांव त्यांनीं कधींच ऐकलें नव्हतें !

आणि जेव्हां नारदांनीं हनुमानाच्या शेजारींच असलेली उभ्या शेंडीची लहानशी मूर्ति पाहिली तेव्हां तर बिचारे लाजेनें चूरचूर होऊन गेले आणि मुलाखतीचे प्रश्न न विचारतांच संछिन्नसंशय होऊन स्वारी तेथून माघारी फिरली.

# हनुमानजयंती

## चैत्री पौर्णिमा — १ दिवस

मुलें आणि तरुण या सणाला आपला सण समजतात. रामभक्त, रामसेवक बालब्रह्मचारी, ' बुद्धिमतां वरिष्ठ' असा हनुमान हाच विद्यार्थ्यांचा आदर्श बनूं शकतो. श्रीरामचंद्र अवतारकार्य संपवून निजधामाला गेले; पण हनुमान निरपेक्ष निरलसपणें

...३

रामकार्य चालविण्यासाठीं चिरंजीव होऊन मागेंच राहिला आहे. आपल्याला अवश्य ती सर्व प्रेरणा विद्यार्थ्यांना आर्य हनुमानाच्या आदर्शामधून घेतां येण्याजोगी आहे. या दिवशीं शाळेच्या कार्यक्रमांत खेळ, कसरत, आणि विशेषेंकरून मलखांब आणि कुस्ती ठेवली पाहिजे. समाजांत जाऊन काम करण्याची संधी असेल तर या दिवशीं कांहींतरी सेवेचें क्षेत्र नांगरलें पाहिजे. आखाडे नसतील त्या ठिकाणीं आखाडे स्थापणें, गरीब विद्यार्थ्यांना गायीचें दूध मिळावें म्हणून फंड काढणें इत्यादि कितीतरी करतां येण्याजोगें आहे.

हनुमानजयंतीच्या दिवशीं शिजविलेलें कांहींहि खायचें नाहीं असा कार्यक्रम, प्रकृतीला अनुकूल असेल तर, ठेवतां येण्यासारखा आहे. भीष्माष्टमीप्रमाणें या दिवशींसुद्धां-ब्रह्मचर्याची महत्ता विद्यार्थ्यांच्या मनावर ठसविली पाहिजे. कार्तिकस्वामी आणि हनुमान हे वज्रकाय सेनापती झाले याचें कारण त्यांचें कायावाचामनसा ब्रह्मचर्य हेंच आहे, ही गोष्ट विद्यार्थ्यांना समजली तर या सणाचें सार्थक झालेंसें म्हणतां येईल. हनुमानाला रुईच्या झाडाचें फूल आवडतें म्हणतात; ब्रह्मचाऱ्यांना अशींच फुलें आवडायचीं !

या दिवशीं वानरसेनेला आपलें संमेलन ठेवतां येईल.

# परशुराम आणि बुद्ध : : १०

## ( वैशाख शु॰ ३ )

द्रौपदी आणि सीता हे जसे वेगळे वेगळे आदर्श आहेत, तसे राम आणि कृष्ण हे पण वेगळे वेगळे आदर्श आहेत. प्राचीन काळापासून आपण या दोन आदर्शांमधील साधर्म्य आणि वैधर्म्य, साम्य आणि वैषम्य पहात आलों आहों. शेवटीं आपण दोन्ही आदर्शांतील सार आपल्या जीवनांत अुतरवून त्या दोहोंचा समन्वय करून टाकला आहे. ज्या दिवशीं अशा समन्वय आपण केला त्याच दिवशीं ' रामकृष्ण ' हें सामासिक नांव आपल्याला सुचलें. राम म्हणजेच कृष्ण, शांता म्हणजेच दुर्गा, शिव म्हणजेच रुद्र, जनार्दन म्हणजेच विश्वंभर, हें ज्या दिवशीं आपल्याला प्रतीत झालें त्यादिवशीं हिंदू तत्त्वज्ञानाला समाधांन मिळालें. तात्त्विक शोधांत एक पूर्णविराम झाला; पूर्णविरामापासून नवें वाक्य सुरू होतें. दोन आदर्शांच्या विवाहानें नवी सृष्टि उत्पन्न होते.

परशुराम आणि बुद्ध दोघेहि विष्णूचे अवतार मानले जातात. पण कल्पना-क्षेत्रांत सुद्धां आपण त्यांना कधीं काळीं जवळ जवळ आणले आहेत का ? परशुराम आणि बुद्ध ! दोघांमध्यें साधर्म्याचा किंवा वैधर्म्याचा कांहीं संबंध तरी आहे ?

परशुराम ब्राह्मण क्षत्रिय आहे; भगवान बुद्ध क्षत्रिय ब्राह्मण आहे. परशुराम ब्राह्मण असून सुद्धां त्यानें मन्यू ( क्रोधा )ला मोकळीक देऊन शरीरबळाचाच अव-लंब केला. शाक्यमुनीनें राजवंशी असूनहि क्षमेला प्रधानपद देऊन आत्मिक बलाचा गौरव वाढविला. परशुरामाला क्षत्रिय–सत्ता प्रजापीडक वाटली. ओश्वरानें मनुष्याला दोनच बाहू दिले आहेत, आणि तेहि अुद्योग करण्यासाठीं. क्षत्रिय जर सहस्त्रबाहु बनला आणि प्रत्येक बाहूनें जर शस्त्र धारण केलें तर दीन समाजाने जावें कोठें ? क्षत्रिय हा रक्षणासाठीं आहे; तोच जेव्हां प्रजाभक्षक बनतो तेव्हां प्रजेचें रक्षण कोण करणार ? परशुरामाला वाटलें कीं क्षत्रियाचा शास्ता ब्राह्मण आहे. गोष्ट खरी, पण क्षत्रियाला शासन करतांना ब्राह्मणानें आपलें ब्राह्मण्य मात्र सोडतां कामा नये. परशुरामानें हातांत मोठा परशु घेऊन सहस्त्रबाहूचे हात तोडायला सुरुवात केली. क्षत्रियांचा जुलूम दूर करण्यासाठीं त्यानें क्षत्रियांवर अेकवीस वेळा जुलूम चालविला.

परशुरामानें क्षत्रियाचे गुण अंगी आणले होते. क्षत्रिय म्हणजे शिपाई; सेनापतीचा हुकूम क्षणाचाहि विचार न करतां त्यानें झेलला पाहिजे. मातृभक्त परशुरामानें पित्याचा हुकूम होतांच मातेचा शिरच्छेद केला. ब्राह्मण हा ऐश्वर्यापासून लांबच राहतो. क्षत्रिय असतो तोच पृथ्वी जिंकतो आणि दान करतो. परशुरामानें 'जिंकणें आणि दान करणें' हाच मार्ग पसंत केला.

आतां बुद्ध पहा. त्यानें राज्याचा त्याग केला, स्वतःच्या शांतीच्या द्वारा मारावर विजय मिळविला, करुणेचा प्रचार केला. परशुरामामुळें क्षत्रिय भयभीत झाले आणि आत्मरक्षणार्थ त्यांनीं संघबळाचें साम्राज्य स्थापन केलें. भगवान बुद्धामुळें त्याचे शिष्य निर्वैर झाले, त्यांनीं अभयाचें साम्राज्य स्थापन केलें.

परशुरामाच्या कार्याचा परिणाम त्याच्या काळीं कितीहि झाला असला, तरी आज तो नसल्यासारखाच आहे. परशुरामामुळें साम्राज्याची कल्पना उद्भवली. साम्राज्याच्या कल्पनेनें दिग्विजयाचा मोह उत्पन्न केला. आणि दिग्विजयाची कल्पना म्हणजे निरंतर विग्रह. भगवान बुद्धांनीं धम्मपदांत म्हटल्याप्रमाणें जीत हें कलहाचें मूळ आहे. कारण, पराजित व्यक्तींच्या हृदयांत अपमानाचें शल्य सलतच राहातें आणि तें जगाला शांति भोगूं देत नाहीं.* भगवान् बुद्धांची छाप परशुरामापेक्षां खोलहि पडली आणि व्यापकहि झाली. परशुरामाचा मार्ग हिंसेचा होता; बुद्ध भगवानांचा अहिंसेचा होता. हिंसेमध्यें वीर्य नाहीं. हिंसेनें आजवर चांगल्या तत्त्वांचाहि नाश केला नाहीं किंवा वाईट तत्त्वांनाहि नष्ट केलें नाहीं. हिंसेनें दुष्ट लोकांच्या शरीराचा नाश केला तसा सज्जनांच्या शरीराचाहि तितकाच नाश केला. पण जगांत असलेली सज्जनता आणि दुर्जनता हिंसेपासून अस्पृष्टच राहिली आहे.

अहिंसेचा विजय स्थायी असतो, पण तो राज्यसत्तेची मदत न घेतां झाला असेल तर. सत्य आणि सत्ता परस्परविरोधी आहेत. जेव्हां जेव्हां सत्यानें सत्तेची मदत घेतली तेव्हा तेव्हां सत्य अपमानित झालें आणि अपंग बनलें. सत्याचा शत्रू असत्य नाहीं. असत्य हें अभावरूप आहे, अंधकाररूप आहे. सत्याला असत्याशीं लढावें लागत नाहीं. जेथें सत्याचा प्रकाश पोंचला नाहीं तेथेंच असत्याचा अंधकार असतो. असत्याला स्वतंत्र अस्तित्वच मुळीं नाहीं. सत्याचा शत्रू सत्ता हा आहे. परशुरामानें सत्तेच्या

---

* जयं वेरं पसवति दुःखं सेते पराजितो।
अुपसंतो सुखं सेति हित्वा जयपराजयं ॥

द्‌वारा-शरीरबळाचा प्रभाव पाडून सत्याचा म्हणजे न्यायाचा प्रचार करण्याचा प्रयत्न केला. बुद्‌ध भगवानाच्या अनुयायांनीं मुद्‌धां साम्राज्याच्या प्रतिष्ठेचा पाठिंबा घेऊन सत्याचा प्रचार करण्याचें योजिलें तेव्हां सत्य हें लज्जेनें संकुचित झालें.

परशुरामाच्या न्यायनिष्ठेचें आणि बुद्‌ध भगवानांच्या अवैरनिष्ठेचें मीलन झालें पाहिजे अशी वेळ आज आली आहे. मनांत यत्किंचितहि द्वेष किंवा विष न ठेवतां अन्यायाला तोंड देणें, सत्तेशीं दोन हात करणें हाच आजचा युगधर्म आहे. हाच सत्याग्रह नव्हे काय ?

१९२२.

# अक्षय्यतृतीया

## ( परशुराम जयंती )

**वैशाख शु० ३** **-॥- दिवस**

अक्षय्यतृतीया हा कृतयुगाच्या आरंभाचा दिवस आहे. या दिवशीं सत्य आणि अहिंसेची मीमांसा करावी. शेतकऱ्यांचें वर्ष या दिवसापासून सुरू होतें. म्हणून श्रम-जीवनाच्या महत्त्वाचें आज निरूपण करावें. अक्षय्यतृतीयेपासून झाडांना नियमित पाणी पाजण्याकडे विशेष लक्ष दिलें पाहिजे. शेतीला अनुसरून या दिवसाचा कांहीं कार्यक्रम ठेवतां आला तर ठेवावा.

श्रमजीवी, बुद्‌धिजीवी, भांडवलजीवी आणि भिक्षाजीवी लोकांच्या जीवनाच्या तारतम्याचें या दिवशीं खूप विवेचन करावें.

दर अमावास्येला समुद्राला भरती येते खरी पण चैत्री अमावास्येनंतर येणाऱ्या अक्षय्यतृतीयेची भरती दुसऱ्या सर्व भरतींना मागें टाकतें असें म्हणतात.

हाच दिवस परशुरामजयंतीचाहि आहे, परशुरामाचें चरित्र जाणल्यानंतरच श्रीराम-चंद्रांच्या अवताराचें रहस्य लक्षांत येऊं शकेल. ब्राह्मण आणि क्षत्रिय यांच्यामधील झगडे मिटवून दोघांना विश्वकल्याणाकडे वळविण्याचें काम श्रीरामचंद्रांनीं केलें; पण हे झगडे कशा प्रकारचे होते, कुठवर चालले हें सर्व आपल्याला परशुरामाच्या चरित्रा-मधूनच मिळूं शकेल. क्षत्रियरक्तानें कुंडें भरून काढणारा परशुराम हा ब्राह्मणधर्माचा अधःपात सुचवितो.

# धर्ममणि शंकराचार्य :: ११

## ( वैशाख शु० १० )

या कलिकाळांतील याज्ञवल्क्य आणि व्यास म्हणजे आपले शंकराचार्य. 'मुहूर्तं ज्वलनं श्रेयः नच धूमायितं चिरम्' (क्षण भडका उत्तम वाटे। धुमसणें नको चिरकाल ॥ ) हा जणूं त्यांचा जीवनमंत्र होता. बत्तीसाव्या वर्षी हिमालयांत देह सोडून परमात्म्यांत विलीन होणाऱ्या या संन्याशाची विभूति हिमालयाहून यत्किंचितहि कमी नव्हती. काळे फत्तर आणि शुभ्र बर्फ यांखेरीज जेथें कांहींच मिळायचें नाहीं अशा हिमालयाच्या शोभेशीं शंकराचार्यांच्या अद्वैत वेदांताच्या तत्त्वज्ञानाची तुलना करतां येईल. वनस्पतींना ज्या ठिकाणीं कांहींहि अवकाश नाहीं अशा हिमालयामधूनच वनस्पतिसृष्टीच्या आणि म्हणून प्राणिमात्रांच्या माता सिंधु, सतलज, गंगा, यमुना, शरयू आणि ब्रह्मपुत्रा यांसारख्या नद्या जशा निघतात आणि देशाला समृद्ध करतात त्याचप्रमाणें शंकराचार्यांच्या अद्वैत सिद्धांतामधूनच ज्ञान, भक्ति, कर्म आणि उपासना-रूपी नद्या वाहतात आणि हिंदुधर्माला आजचें बहुरूपी समृद्ध आणि संघटित रूप देतात.

शंकराचार्यांच्या चरित्रांत करुण आणि अद्भुत, वीर आणि शांत सर्वच रस भरलेले आहेत. शंकराचार्यांची मातृभक्ति त्यांच्या प्रखर ज्ञाननिष्ठेहून यत्किंचितहि उतरती नव्हती. वासनांवर विजय मिळविणारा हा वैराग्यवीर हृदयधर्माचा द्रोही झाला नव्हता.

शहाण्या लोकांनीं भ्याड बनून संन्यासधर्माला हिंदुधर्मांतून रजा दिली होती. या संन्यासधर्माचा शंकराचार्यांनीं पुनरुद्धार केला, आणि संन्याशांचे दहा वेगवेगळे पंथ स्थापन करून दिले. संन्याशांच्या रूढ धर्माला खुंटीवर अडकवून त्यांनीं आपल्या मातेच्या अंतकाळीं तिची सेवा केली आणि तिचें श्राद्धहि केलें. भेदमात्राचा नाश केला असूनसुद्धां भक्तिमार्गाच्या ओलाव्यानें हिंदुधर्माला त्यांनीं सजीव केलें. आणि या जगताला मायारूप ठरवूनहि याच जगताची धर्मसंस्था संशुद्ध केली, तिचें संघटन केलें.

पुरी, बद्रीनारायण, द्वारका आणि शृंगेरी या चार कोपऱ्यांना चार मठ स्थापून शंकराचार्यांनी धर्माचें अध्ययन, धर्माचा प्रचार आणि धर्म–व्यवस्थेची रचना चालती करून दिली.

आपले लोक शंकराचार्यांच्या अद्वैत वेदांताच्या दार्शनिक आणि तार्किक बाजूचाच फक्त अभ्यास करतात. अद्वैत म्हणजे गरीब–श्रीमंत यांच्यामधील अभेद, पापी–पुण्यवान यांच्यामधील अभेद, स्त्री–पुरुष यांच्यामधील अभेद, जीवात्मा आणि परमात्मा यांच्यामधील अभेद, सर्व प्रतिष्ठितांमधील अभेद, या अद्वैताच्या बाजूचें महत्त्व आपले लोक लक्षांतच घेत नाहीत ही दुःखाची गोष्ट आहे. अद्वैताच्या सिद्धांतावर रचलेलें समाजशास्त्र आपण कोठें अजून उत्पन्न केलें आहे ?

मायावादाचा परिणाम म्हणून आपल्यावरील जबाबदारी विसरण्याऐवजी लोक जर आपलें दुःख विसरतील, आपला दुबळेपणा विसरतील, दुसऱ्यांनी केलेला अपकार आणि अपमान विसरतील आणि हें सर्व मायारूप आहे असें ओळखतील तर किती बरें चांगलें होईल ? सर्वांचा आत्मा ओकच आहे याविषयीं ज्याना शंका नाहीं त्यानी आतां हें जाणलें पाहिजे कीं सर्वांचें मन आणि हृदयसुद्धां एकच आहे. सुखदुःख, हित-अहित, उन्नति आणि अवनति अशा सर्व परिस्थितींत आपण जगाशीं जोडलेले आहोंत, ओकरूप आहोंत, एवढें जर मनुष्यजातीनें समजून घेतलें तर ऐहिक आणि पारलौकिक असे दोन्ही मोक्ष साधतील. या रीतीनें पाहिलें तर शंकराचार्यांचें काम येथून पुढें सुरू व्हावयाचें आहे.

× × × ×

गंगाकांठीं उत्तराखंडांत असलेलें श्रीनगर सिद्धपाठ म्हटले जातें. या ठिकाणी केलेली साधना फुकट जात नाहीं आणि ती शीघ्रफलदायी असते. देवीभागवतांत या स्थानाचें माहात्म्य पुष्कळ सांगितलें आहे. पूर्वी येथें श्रीचक्र ज्यावर कोरलेलें आहे अशा एका दगडाची पूजा होत असे. प्राचीन काळीं या स्थानी रोज एक नरमेध होत असे म्हणतात. आद्य शंकराचार्य जेव्हां श्रीनगरला आले तेव्हां मनुष्यवधाचा हा अनाचार पाहून त्यांची धर्मभावना खवळली. त्यांनीं ओक प्रहार घेऊन तो श्रीचक्राचा दगड उलटविला आणि आज्ञा केली की, आजपासून नरमेध बंद.

प्रस्थानत्रयीवर भाष्य लिहून आणि नितांतरमणीय अशीं स्तोत्रें लिहून शंकराचार्यांनीं हिंदुधर्माची जी सेवा केली आहे, तिच्यापेक्षां हो नरमेध बंद करण्याची सेवा

अुच्च आहे याविषयीं कोणाला शंका आहे काय? भाष्य लिहिण्याला बुद्धिवैभव लागतें; स्तोत्रें रचण्याला भक्ति नसली आणि केवळ कल्पना-अुल्हास असला तरी चालतें; पण अत्यंत प्राचीन काळापासून चालत आलेली घातकी रूढी कडव्या समाजाच्या विरुद्ध जाअून एकदम बंद करायला लावायची म्हणजे त्यासाठीं तपस्तेज, धर्मनिष्ठा आणि हृदयसिद्धीच अवश्य आहे.

नरमेध बंद केल्याची ही हकिकत जेव्हां मी अैकली तेव्हांपासून शंकराचार्यांची ठेंगणी आणि स्थूल मूर्ति-भगवीं वस्त्रें, रुद्राक्षमाळा आणि भस्मविलेपनानें मंडित व आगलात् मुंडित अशी मूर्ति-डोळ्यांपुढून हलतच नाहीं. कर्मकांडी निर्दय शाक्त चहूं-बाजूंनीं हाहाःकार करीत आहेत, आणि त्यांच्यामध्यें हातीं पहार घेअून ती संन्याशाची मूर्ति उभी आहे; अेकाहि ' कर्म 'वीराला जवळ यायची हिंमत नाहीं; आणि हा ज्ञान-वीर तपस्वी थरथरणाऱ्या ओठांनीं अेकेकाला अथवा सर्वांना मिळून शास्त्रार्थ करण्या-साठीं आह्वान करीत आहे; पण कोणाचीहि बुद्धिप्रभा या धर्ममूर्ति, दिग्विजयी संन्याशापुढें आपलें तेज पाडूं शकत नाहीं. " ब्राह्मणा भगवन्तो यो वः कामयते स मा पृच्छतु, सर्वे वा मा पृच्छत, यो वा कामयते तं वः पृच्छामि, सर्वान् वा वः पृच्छामीति । ते ह ब्राह्मणा न दधृषुः । "

भेदामध्यें अभेद पहाणें ही गीतेची शिकवण शंकराचार्यांनीं हिंदूंच्या अुपासनेंत-सुद्धां संपूर्णपणें विणून काढली. तेहतीस कोटी देवदेवींनींसुद्धां पोट न भरणाऱ्या आपल्या लोकांनीं आर्य-अनार्य, स्वदेशी-परदेशी, नवें-जुनें, चांगलें-वाअीट, देव, पीर, भूतप्रेत वगैरे अनेक अुपास्यांची खिचडी केली होती. या सर्वांमधून पांच देवांचें आयतन बसवून बाकी सर्व देवदेवी म्हणजे या पांचांचेच अवतार आहेत असें ठरवून शंकराचार्यांनीं व्यवस्था करून दिली कीं, या पांचांमधून वाटेल त्या अिष्टदेवतेची पूजा करा पण तिच्याभोंवतीं बाकीचे चार देव बसवूनच ही पूजा व्हावी.

पंचायतन पूजेंत सर्व देवांचा समन्वय आणि अभेद त्यांनीं सुचविला त्या दिवसा-पासून हिंदु अुपासनापद्धतींत समन्वय आला आणि विग्रह मिटला. सर्व-समन्वय आणि अभेद ही श्रीआद्यशंकराचार्यांची हिंदुधर्माला मोठ्यांत मोठी देणगी आहे.

२५-५-३८

# शंकरजयंती

**वैशाख शु० १०** **-॥- दिवस**

अद्वैतसिद्धांताच्या दार्शनिक दृष्टीनें हा सण साजरा करावयाचा नाहीं. यांत सर्व मताच्या लोकांना भाग घेतां यावा अशा रीतीनें तो साजरा झाला पाहिजे. श्री-शंकराचार्यांची धर्मनिष्ठा, ईश्वरपरायणता, शास्त्राध्ययन, आणि हिंदुधर्मात नवी व्यवस्था आणण्याची त्यांची शक्ति इत्यादींमुळें त्यांचें कार्य अखिल जनतेला बोधप्रद असें झालें आहे. या दिवशीं शंकराचार्यांचीं आणि इतरांचीं स्तोत्रें गाण्याचा आणि त्यावर विवेचन करण्याचा कार्यक्रम ठेवावा.. सामाजिक आणि राष्ट्रीय अद्वैताच्या दृष्टीनें ब्राह्मणापासून अंत्यजापर्यंत सर्वांचा आत्मा सारखाच आहे. याविषयीं विवेचन हा या दिवसाचा मुख्य कार्यक्रम असला पाहिजे. ईश्वराची उपासना हेंच सत्य, आणि जगाची उपासना हा मायामोह आहे याविषयीं मतभेद असणार नाहींच.

या दिवशीं मोहमुद्गर स्तोत्र गावें आणि त्याच्या प्रसंगाचें वर्णन करावें.

# बोधिजयंती : : १२

## ( वैशाख शु. १५ )

### १ बोधिप्राप्ति.

महत्प्रयासानें कोलंबसानें अमेरिकेला जाण्याचा रस्ता शोधून काढला. आपल्याला कांहीं आतां हे प्रयास करावे लागत नाहींत. महत्प्रयासानें भगीरथ गंगा घेऊन आला. आपल्याला कांहीं आतां हे श्रम करावे लागत नाहींत. अेकानें कष्ट केले, जगाला लाभ झाला. कृतज्ञतापूर्वक त्याचें स्मरण करणें, त्याचें श्राद्ध करणें याहून अधिक कांहीं आपल्याला करावयाचें अुरत नाहीं.

या भवचक्रांतून सुटून जाण्याचा रस्ता वैशाख शुद्ध पूर्णिमेच्या दिवशीं शाक्य-मुनी गौतमानें शोधून काढला, आणि तो बुद्ध झाला. आतां चिंता करण्याचें आपल्याला कांहीं कारण नाहीं. बुद्ध भगवानाचें स्मरण करून त्यानें दाखविलेल्या ‘ अष्टांगिक ’ नांवाच्या राजरस्त्यावरून सरळ चालत जाणें अेवढेंच आपलें काम आहे. श्रद्धा असेल तर मार्ग दाखविणाऱ्या या अृषींचें तर्पण अथवा श्राद्ध केलें तरी नें वरकड. पण मोक्षाचा रस्ता, निर्वाणाचा मार्ग, स्वर्गाचें राज्य मिळविण्याचें साधन अितकें सोपें नाहीं. वेदकाळच्या अृषींनीं हा रस्ता शोधून काढला होता, तरी शाक्य-मुनीला आणि महावीराला तो पुनः शोधावा लागला. ‘ महता कालेन ’ हा रस्ता पुनः पुनः नष्ट होतो, आणि तो पुनः पुनः शोधावा लागतो. युगायुगालाच काय, व्यक्ती-व्यक्तीच्या हृदयांत परमेश्वराला अवतार घ्यावा लागतो, बोधीला प्रगट व्हावें लागतें; आणि तत्पूर्वी प्रत्येक व्यक्तीला माराबरोबर झगडावें लागतें, सैतानाशीं लढावें लागतें. प्रत्येक व्यक्तीच्या वाटेंत कामक्रोधादि परिपंथी ( वाटमारे ) आहेतच, त्यांच्याशीं दोन हात केल्याखेरीज योग प्राप्त होत नाहीं, बोधि मिळत नाहीं. प्रत्येकानें आपणहून हा अमृतकुंभ मिळविला पाहिजे; मिळेपर्यंत सावधान राहिलें पाहिजे. बुद्ध भगवान जसे माराबरोबर लढले तसें प्रत्येकानें लढलें पाहिजे. बुद्ध भगवान जसे—

अिहासने शुष्यतु मे शरीरं
त्वगस्थिमांसं प्रलयं च यातु । ’

( या ठिकाणीं माझें शरीर सुकून जावो, आणि हाडे मांस चामडें याचा लय होवो )—अशा निश्चयानें बोधि ( ज्ञान ) प्राप्त करून घेण्यासाठीं ठाण मांडून बसले होते तसेंच प्रत्येकानें बसलें पाहिजे; आणि ज्याप्रमाणें बुद्ध भगवानांना बोधि मिळालें आणि ते तृष्णाविरहित झाले तसें होण्याचा व मोक्ष मिळविण्याचा मार्ग प्रत्येक व्यक्तीला मोकळा आहे. त्या मार्गानें जाणें हें प्रत्येकाचें कर्तव्य आहे आणि जेव्हा त्या मार्गानें आपल्याला बोधि मिळेल तेव्हांच आपल्या हृदयांत, आपल्या जीवनांत बोधिजयंतीचा खरा उत्सव होईल. तोपर्यंत विश्वास दृढ करण्यासाठीं, श्रद्धावृक्षाला सिंचन करण्यासाठीं बुद्ध भगवानांच्या बोधिजयंतीनिं आपण स्मरण करू या.

मे, १९१८

# २ भगवान बुद्ध

## १

हिमालयाच्या पायथ्याशीं, नेपाळच्या हद्दांत कपिलवस्तु नावाचें एक लहानसे राज्य होतें. तेथें कोणी राजा नव्हता. तेथील शाक्य लोकांत जी काहीं मोठीं मोठीं घराणीं होतीं त्या घराण्यांचे पुढारी मिळून आपलें एक लहानसें राज्य चालवीत असत. या पुढाऱ्यांना ' राजा ' म्हणत. राजा शुद्धोदनाला मोठा सम्राट होण्याची महत्त्वाकांक्षा होती.

या राजाच्या राणी मायादेवीनें एका पुत्राला जन्म दिला. राजानें जातक वर्तवायला लावलें. ज्योतिषीबुवांनी सांगितलें, ' राजा, तुझ्या भाग्याला सीमा नाही. अरे, हा तुझा मुलगा एकतर साऱ्या पृथ्वीचा सम्राट होईल, नाहींतर धर्मसम्राट होईल. याच्या मनांत वैराग्य उत्पन्न झालें तर मात्र हा धर्मसम्राटच होईल. '

राजानें विचारलें, ' वैराग्य कशानें उत्पन्न होतें ? ' शहाण्या ज्योतिष्यानें सांगितलें, ' जन्म, जरा, व्याधि आणि मृत्यु यांचें दुःख पाहिल्यानें.'

तर मग भविष्यावर आपण मात करूं असा राजानें निश्चय केला. मुलाला या चार वस्तू दिसूंच नयेत अशा रीतीनें त्याला ठेवं म्हणजे झालें. उन्हाळ्यांतला महाल वेगळा, हिंवाळ्यांतला वेगळा. आणि पावसाळ्यांतला तर त्याहूनहि वेगळा. घरांत कोणी आजारी, म्हातारा किंवा दुर्मुखलेला नोकर मिळायचा नाहीं. राजमहालाच्या बागेंत

झाडावर कोमेजलेलें फूल किंवा पिवळें पडलेलें पान दिसायचें नाहीं. सगळीकडे सुगंध, संगीत आणि काव्यसाहित्यच असावें अशा रीतीनें आपल्या मुलाला ठेवूं म्हणजे झालें.

पुत्र गौतम अशा स्थितींत राहिला. पण अशा सुखानें कां कुणी सुखी होणार आहे ? त्याला सगळ्या गोष्टींचा कंटाळा वाटूं लागला. लहानपणापासूनच त्याची बुद्धि विलक्षण होती, आणि पुष्कळ वेळां तो गहन विचार करीत बसत असे. बापानें विचार केला कीं मुलाचें लग्न लावून दिलें म्हणजे तो ठिकाणावर येईल. मुलानेंहि तें मान्य केलें. एका स्वयंवरांत जाऊन आपलें युद्धकौशल्य, बुद्धिकौशल्य आणि कला-कौशल्य सिद्ध करून, हा सिद्धार्थ कुमार रूपरमणी यशोधरेशीं विवाह करून तिला घरीं घेऊन आला. बापाला वाटलें आतां मुलगा विलासांत बुडून जाईल. पण मुलगा विचारांतच बुडून गेला. त्याला वाटूं लागलें, हें जग म्हणजे आहे तरी काय ? जें आजूबाजूला आहे तें सारे पोकळ पोकळ भासत आहे. मुलानें बापाजवळ मागणी केली कीं मला खरे जग बघायचें आहे. बापाच्या पोटांत धस्स झालें, नाहीं म्हटलें तर मुलाला दुःख होईल आणि या दुःखानें कदाचित् त्याच्यांत वैराग्य उत्पन्न होईल. आणि होय म्हणावें तर काय होईल परमेश्वर जाणे !

बापानें सगळी नगरी शृंगारली आणि कोणीहि रोगी, वृद्ध किंवा अशक्त मनुष्यानें बाहेर पडूं नये अशी दवंडी दिली. पण मुलाला पहायचें होतें खरें जग. तो सगळी-कडे फिरला—सर्व कांहीं बघितलें. दरवाजापाशीं येऊन त्यानें सारथ्याला गांवाच्या बाहेर रथ हांकायला सांगितलें. तेथें एक दुबळा, अपंग आणि दुःखानें पीडलेला वृद्धपुरुष त्याच्या पाहाण्यांत आला. त्याला पाहून त्यानें सारथ्याला विचारलें, 'छन्ना ! हें काय आहे ? ' सारथ्यानें समजावून सांगितलें, ' महाराज, हा म्हातारा आहे, रोगी आहे, दुःखी आहे; थोड्या दिवसांनीं हा मरून जाईल ! '

कुमारानें फिरून विचारलें, ' असें का ? '

छन्न म्हणाला, ' महाराज, हा जगाचा नियम आहे. जे जन्माला आले आहेत त्या सर्वांना रोग, दुःख, म्हातारपण आणि मरण हीं यायचींच. तीं टळायचीं नाहीत. साऱ्या जगाची हीच दशा व्हावयाची. '

' याला कांहीं औषध नाहीं ? ' कुमारानें विचारलें.

कुमाराच्या हृदयांत जन्म, मृत्यु, जरा आणि व्याधीचें हें दर्शन तीरासारखें घुसलें. लहानपणापासूनच जर या गोष्टी त्याच्या दृष्टीस पडल्या असत्या तर आपल्या-

प्रमाणे त्याचेंहि हृदय कठीण बनलें असतें. पण आजवर कधींहि न पाहिल्यामुळें कुमाराला तें असह्य झालें. तत्क्षणींच त्यानें मनाशीं निश्चय केला, ' या दुःखामध्यें राहाण्यांत कांहीं पुरुषार्थ नाहीं. सारा जनसमाज दुःखांत बुडलेला आहे, यावर कांहीं औषध असलेंच पाहिजे. आणि तें मी शोधून काढणारच. अरे, सगळा देश अशा दारुण दुःखांत तापून चालला असतांना चैन कसली करायची? बायकोबरोबर प्रणय काय करायचा? मुलाचा मोह कसला धरायचा? ( कुमाराला यावेळीं एक मुलगाहि झाला होता ). ज्याचा मी उद्धार करूं शकत नाहीं, त्याचा मी उपभोग तरी कसा घेऊं? मी माझीं हीं २७ वर्षे फुकट फुकट घालविलीं?

कुमाराच्या हृदयांत वैराग्यानें प्रवेश केला आणि त्यानें घराचा, राज्याचा, पत्नी यशोधरेचा आणि पुत्र राहुलाचा त्याग केला. पिता रडत होता, माता मायादेवी तर याच्या जन्मानंतर सातव्या दिवशींच मरून गेली होती. सावत्र आई जी महाप्रजापति ( जी त्याची मावशीहि होत होती ) तिनें तर रडून ओरडून आक्रंद केला. पण कुमार घर सोडून गेला तो गेलाच.

अनोमा नदीच्या कांठीं जाऊन कुमारानें डोक्यावरील लांब लांब सुंदर केस कापून टाकले, रेशमाचीं कोमल बहुमोल वस्त्रें फेंकून दिलीं, आपल्या प्रिय कंथक घोड्याची रजा घेतली आणि महाभिनिष्क्रमण केलें.

पहिल्या प्रथम भिक्षा मागून आणली तेव्हां रात्रीचे शिळे आणि अगदीं वाळून गेलेले भाकरींचे तुकडे कांहीं केल्या घशाखालीं उतरेनात. राजविलासी जीवन आणि तपस्वी जीवन यांमध्यें दारुण युद्ध चालले. पण एका क्षणांतच तें संपलें. त्यानंतर कधींहि ही अडचण नडली नाहीं.

गुरूच्या शोधांत त्यानें अनेक दिवस काढले. त्या काळच्या समाजामधून आणि शास्त्रामधून जेवढें मिळविण्याजोगें होतें तेवढें त्यानें मिळविलें; शिकतां येण्याजोगें होतें तेवढें शिकून घेतलें; तरी शांति मिळाली नाहीं. जगाला शांति देतां येईल असें औषध हातीं आले नाहीं. नानाप्रकारचे योग करून पाहिले, देंहदंडन केलें, पण कांहीं पत्ता लागेना.

शेवटीं बिहारच्या धन्य प्रदेशांत, निरंजरा नदीच्या कांठीं तो अनशन व्रत घेऊन बसला. डोक्यांत विचार भट्टीप्रमाणें पेटत होते. अशुद्ध विचार जळूं लागले, जगाचें रहस्य वितळूं लागलें, आणि तपस्व्याची खात्री झाली की यानंतरची यात्रा-अनुभवाची

यात्रा- अशा कायाक्लेशानें. देहाला दुःख देऊन होणार नाहीं, तर सुख आणि दुःख सोडून मधली जी समान स्थिति आहे ती धारण करण्यानेंच पुढें जातां येईल.

तपस्व्यानें पुनः आहार सुरू केला. आसपास गोळा झालेल्या साधकांनीं विचार केला कीं तपस्वी हरला, ढिला पडला. आतां याच्याबरोबर राहाण्यांत कांहीं अर्थ नाही. सर्व त्याला सोडून निघून गेले. पण तपस्वी आपला धीमेपणानें पुढें चाललाच होता.

अंती शेवटची घटका येऊन पोचली. महायुद्ध सुरू झालें. मनुष्यजातीचा शत्रु, हृदयस्वामीचा प्रतिस्पर्धी आणि कुटिल तर्काचा आद्य गुरु जो ' मार ' त्यानें आपली दहा प्रकारची सर्व सेना या दयामय विश्वबंधूवर सोडली.

अहोभाग्य या मनुष्यजातीचें कीं शेवटीं वैशाख पूर्णिमेच्या त्या रात्रीं ' मारा ' चा पराभव झाला आणि सिद्धार्थ खरोखर सिद्ध-अर्थ झाला, तथागत बुद्ध बनला.

## २

ज्यानें स्वतःचा उद्धार केला तोच जगाचा उद्धार करूं शकेल, जो स्वतः जागा झाला तोच जगाला जागें करील. बुद्ध म्हणजे जागा झालेला. ज्या क्षणीं सिद्धार्थ ' मारजित ' झाला त्याच क्षणीं सगळ्या विश्वाचें रहस्य त्याच्या दृष्टीपुढें खुलें झालें आणि तो लोकजित होण्याला लायक बनला.

आपण देहधारी आहोंत तितक्या अंशांनीं निसर्गाच्या नियमाला वश आहोंतच असें त्याला दिसून आलें. निसर्गाचें दुःख टाळतां येण्यासारखें नसेल कदाचित, पण तें असह्य नसतें. जन्म, जरा, व्याधि, मरण, प्रिय वस्तूचा वियोग आणि अप्रिय वस्तूचा संयोग या गोष्टी नेहमीं चालायच्याच. विवेकानें त्याचें स्वरूप समजून घेतलें तर त्याचें दुःख हलकें होतें. जगांत मोठ्यांत मोठें दुःख आपण स्वतःच उत्पन्न करीत असतों. कधींहि शमणार नाहीं अशी आपली तृष्णाच आपल्याला दुःखांत बुडविते, आणि अनंतकाळपर्यंत दुःखरसांत आपल्याला टाकून देऊन आपल्या साऱ्या जीवनाचें कडू लोणचें बनवून टाकते.

ही तृष्णा मरणार नाहीं तोंवर आपल्या दुःखाचा अंत होणार नाहीं. आणि ही तृष्णा एकदां मेली म्हणजे दुःखाचें कांहींच कारण नाहीं. मग जी कांहीं स्थिति राहते

तोच आपला वारसा. ती स्थिति कशी असेल याची आज कशाला चर्चा ? रोग नाहींसा झाल्यावर काय होईल ? काय व्हायचें ? कल्याणच.

या स्थितीचें नांव निर्वाण. मुक्त झालेल्या सर्व जीवांचें हेंच धाम.

पण हें ज्ञान ऐकणार कोण ? हें औषध घेणार कोण ? या पंथानें जाणार कोण ? सगळे जग तृष्णेच्या पाठीमागें लागलें आहे. तृष्णेचा नाच चालूच राहायचा. अरेरे, तर मग काय कोणाचा उद्धार होणारच नाहीं ? इतक्या श्रमानें मिळविलेलें औषध काय फुकटच जाणार ?

त्या करुणामूर्तीनें पुनः विचार केला. प्रसन्न हृदयांतून उत्तर मिळालें, ' जे शुभ, संस्कारी आहेत त्यांच्याविषयीं मैत्रीभाव राखला; जे वैभवशाली आहेत त्यांच्याविषयीं मुदिता अंगीं आणली, अर्थात् त्यांचें सुख पाहून आनंद मानला; जे दुःस्थित किंवा दुःखी आहेत त्यांचा कंटाळा किंवा तिरस्कार न करितां त्यांच्याविषयीं करुणाभाव ठेवला; आणि जे दुष्ट वृत्तीचे आहेत, जे जिकडे तिकडे द्रोहच पसरवितात आणि अकारण वैर धरतात त्यांच्या विषयीं द्वेषाऐवजीं कमीत कमी उपेक्षाभाव ठेवला तर सर्व जगांत विजयच आहे. '

या चार वृत्ती म्हणजेच ब्रह्मदेवाचीं चार मुखें. या चार मुखांतच चारी वेद सामावले आहेत. हें पाहून बुद्ध भगवान जगाची सेवा करायला निघाले, आणि धर्मचक्र फिरूं लागलें.

## ३

ज्यांच्याकडून कर्ज काढून एवढे ज्ञान मिळविलें त्यांच्या ऋणांतून प्रथम मुक्त झालें पाहिजे. बुद्ध भगवान आहार करूं लागले हे पाहून ज्या शिष्यांनीं पूर्वी त्यांचा त्याग केला होता त्या शिष्यांकडे प्रथम ते गेले. मग काय विचारतां ? प्रत्येक दुःखी मनुष्य त्यांच्याकडे येऊं लागला. ब्राह्मण आले आणि आणि नापित आले, योगी आले आणि यती आले, श्रीमंत आले आणि दरिद्री आले; ज्यांच्याजवळ हजारो शिष्य होते असे अभिमानी गुरू आले, आणि ज्यांच्यामागें त्यांचें स्वतःचें मन किंवा शरीर हि जात नव्हतें असे दुबळे लोकहि आले.

संघ वाढला आणि संघाची सेवा करणारे गृहस्थहि वाढले. मोठमोठे विहार बांधले गेले. मोठमोठे राजेलोक बुद्ध भगवानांचा सल्ला घेण्यासाठे येऊं लागले.

यक्ष, गंधर्व, किन्नर सर्वांना निर्वाणाचा रस्ता मिळाला, आणि धर्मचक्र पूर्ण वेगानें फिरूं लागलें.

४

बिचाऱ्या यशोधरेचें काय बरें झालें असेल ? राहुलाचे कोण बरें लाड पुरवीत असेल ? राजा शुद्धोदनाला दुसरा मुलगा झाला होता पण सिद्धार्थाला तो कसा बरें विसरणार ? आपल्या मुलाची कीर्ति अैकून त्यानें दूत पाठविला. पण हा दूत कसचा मागें जातो ? तो शिष्य बनून संघांत दाखल झाला. दुसरा दूत गेला, त्याचीहि तीच स्थिति. आतां तिसरें कोण जाणार : शेवटीं वृद्ध अमात्य गेले. भगवानांच्या सत्संगाचा अेक वर्षभर आनंद अनुभवल्यानंतर त्यांना राजाचा निरोप आठवला, आणि मग ते बुद्धभगवानाला बापाकडे घेअून गेले. बुद्धांनीं चिरविधुरा यशोधरा, बालक राहुल आणि वृद्ध शुद्धोदन या सर्वांना अुपदेश केला, आणि ते भिक्षेला निघाले. किती शरमेची, नामुष्कीची गोष्ट कीं राजाचा मुलगा गल्लोगल्लीं भिक्षा मागायला जात आहे ! राजानें सांगितलें, ' बाळा, आपल्या कुलपरंपरेंत भिक्षा नाहीं. ' मुलगा बोलला, ' राजन्, तुमची कुलपरंपरा वेगळी आहे. माझी कुलपरंपरा बोधिसत्वांची आहे. ते नेहमीं गरीबांच्या संगतीला राहात आले आहेत, आणि लोकांनीं स्वेच्छेनें दिलेलें भिक्षान्न खात आले आहेत. '

५

महाप्रजापतीनें विचार केला कीं बहिण तर मुलाला जन्म देअून मरून गेली. त्या दिवसापासून सिद्धार्थाला मी वाढविला. आज तोच मुलगा जगाचा अुद्धारक बनला आहे. मी त्याच्याकडे जाअून दीक्षा कां घेअूं नये ? शाक्यकुळांतील पुष्कळ राजकन्या महाप्रजापतीबरोबर बुद्धभगवानाला भेटायला निघाल्या. प्रवासाचे कष्ट सहन करतांना त्यांचे पाय सुजले. त्यांनीं बुद्ध भगवानाला विनवणी केली कीं आम्हांलाहि संघांत स्थान द्या. भगवानांनीं सांगितलें; ' तें होणार नाहीं. माझा संघ बिघडेल. ' स्त्रियांमध्ये भयंकर निराशा पसरली. तेव्हां बुद्ध भगवानांचा प्रिय शिष्य आणि सेवक आनंद यानें विचारलें, ' तर मग काय, भगवन्, स्त्रियांना धर्माचा साक्षात्कार अशक्य आहे? ' बुद्धानीं सांगितलें, ' असें नाहीं. त्यांनाहि निर्वाणाचा सारखाच अधिकार आहे, त्यांनाहि धर्म जाणण्याची बुद्धि आहे. ' शेवटीं

बुद्ध भगवानांनीं स्त्रियांसाठीं अेक स्वतंत्र संघ काढला. या संघांतहि अत्यंत धर्मनिष्ठ आणि अधिकारी व्यक्ती होअून गेल्या.

आयुष्याच्या अैशीं वर्षापर्यंत धर्माचा अुपदेश करून कुशीनारा नामक स्थानावर त्यांनें आपला पवित्र देह सोडला. हळू हळू बुद्ध भगवानांचा अुपदेश पृथ्वीवर फैलावूं लागला. पाटलिपुत्राच्या महान् राजा अशोकवर्धनानें बौद्धधर्मोपदेशकांना देशदेशांतराला पाठवून तथागताचा (बुद्ध भगवानाचा) अुपदेश सगळ्या जगाला अैकविला. आज चीन, जपान, ब्रह्मदेश, सीलोन वगैरे देशांमध्यें बौद्ध धर्म चालत आहे. आणि बुद्ध भगवानाचा अुपदेश तर सगळ्या जगांतील सगळ्या विचारवंत लोकांच्या गळीं अुतरूं लागला आहे.

आक्टोबर, १९३६.

## ३ आशियाचा धर्मसम्राट्.

महाभारतीय युद्धानंतर कितीतरी काळ लोटला. हिंदुस्थानांत सगळीकडे लहान लहान राज्यें झालीं. कित्येक राजे तर पांच दहा गांवांचेच मालक होते. कित्येक राज्यांत राजे नव्हते पण अब्रूदार कुळांतील पुढारी निगम सभेंत बसून राज्यकारभार चालवीत. या पद्धतीला महाजनसत्ताक पद्धति म्हणतात. हिमालयाच्या पायथ्याशीं नेपाळजवळ शाक्य लोकांचें असें एक राज्य होतें. तेथें कपिलवस्तु नांवाच्या नगरांत शुद्धोदन नांवाचा राजा राज्य करीत होता. त्या राजाला सिद्धार्थ नांवाचा अेक सुलक्षणी पुत्र झाला. ज्योतिषांनीं भविष्य वर्तविलें कीं हा राजपुत्र अेकतर चक्रवर्ती राजा होअील किंवा जगताचा अुद्धार करणारा अेक धर्मसम्राट् होअील. त्याला जर वैराग्य अुत्पन्न झालें तर तो दुसरा मार्ग पत्करील. राजानें विचार केला कीं म्हातारपण, रोग आणि मरण बघून माणसाला वैराग्य अुत्पन्न होतें, म्हणून या तीन्हींतून अेकहि गोष्ट या मुलाच्या दृष्टीस पडणार नाहीं अशा रीतीनें याला ठेवूं.

सिद्धार्थाला चैनीच्या आणि अैषआरामाच्या वातावरणांत वाढविण्यांत आलें. यशोधरा नांवाच्या अेका अत्यंत रूपवती आणि सद्गुणवती राजकन्येशीं त्याचें लग्न करण्यात आलें. पण अनपेक्षितपणें व्याधि, जरा आणि मृत्यु तीन्ही त्याच्या नजरेस पडलीं. त्याच्या मनावर मोठा आघात झाला. जगाचें हें सर्व दुःख नाहीसें करण्याचा अुपाय असलाच पाहिजे आणि मला तो शोधून काढल्यावांचून गत्यंतर नाहीं

असा विचार करून सिद्धार्थानें आपल्या राज्याचा आणि सुखोपभोगाचा त्याग केला आणि तो संन्यासी झाला.

अनेक चांगल्या चांगल्या गुरूंकडून त्यानें ज्ञान मिळविलें, कठीण तप केलें, ४९ दिवसपर्यंत कांहीं खाल्लें नाहीं आणि धर्मबोध मिळविण्यासाठीं परिश्रम केले. त्याला फसविण्यासाठीं माणसाचा शत्रु, सर्व वाईट वासनांचा राजा जो ' मार ' त्यानें मोहक वस्तू, कंटाळा, भूक, तहान, विषयवासना, आळस, भीति, कुशंका, गर्व, लोभ, सत्कार, पूजा आणि वांकड्या रस्त्यानें मिळणारी कीर्ति ही आपली सर्व फौज घेऊन सिद्धार्थावर हल्ला केला. पण सिद्धार्थाची शांति आणि विवेक अढळ राहिले आणि त्यानें मारावर विजय मिळविला. मारावर जीत मिळतांच लगेच त्याला जगाचें दुःख नाहींसें करणारें ज्ञान, ज्याला बौद्ध लोक ' बोधि ' म्हणतात तें, मिळालें. सिद्धार्थ बुद्ध झाला आणि त्याला परम आनंद झाला.

जगामध्यें सर्वत्र दुःख आहे याचें कारण वासनारूपी तहान आहे. ती नाहींशी केली असतां दुःख दूर होईल आणि त्याकरितां मनुष्यानें योग्य ज्ञान, योग्य इच्छा, योग्य कर्म, योग्य धंदा, योग्य साधन, योग्य चिंतन आणि योग्य ध्यानाचें सेवन केलें पाहिजे, हें त्याच्या ज्ञानाचें सार होतें. आपल्याला सांपडलेला मार्ग जगाला दाखविला तर जगाचेंहि कल्याण होईल या दयेच्या वृत्तीनें बुद्धानें धर्मोपदेश करण्यासाठीं फिरायला सुरवात केली. काशीजवळील सारनाथ तीर्थाच्या ठिकाणीं त्यानें आपल्या उपदेशाला सुरवात केली. हजारो लोक हा तथागताचा उपदेश ऐकण्यासाठीं गोळा होत. बुद्धाचा उपदेश पूर्णपणें ज्यांच्या गळीं उतरे ते घरदार सोडून बौद्ध भिक्षु किंवा श्रमण होत. चैनीपाठीमागें सगळें आयुष्य खर्च करणें किंवा शरीराला कष्ट देण्यांतच संतोष मानणें हीं दोन्हीं टोकें बुद्ध भगवानांना पसंत नव्हतीं. त्यांनीं मधला मार्ग पसंत केला. बौद्ध भिक्षु बुद्धाला, त्याच्या धर्माला आणि त्यानें स्थापिलेल्या भिक्षु-संघाला शरण जाऊन कषाय वस्त्रें धारण करीत. भक्तजनांनी अशा लोकांना राहाण्या-साठीं मोठमोठे विहार बांधून दिले होते. त्यावरून मिथिला आणि मगध देशाचें नांवच ' विहार ' ( बिहार ) असें पडलें आहे.

त्या काळच्या अजातशत्रु नांवाच्या राजानें बुद्धाचा उपदेश स्वीकारला होता त्या काळचें कर्मकांड आणि यज्ञयाग यांच्या विरुद्ध बुद्ध भगवानांनीं बंड उभारलें. धर्माच्या नांवानें पशूंना मारून स्वर्ग किंवा मोक्ष मिळणार नाहीं आणि कितीहि यज्ञ

केलें तरी केलेल्या पापांतून सुटका होणार नाहीं, केलेलीं कर्में भोगल्यावांचून गत्यंतर नाहीं, हा त्याचा सिद्धांत होता. शिवाय ज्यानें करावें त्यानेंच भोगावें. दुसऱ्याच्या बलिदानानें आपल्याला पुण्य मिळायचें नाहीं; स्वतः पुण्यकर्म करावें, पापकर्म सोडून द्यावें, अहंकाराचा त्याग करावा म्हणजे कुशल प्राप्त होईल असें बुध्दधांनीं शिकविलें. परस्परांशी झगडून सूड उगविणाऱ्या हिंस्रक जगाला बुद्ध भगवानांनीं घोषणा करून सांगितलें कीं सूड उगविल्यानें सूडबुद्धि वाढते, क्षमा केल्यानें, प्रेमानेंच वैर शमतें. विजय हा शांतीचा मार्ग नव्हे कारण हार पावलेल्या माणसाच्या हृदयांत शल्य शिल्लकच राहातें. आपला हा शांतीचा उपदेश वयाच्या ८० वर्षांपर्यंत जगाला देत ते फिरले आणि शेवटीं कुशीनारा नांवाच्या गांवीं एका गरीब भक्ताचें आतिथ्य स्वीकारून ते निर्वाण पावले. त्यांच्या शिष्यवर्गानें त्यांच्या शरीराचे अवशेष म्हणजेच अस्थी आणि रक्षा हीं आपसांत वांटून घेऊन त्यांवर माठमोठे स्तूप बांधले. ज्या बुद्धानें सारा संसार शून्य आहे, क्षणिक आहे, दुःखमय आहे, यांतून सुटणें हेंच निर्वाण असें शिकविलें होतें, त्याच्याच शरीराच्या अवशेषांसाठीं त्याचे शिष्य–राजे पुढें आपसांत लढले आणि बुद्धाचा उपदेश एका बाजूला ठेवून त्याची मूर्ती बनवून निरीच ते पूजा करूं लागले. मनुष्याला स्वतःच्या सत्कर्मानेंच निर्वाण प्राप्त करून घेतां येतें या बुद्धाच्या उपदेशाऐवजीं बुद्धासारख्या पुण्यप्रतापी सत्त्वांच्या कृपेनेंच निर्वाण प्राप्त होऊं शकेल अशी समजूत पसरली, आणि आपलीं इंद्रियें ताब्यांत ठेवण्याऐवजीं केवळ प्राणीमात्रांची सेवा केल्यानेंच निर्वाण मिळूं शकेल असें लोक समजूं लागले.

बौद्ध लोकांनीं बुद्ध भगवानांचें चरित्र अनेक प्रकारे वर्णन केलें आहे. त्यांच्या जन्माविषयीं अनेक दंतकथा लिहिलेल्या आहेत. हिंदुधर्मांत जशी अवताराची कल्पना आहे तशी बौद्ध लोकांत बोधिसत्त्वाची कल्पना आहे. एकच जीव अर्हतपद प्राप्त करून घेण्याच्या महदिच्छेनें अनेक जन्मांत अनेक प्रकारच्या पारमिता म्हणजेच प्राविण्यें अंगीं बाणवून घेऊन अंतीं बुद्ध होतो अशी समजूत बौद्ध लोकांत दृढ झाली, बुद्ध भगवानांनी आपल्या पूर्व जन्माच्या कित्येक गोष्टी सांगितल्या होत्या त्यावरून अनेक प्रकारच्या जातककथा रचण्यांत आल्या आणि बुद्धाचा लीला विस्तार वाढला. बुद्धाचें ऐतिहासिक साधें जीवन या नव्या उत्पन्न झालेल्या अनेक प्रकारच्या चमत्कारांत झांकलें गेलें आणि बुद्धाच्या उपदेशाचें रहस्य त्याच्या चरित्रांत पाहाणें कठीण होऊन बसलें. तरी अशा जातककथा आणि बुद्ध–चरित्रें

यांवरून त्या त्या काळच्या लौकिक समजुती आणि धार्मिक कल्पना यांचा मात्र अितिहास आपल्याला मिळतो.

बुद्ध भगवानांनीं आपल्या संघासाठीं दूर दृष्टीनें अनेक शहाणपणाचे नियम घडविले. संघांत मतभेद झाला असतां कसें वागावें, संघांत घाण शिरूं नये यासाठीं कोण-कोणत्या गोष्टींची सावधगिरी बाळगावी वगैरे अनेक सूचना त्यांनीं केल्या. नियमांचा अतिरेक होअून मूळ अुद्देश नाहींसा होअूं नये अेवढयासाठीं त्यांनी आपलें मत अनेक रीतींनीं स्पष्ट केलें. आणि अशा तालमींत तयार झालेल्या आपल्या शिष्यांना धर्मोपदेश करण्याची परवानगी दिली. बुद्ध भगवानांना त्यांच्या वेळच्या जुन्या विचाराच्या लोकांशीं लढावें लागे अितकेंच नव्हे तर जुन्या विचाराचे लोक ज्यांना नास्तिक किंवा पाखंडी म्हणत अशा आपल्यासारख्या दुसऱ्या सुधारकांशींही त्यांना लढावें लागे. या सर्व कारणांमुळें बुद्धांचा अुपदेश निश्चित शब्दांत आणि व्यवस्थित स्वरूपांत ठेवण्यांत आला. **सामान्य लोकांच्यासाठीं** बुद्ध भगवानांनीं खालील नियम सांगितले होतः—

कोणाची हिंसा करूं नये.
अन्यायानें कांहीं घेअूं नये.
शारीरिक पवित्रता सोडूं नये.
असत्य भाषण करूं नये.
चहाडी चुगली करूं नये.
कठोर बोलूं नये.
निष्कारण बडबड किंवा निंदा करूं नये.
दुसऱ्याच्या द्रव्याचा लोभ ठेवूं नये.
मनांतून क्रोध काढून टाकावा.
मिथ्या दृष्टि म्हणजे नास्तिकता ठेवूं नये.

**भिक्षूंच्यासाठीं—**

ब्रम्हचर्याचें पालन करावें.
मादक पदार्थांचें सेवन करूं नये.
दुपारनंतर जेवूं नये.
नृत्य, गीत आदि अुद्दीपक गोष्टी पाहूं नयेत
आणि अैकूं नयेत.

माळा, गंध वगैरे वापरूं नये.
अुंच किंवा मअू बिछान्यावर निजूं नये.
सोन्या चांदीचा स्वीकार करूं नये.

—असे पुरवणी नियम बुद्ध भगवानांनीं घालून दिले होते,

असे भिक्षू आठ महिने देशांत सर्वत्र फिरून धर्मोपदेश करीत आणि पावसाळ्यांत विहारांमध्यें अेके ठिकाणीं बसून धर्माचें अध्ययन आणि चिंतन करीत. धर्मोपदेशासाठी फिरत असतां लोकांकडून सहज जी भिक्षा मिळेल तीच खाअून ते राहात.

बुद्धांच्या संघांत सर्व जातींच्या शिष्याना वाव होता. स्त्रियांसाठी सुद्धा बुद्धभगवानांनीं वेगळा संघ स्थापिला होता. बुद्धांच्या स्त्रीशिष्यांत क्षमा, अुत्पलवर्णा वगैरे महान् भिक्षुणी होअून गेल्या आहेत, त्यांनीं स्त्रीवर्गालाच नव्हे तर पुरुषांनासुद्धां अुपदेश करून त्यांना सन्मार्गाकडे वळविलें आहे. त्यांच्यासारख्या भिक्षुणींना स्थविरा किंवा थेरी म्हणत.

बुद्ध भगवानांचा संघ ही जगांतील अगदीं पहिली धर्मशीलांची ( मिशनऱ्यांची ) संस्था म्हणतां येअील.

१९२३

## ४ बुद्ध अवतार

भगवान बुद्धांना आपण श्रीविष्णूचा अवतार मानतों. मला वाटतें तथागताला अवतारच मानायचा असेल तर महादेवाचा अवतार कां मानूं नये ? तो भवपालक नाहीं भवरोगघ्न—भवनाशक आहे. पण शाक्यमुनीला अवतार मानणें हेंच मुळीं मला पसंत नाहीं. अवतार म्हणजे काय ? जगाचें दुःख बघून, ज्ञानाचा लोप पाहून, शुद्ध, बुद्ध, नित्य, मुक्त असा परमेश्वर लौकिक रूप धारण करून ' खालीं अुतरतो '. माणसांत राहून माणसांप्रमाणें तो खुशाल वागो, पण तो कांहीं माणूस नव्हे; त्याची जातच वेगळी. त्याच्या अनुग्रहानें आपला अुद्धार होत असेल पण त्याचें अनुकरण करण्याची अिच्छा आपल्याला व्हायची नाहीं. आपण कृष्णाचे अुपासक बनूं शकतों, पण कृष्णाचें अनुकरण करतांच नये. गौतम बुद्ध अवतार नव्हते, माणूस होते. जगाचें दुःख पाहून, सम्यक्ज्ञानाचा अभाव पाहून 'ते चढले.'* अेक सामान्य–पण श्रद्धावान जीव अनेक जन्म चढत चढत बोधिसत्वाचा बुद्ध झाला;मनुष्याचा देव बनला; शुद्ध, बुद्ध, मुक्त

* परमेश्वराप्रमाणें ' खालीं अुतरले ' नाहीत !

बनला; आर्य होता, अर्हन बनला. त्याचें जीवन अनुकरणीय आहे. सीता–सावित्री-प्रमाणें बुद्ध भगवानांनी सुद्धां मनुष्य कुठवर चढूं शकतो हें जगाला दाखवून दिलें. श्रद्धा आणि करुणा यांची ते मूर्ति होते. यमराजाच्या घरीं जाणाऱ्या नचिकेताची श्रद्धा बुद्धभगवानांत होती, गुरुकडून ब्रह्मज्ञान मिळवून निर्भय झाल्यानंतर जनक राजा राज्यसर्वस्व सोडायला तयार झाला. गुरुकृपेनें जीवनाचें सार्थक झालें असा विश्वास असल्यामुळें गोपीचंदानें राज्यत्याग केला. पण शाक्य मुनीचा त्याग याहूनहि कठिण होता.

'सांसारिक जनांचें दुःख पाहून माझें मन रडत आहे, म्हणून तें दुःख नाहींसें करण्याचें औषध असलेंच पाहिजे, आणि तें आहे म्हणून मला तें मिळविलें पाहिजे;' य- महान् श्रद्धेनें—अंतःश्रद्धेनें त्यानें राज्यत्याग केला. हें वीरकर्म मनुष्यजातीचें अस्तित्व आहे तोंवर गाइलें जाईल. युगायुगांतरांतील कवीजन या महाभिनिष्क्रमणाचा प्रसंग गाऊन आपली वाणी पुनीत करतात.

सिद्धार्थाचा बुद्धत्वांत नाश झाला आणि आर्यावर्तांत धर्मचक्रप्रवर्तन सुरू झालें. बुद्ध भगवानांचा धर्म गहनवादी नाहीं, 'अतिवादी' नाहीं, तरी तो सामान्य नीतिधर्महि नाहीं. त्यांत अहंकाराचा नाश उद्दिष्ट आहे आणि निर्वाण हें त्याचें प्राप्तव्य आहे.

बौद्ध धर्माचें सामाजिक स्वरूप काय होतें आणि त्या धर्माची आर्यावर्तावर काय छाप पडली हा विषय अत्यंत महत्त्वाचा आहे. पण विद्यार्थी मोठे झाले म्हणजे त्याचा विचार करूं शकतील.

बुद्ध भगवानांचें चरित्र वाचून एखाद्या तरुणाच्या मनांत गृहत्याग करण्याचा विचार येईल. त्यानें लक्षांत ठेवावें कीं जो महावीर आहे त्यालाच त्याग करतां येतो. '*सरस्वतीचंद्र' होण्यांत श्रेय नाहीं.' जर त्याग कराल तर त्या त्यागाला लायक बना!

एप्रिल १९२२

* 'सरस्वतीचंद्र' : स्पष्टीकरणासाठीं टीप पहावी.

# बोधिजयंती

**वैशाख पूर्णिमा** **-॥- दिवस**

गौतमबुद्धांना याच दिवशीं ज्ञान झालें होतें. जगांतील दुःखांचें औषध द्रव्यांत नाहीं, राजसत्तेंत नाहीं, जबरदस्तीत नाहीं, तर ज्ञानांत, शिस्तपणांत आणि शुद्ध जीवनांतच आहे, हें रहस्य मनावर ठसविण्याचा हा दिवस आहे.

हा मंत्र मनुष्य सुखाळूपणाच्या धुंदींत लुप्त होऊन जातो. म्हणून तो समाजांत सर्वत्र जागता केला जाईल अशी व्यवस्था झाली पाहिजे.

बुद्धांचा गृहत्याग आणि ज्ञानाचा शोध यांविषयीं या दिवशीं विवेचन व्हावें. या दिवसास शोभण्याजोगें एखादें नाटक बसवितां येईल.

जातिभेद आणि विशेषतः त्यांत असलेला उच्चनीचपणा हें हिंदुधर्माचें खरें लक्षण नव्हे हेंहि आज समजावून दिलें पाहिजे. शेवटीं बुद्ध भगवानांच्या उपदेशांतील उत्तम भाग हिंदुधर्मानें आत्मसात करण्याचा प्रयत्न कसा केला आहे तें समजावून द्यावें.

'धम्मपदं' मधील कांहीं चांगलीं वचनें विद्यार्थ्यांना तोंडपाठ करावयास द्यावींत.

# चोखा डोंगा परी भाव नोहे डोंगा। : : १३

## ( वैशाख व० १३ )

मंगळवेढ्याच्या भोंवतीं तट बांधावयाचा होता. बादशहानें गरीबांना वेठीस धरून आणलें आणि त्यांचेकडून गांवाच्या रक्षणासाठीं भिंत बांधून घेतली. ज्यांना गांवांत राहाण्याची परवानगी नाहीं, ज्यांनी गांवांतील रस्त्यावरून चालावयाचें तें देखील चोरासारखें आणि राहावयाचें गांवाबाहेरच्या उकिरड्यावर अशा हरिजनांनादेखील गांवाची भिंत बांधण्यासाठीं वेठ करावी लागली. स्वतःला ज्या क्रूसावर चढविणार होते तो क्रूस ज्याप्रमाणें येशूला स्वतःलाच उचलून न्यावा लागला त्याप्रमाणें स्वतःचा गांवांतून बहिष्कार करणाऱ्या भिंतीदेखील या हरिजनांना स्वतःच बांधून द्याव्या लागल्या.

गवंड्यांनी गफलत केली असेल, अंमलदारांनी घाओी केली असेल, चिखल पातळ झाला असेल—कोणत्याहि कारणांनी असो, पण भिंत पडली आणि हरिजनांची एक तुकडी त्या भिंतीखालीं गारद झाली. चार लोक चुटपुटले, दोन चार हळहळले पण त्यांनी मरणाऱ्या लोकांना त्या ढिगाखालींच पडूं दिलें. या श्रमजीवी गरीबांची झोपमोड कां करा ? त्या मातीखालीं त्यांचीं शवें कुजलीं, त्यांची माती झाली आणि केवळ हाडेंच उरलीं. स्वतःच्या मातीमध्यें मिसळून राहाणाऱ्या या हाडांना केवढी शांति प्राप्त झाली असेल !

पण या त्यांच्या शांतीचा भंग करणारा एक प्रसंग घडला. कांहीं जिवंत अभंग वाचून ज्याला स्फूर्ति झाली असा एक संत शोध करीत करीत मंगळवेढ्याला आला आणि म्हणूं लागला, ' चोखोबांचीं हाडें येथें पडलीं आहेत, मला त्यांना गति द्यायची आहे. ' त्यानें तो प्राचीन ढीग खणावयास सुरुवात केली. अेकामागून अेक हाडें सांपडूं लागलीं. तो संतपुरुष एक एक हाड घेअून आपल्या कानाशीं लावी आणि त्या हाडांतून ' विठ्ठल विठ्ठल ' हा ध्वनि अैकूं येअी तीं निराळीं काढी. असें करीत करीत त्यानें चोखामेळ्याचीं सगळीं हाडें मिळविलीं आणि त्यांवर एक समाधि बांधली.

आज त्या हाडांचीदेखील माती झाली असेल. पण ' विठ्ठल विठ्ठल ' चें गाणें अखंड चालविणारे चोखोबाचे अभंग महाराष्ट्राच्या अनास्थेच्या ढिगाखालीं दडून

राहिलेले आजहि सांपडतील. कोणी कोणी त्याना गोळा करून पुस्तकाच्या पुठ्यांत मूठमाती दिली आहे पण तशानें कांहीं चोखोबाचें श्राद्ध होणार नाहीं.

चोखोबाची वाणी शुद्ध मराठी, करुणरसानें थबथबलेली, जातीवर होणाऱ्या जुलमानें वैतागलेली पण अीश्वरी कृपेविषयीं आत्मविश्वासानें बोलणारी अशी आहे. वर्ण आणि जाति, शास्त्रें आणि पुराणें हीं सर्व वरचीं सोंगें आहेत, यांना भुलूं नये, आंतील मर्म ओळखलें पाहिजे असा स्वकीयांना आणि परकीयांना--होय, आपण सर्व अत्याचारी हिंदू बिचाऱ्या हरिजनांना परकीयच नाही का ?–अुपदेश करणारी चोखोबाची वाणी आपल्या कंठांत आणि हृदयांत अखंड वसत राहील असें आपण कांहींतरी केलें पाहिजे. ख्रिस्तानें म्हणे मनुष्यजातीसाठीं प्रायश्चित्त केलें, कदाचित् तसें असेल. पण चोखोबाच्या नम्र सेवेनें महाराष्ट्रांतील हरिजनांसाठीं अगदीं चक्रवाढव्याजानें प्रायश्चित्त केलें आहे यांत शंका नाहीं. चोखामेळ्याची पुण्यतिथि साजरी करावयाची म्हणजे त्यादिवशीं सर्व हरिजनांना बोलावून त्यांचेकडून भजन करवावयाचें आणि आपण बसून तें अैकावयाचें आणि ते जो प्रसाद देतील त्याचें सेवन करून त्यांना खात्री करून द्यावयाची कीं अितउत्तर ते परकीय नसून आपले स्वकीयच आहेत.

१९–१२–३९

# मृत्यु विरुद्ध प्रेम : : १४

## ( ज्येष्ठ शु. १५ )

वनवासाचे कष्ट भोगणाऱ्या द्रौपदीला आश्वासन देण्यासाठीं ॠषींनीं ज्या अनेक गोष्टी सांगितल्या, त्यांत सीतेची कथा आणि त्यानंतर सावित्रीची कथा सांगण्यांत ॠषींनीं किती खरें औचित्य दाखविलें ! सीता, सावित्री आणि अुमा हा आर्य रमणींचा त्रिविध आदर्श आहे.

मद्रदेशाच्या राजा अश्वपतीला अपत्य नाहीं. राजा नगरवासीयांना तसाच ग्रामवासी लोकांना अत्यंत प्रिय आहे. अंतःकरणानें अुदार, सत्यप्रतिज्ञ, जितेन्द्रिय आणि क्षमाशील अशा राजांची परंपरा खंडित न व्हावी अशी चिंता प्रजेलाहि असणारच. राजानें अनेक प्रकारें कठिण तपस्या करून आणि अिंद्रियांचें दमन करून परमात्मशक्तीची आराधना केली.

धर्मकार्य अेका जन्मांत पूर्ण होत नसत. समाजसेवा आणि राष्ट्रसेवा पिढ्यान्‌पिढ्या चालते, कुलधर्म वंशपरंपरागत होतो, तेव्हांच अपेक्षित फलप्राप्त होते. कुलव्रत सतत चालावें अशासाठीं राजानें संततीची अिच्छा धरली. ‘ संतानं परमो धर्मः ’ कुलधर्म पुत्रानांच पाळतां येतो, पुत्रांवांचून गति नाहीं, असें समजून राजानें पुत्राची अिच्छा बाळगली. पण परमात्म्याला दाखवावयाचें होतें कीं, धर्माचा अुत्कर्ष करण्यासाठीं पुरुषांप्रमाणें स्त्रियाहि समर्थ होतात. पुत्र मागणाऱ्या राजाला अेक कन्यारत्न मिळालें. पुत्रासाठीं तळमळणाऱ्या मातापित्यांना जेव्हां कन्याप्राप्त होते तेव्हां तिचे लाड आणि पालनपोषण पुत्रासारखेंच झालें तर त्यांत काय नवल ? सावित्री याच प्रकारें संस्कारयुक्त स्वतंत्रतेच्या वातावरणांत वाढली. देवकन्येला शोभण्यासारखें अुत्तम शिक्षण तिला मिळालें. त्यामुळें मुलगी तेजस्विनी झाली. पवित्रता, निर्भयता आणि अुच्च संस्कारिता या गुणांमुळें जिकडे तिकडे मुलीचें असें कांहीं तेज पडूं लागलें कीं, तिच्यापुढें भलभले राजपुत्र फिक्के दिसूं लागले. सावित्रीला आपण लायक आहोंत असा आत्मविश्वास अेकाहि राजपुत्राला वाटेना. प्रेम करायला यावें त्यानें पूजाच करूं लागावी. मुलगी मोठी झाली. सर्व प्रकारें संस्कारसंपन्न दिसूं लागली. शरीरानेंहि अंगप्रत्यंग पूर्णविकसित आणि प्रौढ. राजाला वाटूं लागलें कीं, वंशविस्तार झाला

नाहीं तर अितक्या संस्कारांची परंपरा राहाणार कशी ? पित्यानें जाणून बुजून मुलीला स्वतंत्रतेचें शिक्षण दिलें होतें. म्हणून विश्वासपूर्वक त्यानें सावित्रीला सांगितलें कीं, "क्षत्रियांच्या रिवाजाप्रमाणें राजपुत्रांनी तुझ्यासाठीं मागणी घातली पाहिजे. पण कोणालाहि हिंमत होत नाही. तुला आपल्या कुलव्रताची माहिती आहे. सर्व शुभ संस्कारांनीं तूं युक्त आहेस. तूं तुझ्या मनानें तुझा पति पसंत करून मला सांग. मी त्या गोष्टीना विचार करून तूं निवडलेल्या तरुणालाच तुला अर्पण करीन. तुझ्या अिच्छेप्रमाणें तूं वर शोधून काढावास अशी माझी अिच्छा आहे. हा मार्ग रूढ नसला तरी धर्मसंमत आहे असें ब्राह्मणांनी मला सांगितलें आहे. या बाबतींत मी अुदासीन राहिलों तर देव मला ठपका देतील."

मुलीनें पित्याच्या वृद्ध मंत्र्याला बरोबर घेअून प्रयाण केलें. सावित्रीला योग्य वर सहज मिळण्यासारखा नव्हताच. ती अनेक नगरांत, देशांत आणि वनांत फिरली. अशी यात्रा करतांना अत्यंत मोलाचें शिक्षणहि तिला मिळत गेलें. शेवटीं तिला स्वतःला योग्य असा पति मिळाला. पित्याच्या संमतिवाचून पुढच्या गोष्टी ठरणार नसल्यामुळे सावित्री तरळ घरीं परत आली. पित्याला भेटायला जाते तों त्रैलोक्यांत ज्यांचा अप्रतिहत संचार आहे असे भगवद्भक्त, जनहितपर नारदमुनि तेथें आलेले तिला दिसले. नारदांचें आगमन म्हणजे धार्मिक आणि लौकिक ज्ञानाची मेजवानी; सुर आणि असुर, गंधर्व – किन्नर आणि मनुष्यें सगळेचजण सर्वभूतहितरत अशा नारदावर प्रेम करणार. सावित्रीनें पित्याला आणि नंतर नारदाला नमस्कार केला. नारदानें कुशल प्रश्न करून राजाला विचारलें; "कन्या आतां वयांत आली आहे, तिचा विवाह केव्हां करणार आहां?" राजानें आपला आदर्श सांगितला आणि म्हटलें, 'सावित्री आपला वर शोधण्यासाठीं गेली होती ती आतांच आली आहे. तिच्याकडून हकीकत अैकू या.' सावित्री म्हणाली, "शाल्व देशाच्या द्युमत्सेन राजाचें नांव प्रख्यातच आहे. आज ते राज्यभ्रष्ट होअून वनामध्यें वनवासाप्रमाणें राहात आहेत. त्यांच्या डोळ्यांना अंधत्व आलें आहे. राज्यभ्रष्ट झाल्यानें जे कष्ट भोगावे लागतात त्यांत दारुण तपश्चर्येची त्यांनीं भर घातली आहे, तरी त्यांच्या तितिक्षेचा भंग झालेला नाहीं. त्यांचा सुशील पुत्र सत्यवान हाच मला योग्य वर आहे असें मी निश्चित केलें आहे आणि मनानें मी त्याला वरलें आहे. नारद ऋषींच्या तोंडून अेकदम दुःखोद्गार निघाला; " अरेरे; घाआट झालें. " राजाला वाटलें कीं स्वयंवरांत मुलीची कांहींतरी फसगत झाली. अितक्यांत राजाच्या मुखावरील चिंता पाहून नारद म्हणाले, " माता आणि पिता अत्यंत सत्यनिष्ठ

असल्यामुळें ब्राह्मणांनीं मुलाचें नांव सत्यवान ठेवलें आहे. जंगलांत राहिल्याराहिल्या त्यानें शिक्षणहि चांगलें मिळविलें आहे. मातीचे घोडे आणि नाना प्रकारच्या बाहुल्या तो लहानपणीं अितक्या चांगल्या बनवीत असे आणि चित्रेंसुद्धां अशीं कांहीं सुंदर काढीत असे कीं त्याचें नांव ' चित्राश्व ' पडलें आहे. "

"लहानपणचे गुण मोठेपणीं टिकतातच अशी खात्री कुणी द्यावी ?" राजा म्हणाला " पण आज हा राजपुत्र कसा काय आहे ? सत्यनिष्ठ, तेजस्वी, बुद्धिमान क्षमासंपन्न, शूर आणि पितृभक्त अितके गुण त्याच्यांत नसतील तर माझ्या मुलीने आपल्या निवडींत चूक केली असेंच मानावें लागेल." नारदांची वाग्धारा सुरू झाली. सत्यवानाचें स्तुतिस्तोत्र गातांना अेकाहि राजर्षीची अुपमा शिल्लक राहिली नाही. सत्यवान रूपवान्, अुदार आणि प्रियदर्शन तर होताच पण राजाला आवश्यक असे सर्वच गुण नारदांना त्याच्यांत दिसले होते आणि तेजस्वितेबरोबरच सरळपणा आणि मर्यादशीलता या त्याच्या विशेष गुणांबद्दल शीलवृद्ध आणि आचारवृद्ध माणसें त्याची प्रशंसा करतात, असें आणखी नारदांनी सांगितलें.

" मग वाअीट तें काय झालें? "

आंबट चेहेरा करून नारद म्हणाले, " या सर्वगुणसंपन्न राजपुत्राचें आतां अेकच वर्ष आयुष्य शिल्लक अुरलें आहे, त्याचें मरण टाळण्याची शक्ति कोणामध्येंहि असल्याचें मला दिसत नाहीं. " " मग असला जांवअी कोण पसंत करतो ? " राजानें आणि नारदांनीं मुलीला सांगितलें कीं " दुसरा वर शोधून काढणें हेंच योग्य. " शीलपरायण राजकन्येनें या सूचनांचा यत्किंचितहि स्वीकार केला नाहीं. ती म्हणाली, " सज्जनांचा हा मार्ग नव्हे. ज्याला मी अेकवार वरलें तो दीर्घायु असो वा अल्पायु असो, सगुण असो वा निर्गुण, त्यालाच मी वरलें आहे. आतां दुसऱ्याला वरणें शक्य नाहीं. कोणत्याहि गोष्टीचा प्रथम मनांत संकल्प होतो; त्याप्रमाणें शब्दांत त्याचा उच्चार होतो, आणि त्यानंतर त्याप्रमाणें कृति होते. मनाच्या निश्चयावर वाणी आणि कृति अवलंबून असतात आणि या दोहोंची प्रेरणाहि त्यांतूनच असते, म्हणूनच मन हेंच माझ्यामतें प्रमाण आहे. प्रमाणं मे मनस्ततः । " अशा धार्मिक निर्णयापुढें राजा तरी काय बोलणार ? आणि नारद तरी काय सांगणार ? सावित्रीच्या निश्चयाची प्रशंसा करून तोंडांतून बाहेर पडले ते आशीर्वाद देअून नारद संचारार्थ निघाले, आणि राजानें द्युमत्सेनाच्या आश्रमाकडे जाण्याची तयारी केली.

प्रथम तर द्युमत्सेनाला सारें आश्चर्यवतच वाटलें. राज्यभ्रष्ट झालेल्या, वनवासी अंध राजाच्या पुत्राला सावित्रीसारखी अुत्कृष्ट आणि तेजस्विनी कन्या देण्यासाठीं तिचा पिता येत आहे याहून अधिक अद्भुत तें काय ? अश्वपतीनें अुत्तर दिलें " माझी कन्याहि जाणते आणि मलाहि माहीत आहे कीं सुख आणि दुःख हीं दोन्हीं अस्थायी आहेत. दोहोंचाहि नाश होतो. सज्जनांनीं त्यांचा विश्वास धरूं नये. गौरवाच्या दृष्टीनें आपणां दोघांचीं कुळें समान आहेत, आणि माझ्या मुलीनें विचारपूर्वक स्वतःच हा संबंध पसंत केला आहे. "

आश्रमांत होअूं शकेल अशा पद्धतीनें विवाह झाला. सावित्रीनें पित्याला वाओट वाटूं नये अेवढ्यासाठीं पिता होता तोंवरच अलंकार घातले. अश्वपतीची पाठ फिरतांच सावित्रीनें सारे अलंकार अुतरून तपस्विनीचा वेष चढविला; आणि शुश्रूषा, सदाचार, नम्रता आणि अिंद्रियदमन हा आपला आचारधर्म ठरवून प्रसन्नतापूर्वक राहून सर्वांना तिनें प्रसन्न केलें. सासू, सासरा आणि सर्व संबंधीजनांना त्याचप्रमाणें पतीला आपल्य सद्गुणांनीं संतुष्ट करून आश्रमलक्ष्मीप्रमाणें ती तेथें शोभूं लागली. संस्कारी, धर्मपरायणा आणि जितेंद्रिय अशा पत्नीच्या सहवासांत सत्यवानाचा आनंद वाढत राहिला. सावित्रीला सेवेचा आनंद होताच, पण नारदांनीं सांगितलेलें भविष्य या आनंदाला जाळून भस्म करीत होतें. महिने अुलटले आणि दिवस अुरले. आतां तर चारच दिवस शिल्लक राहिले. सावित्रीनें आहार–निद्रेचा त्याग केला. द्युमत्सेन राजा घाबरला. तीन दिवस उभेंच राहाण्याचें सावित्रीचें व्रत होतें तें पार कसें पडणार? सावित्रीनें उत्तर दिलें, " तात, आपण चिंता करूं नये. मी निश्चयपूर्वक व्रत सुरू केलें आहे आणि निश्चय हेंच कार्यसिद्धीचें कारण आहे. व्यवसायश्च कारणम्। "

सुशील सावित्रीला विरोध कोण करणार? तीन दिवस हां हां म्हणतां निघून गेले शेवटच्या रात्रीचा अेकेक क्षण सावित्रीला कसा गेला असेल? सकाळ होतांच सावित्रीनें नित्यकर्म संपवून प्रदीप्त अग्नीमध्ये हवन केलें, वडिलांना नमस्कार केला. सर्वांनी तिला आशीर्वाद देअून भोजन करण्याचा आग्रह केला. सावित्रीला आहारनिद्रादि देहधर्म कसे बरें सुचणार? तिनें नम्रपणें सासूसासऱ्यांना अुत्तर दिलें कीं सूर्यास्तानंतर अमुक अिष्ट वस्तु पूर्ण झाल्यानंतरच जेवण करायचें असा माझा संकल्प आहे. अितक्यांत खांद्यावर कुऱ्हाड टाकून फळें आणि लाकडें आणण्यासाठीं सत्यवान निघाला. सावित्रीनें काकुळतीनें सांगितलें कीं तुम्हीं अेकटे जाअूं नका. मी तुमच्याबरोबर येते. आज

तुमच्यापासून दूर राहायला माझा जीव घेत नाहीं. सावित्रीला गाढ अरण्यांत फिर-ण्याचा सराव कोठून असणार? आणि शिवाय आज तिच्या उपवासाचा चौथा दिवस. तिला चालता सुद्धां यायचें नाहीं. तिला परवानगी कोण देणार? पण सत्यवानाचा नकार सावित्रीनें ऐकलाहि नाहीं. शेवटीं सत्यवानानें आईबापांवर ही गोष्ट सोपविली सावित्रीनें अत्यंत नम्रतापूर्वक पण दृढपणें आपली मनीषा सासूसासऱ्यांपुढें मांडली सासूसासऱ्यांनीं विचार केला, मुलीनें सबंध वर्षांत ओकदांहि काहींच याचना केली नाहीं आज तिला नको कसें म्हणावें? त्यांनी शेवटीं अनुज्ञा दिली.

दोघे वनांत निघाले. वनवासाच्या काव्यमय जीवनांत अरण्याची शोभा लक्ष वेधून घेतेच. वाटेंत मोर नाचत होते आणि गात होते. अनेक प्रवाह आपल्या निर्मळ जलानें कलध्वनि करीत होते, आणि जिकडे तिकडे लहान मोठे वृक्ष असंख्य फुलांनीं प्रफुल्ल झाले होते. सत्यवान प्रत्येक रमणीय वस्तूकडे सावित्रीचें लक्ष वेधीत आणि आपला आनंद द्विगुणित करीत चालला होता. सावित्रीहि पतीच्या आनंदांत मिसळण्याचा होईल तितका प्रयत्न करीत होती. नशीबाचे फांसे पडण्याच्या वेळीं आपण पतीबरोबर आहोंत ओवढेंच तिला समाधान होतें. पण प्रतिक्षण तिला कल्पान्ताप्रमाणें वाटत होता. जणूं तिच्या अंतःकरणाचे दोन तुकडे होत होते.

वनांत ते दोघे पोचले आणि सत्यवान फळें वेचूं लागला ओवढ्यांत सावित्रीनें सुगंधी फुलें तोडून त्यांची ओक माळ बनविली. आवश्यक तितकीं फळें गोळा झालीं तेव्हां सत्यवानानें कुऱ्हाड घेऊन वाळलेलीं लाकडें तोडायला सुरुवात केली. हें काम त्याला कांहीं नवीन नव्हतें. सत्यवानाचें शरीरहि चांगलें कसलेलें होतें; पण कोण जाणे कशानें, आज त्याच्या सबंध शरीराला घाम सुटला. तो थकून गेला. त्याच्या डोक्यांत तीव्र वेदना होऊं लागली. ओकाग्रपणें पतीकडे पाहात असणाऱ्या सावित्रीच्या लक्षांत ही गोष्ट आली. तिनें जवळ जाऊन प्रेमपूर्वक विचारलें, " आज कांहीं विशेष थकवा आल्यासारखा वाटतो ? " सत्यवान आपला थकवा दाबून टाकूं पहात होता. वेदनाहि लपविण्याची त्याची अिच्छा होती, पण जेव्हां सावित्रीनें अत्यंत प्रेमानें विचारिलें तेव्हां त्याला राहवलें नाहीं, तो म्हणाला " होय, आज कांहीं तरी मला होत आहे खरें. डोक्यांत शूळ अुठला आहे आणि चित्तहि अस्वस्थ झाल्या-सारखें वाटतें. " थोड्या वेळानें तो पुनः म्हणाला, " आतां तर अुभेसुद्धां राहावत नाहीं. जरा निजलों तर बरें वाटेल. " सावित्रीनें तेथेंच जमिनीवर बसून सत्यवानाचें

डोकें आपल्या मांडीवर घेतलें. सत्यवानाला थोडासा आराम वाटला पण सावित्रीला ही घडी प्रलयकाळासमान भासूं लागली. भगवान नारदांनीं भाकित केलेला प्रसंग जवळ आला अशी तिची खात्री झाली. तिचें हृदय, मन आणि आत्मा तिच्या डोळ्यांत येअून सत्यवानाकडे पाहूं लागले. चार दिवसांच्या अुपवासानें दृष्टि क्षीण व्हायला पाहिजे, पण सावित्रीची तपस्याच अितकी अुज्ज्वल कीं त्याच घटकेला तिला दिव्य दृष्टि प्राप्त झाली.

तिला दिसलें कीं ममोहन कोणी अेक भव्य पुरुष जवळ येत आहे. त्याचीं वस्त्रें लाल होतीं. डोक्यावर चकाकणारा किरीट होता. हा पुरुष शरीरानें अुंचापुरा आणि सुंदर होता. तेजानें जणूं प्रतिसूर्यच. त्याला श्याम म्हणण्यापेक्षां गौर म्हणणेंच अधिक योग्य. त्याच्या हातांत भयंकर पाश होता. दृष्टि टाकतांच आदर अुत्पन्न व्हावा अशी त्याची गंभीर आकृति पाहून सावित्री अुमजली. तिनें हळूच पतीचें डोकें खालीं ठेवलें, आणि त्या दिव्य पुरुषाविषयीं आदर दर्शविण्यासाठीं ती अुठून अुभी राहिली. सावित्रीनें विचारलें, " आपली काया मानुषी नाहीं, आपण कोणी दैवी पुरुष आहांत, अेवढें मला कळतें. पण आपण कोण आहांत आणि काय अुद्देशानें आला आहां अेवढें सांगण्याची कृपा कराल ? " त्या दिव्य पुरुषानें अुत्तर दिलें, " हे सावित्री, तूं पतिव्रता आहेस आणि तपोनिष्ठ आहेस, म्हणूनच तुला मी दिसलों आणि म्हणूनच तुझ्याबरोबर मी भाषणहि करतों. मी पितरांचा अधिपति यम आहे असें समज. तुझ्या पतीचें आयुष्य नष्ट झालें आहे म्हणून त्याला न्यायला मी आलों आहे."

" भगवन्, मनुष्यप्राण्याला नेण्यासाठीं तर आपले दूत येतात. आज आपण स्वतः कां बरें येणें केलें ? "

" आम्हांला माणसाची कदर असते; हा तुझा सत्यवान धर्मसंपन्न आहे, रूपवान आहे आणि गुणांचा जणूं महासागरच आहे. याला घेअून जायला मला स्वतःलाच आलें पाहिजे ना ? "

असें बोलत बोलत यमराजानें सत्यवानाच्या शरीरांतून त्याचा जीवात्मा आपल्या पाशानें ओढून काढला. लगेच सत्यवानाचें शरीर निस्तेज पडलें, श्वासोच्छ्वास बंद झाला, मुखावरील कांति अुतरली आणि सर्व अवयव ढिले पडले. यमराजानें सत्यवानाच्या जीवात्म्याला आपल्या ताब्यांत घेअून दक्षिणदिशेचा रस्ता धरला. यम-

नियमांनीं सर्व सिद्धी प्राप्त झाल्या असल्यामुळें सावित्रीहि यमराजाच्या पाठोपाठ चालूं लागली. तिच्या हृदयांत दुःखाचा महासागर उसळला होता. सावित्रीला मागो-माग येतांना पाहून यमराज ममतेनें म्हणाले, " सावित्री, आतां तूं परत जा; आणि सत्यवानाचें और्ध्वदेहिक कर. पति जिवंत आहे तोंवर पत्नीनें त्याच्या बरोबर राहावें या धर्माचें तूं पूर्णपणें पालन केलें आहेस. पतीच्या ॠणांतून तूं मुक्त झाली आहेस. पतीच्या पाठीमागें जेथवर गेलें पाहिजे तेथवर तूं गेलीस. आतां परत जा. "

" मी कशी बरें मागें जाऊं ? जिकडे माझे पति तिकडे मी. सनातन धर्मानेंच ही व्यवस्था घालून दिली आहे. तप, गुरुभक्ति, पतिप्रेम, व्रत आणि आपला अनुग्रह यामुळें माझी गति अकुंठित आहे. आतां मी पतीला कसें बरें सोडूं ? आपल्याला मला परत लावून देतां यायचें नाहीं."

सावित्री धर्मानुसार बोलत असलेली पाहून यमधर्म संतुष्ट झाले. तेव्हां सावित्री पुढें बोलूं लागली:

" शहाणीं माणसें सांगतात कीं सात पावलें चालल्यानें किंवा सात शब्द बोलल्यानें सज्जनाशीं मैत्री बांधली जाते. या मैत्रीच्या अधिकारानें मी आपल्याला कांहीं विनविलें तर आपण ऐकून घ्याल ? ज्ञानसंपन्न लोक म्हणतात कीं चारी आश्रम धर्माचरणाला योग्य आहेत. आणि धर्माचरण हाच आत्मज्ञानाचें साधन आहे. सज्जन असेंहि सांगतात कीं चारांपैकीं कोणत्याहि एका आश्रमाचें उत्तम रीतीनें पालन केलें तर बाकीचे आश्रमधर्म आपोआप त्याच्या मागोमाग येतात. आणि म्हणूनच आश्रमांतर करण्याची इच्छा बाळगण्याची काहींहि जरूर नाहीं, असें धर्मज्ञ लोकांनीं सांगून ठेवलें आहे अशा स्थितींत निर्दोष रीतीनें जेथें आम्ही गृहस्थधर्म चालवीत आहों तेथें तुम्ही त्याचा विध्वंस कां बरें करावा ? माझ्या पतीला कां बरें घेऊन जातां ? "

सावित्रीची अशी संस्कारी आणि युक्तियुक्त वाणी ऐकून धर्मज्ञ यमराजांना अत्यंत संतोष झाला. ते म्हणाले, " हे आनंदिते, हें सत्यवानाचें जीवित सोडून दुसरें जें मागशील तें मी तुला देतों. पण तूं आतां परत जा. तुला ग्लानि येत आहे, आतां अधिक श्रम घेऊं नको "

" पतीच्या सन्निध असतांना मला ग्लानि ? माझ्या पतीला जेथें तुम्ही घेऊन जाल तेथें मी आहेच असें आपण समजा. सज्जनाशीं एकवार श्रेष्ठ समागम झाला तर

त्याला संगत म्हणतात. असा समागम वाढला म्हणजे त्याला मैत्री म्हणतात. तुमच्यासारख्या धर्मराजाबरोबर झालेला समागम व्यर्थ नाहींच जायचा. ”

“ माझ्या अंतःकरणाला आवडेल आणि ज्ञानी लोकांच्या बुद्धीलाहि वृद्धिंगत करील अशी हितकारी वाणी तूं बोलत आहेस. या सत्यवानाच्या जीविताखेरीज वाटेल तो वर तूं मागून घे. पण आतां तूं मागें फीर. व्यर्थ श्रम नको घेऊंस. ”

“आपण सर्व प्रजेला नियमांनी बांधलें आहे. म्हणूनच आपण वाटेल त्याला स्वेच्छेनें घेऊन जाऊं शकतां. मीही त्याच नियमाला वश होऊन पतीला अनुसरते आहे. आपण मला माघारीं कसें लावून देणार ? कोणत्याहि प्राण्याचा मन-वचन-क्रियेनें द्वेष न करणें, द्रोह न करणें, उलट त्याच्यावर अनुग्रह करणें हा तर सज्जनांचा सनातन धर्म आहे. सामान्य माणसांतहि हीच चाल आपल्याला दिसून येते. जे सामर्थ्यसंपन्न आहेत तें किती मृदु आणि क्षमावान असतात बरें ! सज्जन हे आपल्या शत्रूवर सुद्धां दयाच करतात. ”

“ सावित्री, तृषेनें पीडलेल्या माणसाला शीतल जल मिळावें तशासारखी धर्मरहस्य प्रगट करणारी तुझी ही वाणी मला तृप्तिकारक वाटते. हे कल्याणि, या सत्यवानाच्या जीविताशिवाय दुसरा वाटेल तो वर तूं मागून घे आणि परत जा. तूं किती बरे दूर आलीस ! ”

“ माझ्या प्रिय पतीच्या संनिध असल्यामुळें मला हें स्थान मुळींसुद्धां दूर नाहीं. आणि जेथें मन पोचूं शकतें ते स्थान काय दूर म्हणतां येईल ? वाटेनें चालत चालतां माझ्या कांहीं गोष्टी तर आपण ऐका. भगवान् सूर्यनारायणाचे आपण प्रतापशाली पुत्र आहां. मृत्युलोकांतील सर्व लोकांसाठीं सारखाच धर्म आपण लागू केला आहे, त्याला अनुसरूनच लोक चालतात. म्हणूनच हे ईश्वर, लोकांत धर्मराज म्हणून आपली ख्याति आहे. खरोखर, धर्मनिष्ठ सज्जनावर माणसाचा जितका विश्वास असतो तितका स्वतःवरहि नसतो. प्रत्येक मनुष्य सज्जनांविषयीं प्रेम ठेवतो. सज्जन हे प्रेममूर्ती असतात. म्हणून प्रत्येकाचा त्यांच्यावर विश्वास असतो. ”

“ भद्रे, असें भाषण मी आजपर्यंत कोणाच्याहि तोंडून ऐकलें नव्हतें. मी संतुष्ट झालों आहे. एक या सत्यवानाचें जीवित सोडून बाकी वाटेल तें तूं मागून घे. आतां तूं किती दूर येणार ? तुझ्यासारख्या राजकन्येला इतके श्रम योग्य नव्हेत. ”

...५

सावित्रीनें आपलें भाषण पुढें चालविलें: "सज्जनांचें धर्माचरण नेहमीं अढळ असतें. धर्माचरणांत तें कधी माघार घेत नाहींत, आणि धर्माचरण करतांना ते दुःखाचाहि अनुभव करीत नाहींत. सज्जन सर्वदा निर्भय असतात. आपल्या सत्याच्या योगानें ते सूर्याचें रक्षण करतात. आपल्या तपोबळानें ते भूमीला टिकवून धरतात. हे धर्मराज, होऊन गेलेल्या आणि आजच्या वर्तमान सर्व लोकांना आधार फक्त सज्जनांचाच आहे. श्रेष्ठ लोक याच रस्त्यानें गेले आहेत असें स्मरण करून सज्जन परकार्यांत रत राहातात, आणि मोबदल्याची अपेक्षा ठेवीत नाहींत.सज्जनांचा समागम निष्फळ होत नाहीं, त्यांच्याकडून मिळालेलें द्रव्य नष्ट होत नाहीं. हा धर्म अबाधित असल्यामुळें सज्जन हेच विश्वाचे संरक्षक होत."

"हे पतिव्रते, तूं धर्माचें हृदयच माझ्यापुढें अुघडें केलें आहेस. जसजशी तुझी पवित्र वाणी अैकूं लागतों तसतशी तुझ्याविषयीं अुत्कृष्ट भक्ति माझ्या हृदयांत अुत्पन्न होत जात आहे. तुला अिच्छेला येअील तो वर मागून घे."

सावित्रीचें काम झालें. ती अुत्साहानें म्हणाली:

"भगवन्, आतां पावेतों जणूं माझ्या पापाचें फळच माझ्यापुढें अुभें असावें तसें 'सत्यवानाच्या जीविताला सोडून' हें वचन मला अैकावें लागत होतें. तें आपल्या या वचनांत नाहीं. मी धन्य झालें. सत्यवान फिरून जिवंत व्हावें हें माझें मागणें आहे. कारण पतीवांचून जगणें हें मरणतुल्यच आहे. पतीला सोडून सुखाची, लक्ष्मीची अथवा स्वर्गाचीहि मला अिच्छा नाहीं. पतीचा वियोग सहन करून जगणेंहि मला आवडणार नाहीं."

जें कालत्रयींहि टळायचें नाहीं तें सावित्रीच्या धर्मनिष्ठेनें आणि अेकनिष्ठ प्रेमानें टळलें. यमराजांनीं आपला पाश सोडून दिला आणि म्हटलें: "हे कुलनंदिनी कल्याणी सावित्री, घे, या तुझ्या पतीला मी सोडून दिलें. आतां हा निरोगी होअून तुझे मनोरथ पूर्ण करीत चारशें वर्षेंपर्यंत जगेल आणि तुझ्या सहाय्यानें त्याला धर्मप्राप्ति होअील. सत्यवान धर्माचरणामुळें पृथ्वींत सर्वत्र ख्याति पावेल, आणि अनंत कालापर्यंत तुझी कीर्ति या लोकांत अमर होईल. तुला प्रिय असा वर तर मी तुला दिला पण याच्या अगोदर चार वेळां मी तुला वर देण्याचें कबूल केलें आहे, त्याबद्दल

तूं कांहीं मागून घेणार नाहींस तोंवर मी तुझ्या बंधनांतच आहे. मला कृपा करून वचनमुक्त कर. "

आतां काय सावित्रीला मागण्यासारखें पुष्कळ मुचण्याजोगें होतें. आपल्या सासऱ्याला पुनः दृष्टि प्राप्त व्हावी, त्याचें राज्य त्याला परत मिळावें, पित्याला पुत्र नाहीं त्याला पुत्र व्हावा असें पुष्कळ पुष्कळ तिनें मागून घेतलें. माणसाजवळ मागायचें असलें तर संकोच धरायचा !

यमराज सत्यवानाला सोडून स्वतःहि मुक्त आणि संतुष्ट झाले आणि त्यांनीं आपल्या मंदिराकडे प्रयाण केलें. सावित्री पतीचें शव जेथें पडलें होतें तेथे परत आली आणि तिनें पतीचें डोकें पुनः मांडीवर घेतलें. त्या पतिव्रतेच्या हाताचा स्पर्श होतांच सत्यवान पुनः सजीव झाला आणि डोळे उघडून अत्यंत प्रेमपूर्वक सावित्री-कडे पाहूं लागला.

अुठल्याबरोबर सत्यवान म्हणाला, "कितीवेळ मी निजून राहिलों हा ? तूं मला वेळेवर कां बरे अुठविले नाहींस? आणि मला ओढून घेअुन जाणारा तो श्यामवर्ण पुरुष कुठें आहे. ? "

त्या वेळीं सावित्री किती हर्षभरानें बोलली असेल ! मृत पतीला पुनः जिवंत होऊन प्रेमभरानें बोलतांना अैकून तिला केवढा आनंद झाला असेल! ती म्हणाली: "आपण पुष्कळ वेळ निजला. प्रजेचें संयमन करणारे यमराज आपल्याला सोडून निघून गेले आहेत. आतां थकवा अुतरला असला तर उठावें हेंच बरें. हा पहा, चहूंकडे अंधार पसरायला लागला आहे. "

सत्यवान अुठला. अुठून अिकडे तिकडे पाहूं लागला. विसरलेली गोष्ट आठवावी तसा सबंध वनप्रदेश पाहून तो म्हणाला: " प्रिये, तुझ्याबरोबर फळें वेचलीं आणि लांकडें तोडलीं आणि मग डोक्यांत वेदना होअूं लागल्या म्हणून मी निजलों अेवढे मला आठवतें. त्यानंतर कोण जाणें काय झालें. मला चांगलीच चक्कर आली ! अितक्यांत एक मोठा तेजस्वी पुरूष दिसूं लागला. नंतरचें कांहीं स्मरत नाहीं. हें सारें काय स्वप्न असेल? तुला तसें कांहीं दिसलें ? "

सावित्री प्रसंग जाणणारी होती. ती म्हणाली: " आर्यपुत्र, आतां फार अुशीर झाला आहे. पिताश्री आपली वाट पहात असतील. पहा, रात्रीं फिरणाऱ्या पशूंचे

शब्द अैकूं येअूं लागले आहेत. कोल्ह्यांचें रडणें चाललें आहे. झाडांचीं पानें सुद्धां कसा भयंकर आवाज करीत आहेत. सर्व कांहीं तुम्हांला उद्यां सांगेन. आतां घरीं चलावें."

सत्यवान अगदीं थकून गेला होता. चालणें त्याला अशक्य होतें. चहूंबाजूला पसरलेला अंधःकार पाहून आणि आपल्याला किती दूर जायचें आहे याचा विचार करून तो म्हणालाः "आतां परत जाणें कठीण आहे आणि अंधारांत तुला वाटहि सांपडायची नाहीं." सावित्री चांगलीच गोंधळली. जावें हें बरें कीं न जावें हें बरें ? तिला स्वतःला निर्णय करतां येअीना. तेव्हां तिनें पतीलाच विचारलें: "तो पलिकडे दावाग्नीनें दग्ध झालेल्या वृक्षांत कुठें कुठें अग्नि दिसत आहे. त्यांतून थोडा विस्तव आणून मी लाकडें पेटवितें म्हणजे त्या प्रकाशांत आपल्याला जातां येअील, आणि आजारीपणामुळें आपल्याला चालणें अशक्य असेल तर आपण दोघं सारी रात्र अिथेंच काढूं या. सकाळीं घरीं जातां येअील."

सत्यवानाचेंहि मन घुटमळत होतें. चालण्याअितकी तर शक्ति नव्हती पण घरीं गेलों नाहीं तर आअीवडील कसा कल्पांत करून सोडतील याची त्याला कल्पना होती. तो म्हणालाः "आईबाबांना मी न दिसल्यामुळें किती दुःख होईल! मीच त्यांचा अेकमात्र आधार आहे ना ? आतांपर्यंत मी निजून राहिलों ही केवढी माझी चूक! या वैरी निद्रेची मला मोठी चीड आली आहे. आतांपर्यंत बाबांनी माझ्या शोधासाठीं आकाशपाताळ अेक करून टाकलें असेल. त्यांचें जर कांहीं बरें वाअीट झालें तर मला जगणें अशक्य आहे. आतां घरीं गेल्यावांचून दुसरा मार्ग नाहीं." वडिलांचें दुःख आणि आपली निर्बलता यांचा विचार येअून सत्यवानाला रडूं कोसळलें. धीरोदात्त पुरुष रडूं लागतो तेव्हां अबलाच त्याचें सांत्वन करूं शकते. निष्ठावान सावित्री मुग्ध प्रार्थनेचे बोल बोलूं लागली. पतीच्या डोळ्यांतील अश्रु पुसून ती म्हणालीः "जर आजपर्यंत मीं कांहीं तप केलें असेल, विनोदांत सुद्धा असत्य बोलले नसेन तर आजची रात्र माझ्या सासूसासऱ्यांना आणि पतीला सुखकर होवो!" मग प्रेमशालिनी सावित्रीनें आपले केस बांधले आणि पतीचा हात धरून त्याला तिनें कसेंबसें उभे केलें. वडिलांच्याकरितां वेंचलेल्या फळांकडे सत्यवानाची दृष्टि गेलेली पाहून ती म्हणाली, "ही करंडी मी अिथें डहाळीला अडकवून ठेवते. उद्यां सकाळीं येअून घेअून

जाऊं. लांकडें पुढ्यां राहूं देत अियंच. ही अेवडी कुऱ्हाड मी बरोबर घेते.' " मग तिनें पतीचा हात आपल्या डाव्या खांद्यावर घेतला, आणि आपल्या अुजव्या हातानें त्याच्या कमरेला विळखा घालून ती गजगामिनी हळूंहळूं चालूं लागली. सत्यवानाला सावित्रीचा असा आश्रय घेतांना संकोच वाटला कीं आनंद वाटला कोण जाणे. पण तो म्हणाला: "हे भीरु, या वाटेनें मी पुष्कळ वेळां गेलों असल्यामुळें ही माझ्या ओळखीची वाट आहे. आतां तर चांदणेंहि पानांतून प्रवेश करून थोडा थोडा मार्ग दाखवीत आहे. अर्ध्या वाटेवर पळसाचीं झाडी आहे. तिथें जरा सावधगिरी ठेवली पाहिजे. तिथें रस्ता फुटतो. त्यांतला अुत्तरेकडचा रस्ता तो आपला. आतां चल लवकर. मला आतां जरा बरें वाटतें. आओीबाबांना लवकर जाऊन भेटूं."

अिकडे द्युमत्सेनाला अेकाअेकी दृष्टि प्राप्त झाली त्याबरोबर त्याला आश्चर्य वाटलें. पण हें आश्चर्य जास्त वेळ टिकलें नाहीं, सूर्यास्त झाला आणि मुलगा आणि सून अजून आलीं नाहींत हें पाहून म्हाताऱ्याचें आनंदाश्चर्य चिंतेंत अस्त पावलें. म्हाताऱ्या पावलांनीं त्यानें चहूंबाजूला शोध सुरू केला. कितीवेळां तरी पायांत काटे मोडले. अणकुचीदार दगडांनी म्हाताऱ्या शरीरांत अजून रक्त आहे कीं नाहीं याचा शोध घेतला. दर्भाच्या सडांना पुष्कळ वेळां लाल अभिषेक झाला. शेजारच्या ब्राह्मणानीं या वृद्धांची कींव करून पुष्कळ तपास केला. कुठेंहि पत्ता लागेना तेव्हां सर्वजण परत आले. अेकानें शेकोटी पेटविली. दुसऱ्यानें पुराणकाळच्या कित्येक अद्भुत गोष्टी छेडल्या. पण आओीबापांचा धीर खुंटला तो खुंटलाच. त्यांनीं मुक्त कंठानें रडायला सुरुवात केली: "हे पुत्रा, हे साध्वी वधु, तुम्ही कुठे रे आहां !" सत्यवादी ब्राम्हण आश्वासन देअूं लागले. सुवर्चा म्हणाला, "सावित्री तप, अिंद्रियदमन आणि सदाचार यांनी युक्त आहे. म्हणून माझी खात्री आहे कीं सत्यवान जिवंत आहे" तपस्वी गौतम म्हणाला, "मी चारी वेदांचें सांग अध्ययन केलें आहे, ब्रम्हचर्य पालन करुन गुरूला आणि अग्नीला संतुष्ट केलें आहे, नुसत्या वायूचें भक्षण करून मी किती तरी अुपवास केले आहेत. अेकूण अेक व्रतांतील अेकाग्र अंतःकरण साक्ष देत आहे कीं तुमचा सत्यवान जिवंत आहे, तो कुशल आहे; माझ्या वचनावर विश्वास ठेवा." गौतमाच्या शिष्यालाहि वाटलें कीं आपणाहि यांत थोडी भर टाकावी. तो म्हणाला, "आमच्या गुरुमहाराजांच्या मुखांतून निघालेलें अेकाहि वचन आजपर्यंत खोटें झालेलें नाहीं, तेव्हां मी खात्रीपूर्वक सांगतो कीं सत्यवान जिवंत आहे." दुसऱ्या अनेक ऋषींनी आपआपल्या समुजतीप्रमाणें आश्वासन

दिलें. शेवटीं दाल्भ्य ॠषी म्हणाले, "सावित्री व्रत करून कांहीं न खातां गेली आहे तेव्हां तुझा मुलगा जिवंत आहे या विषयीं शंकाच नको ·आणि राजा, तुझी दृष्टि तुला परत मिळाली हेंच याचें प्रत्यंतर आहे." दोन घटका अशा गोष्टी चालल्या अितक्यांत दोघेजण घरीं येअून पोंचले. ब्राह्मण आनंदानें म्हणाले, "पहा राजा, तुझा मुलगा आणि तुझी सून तुला परत मिळाली. आतां तुझा अभ्युदय जवळ आला समज."

सर्वत्र आनंदीआनंद व्यापून गेला. कितीतरी प्रश्न विचारले गेले आणि अुत्तरें दिली गेली. ॠषींनी सावित्रीला आग्रह केला कीं घडलेली सर्व हकीकत सविस्तर सांगितलीच पाहिजे. गौतम म्हणाला, "सावित्री, तुला प्रत्यक्ष आणि अतींद्रिय दोन्ही वस्तूंचें ज्ञान आहे, तुझ्या तेजानें तर तूं केवळ सावित्री देवताच आहेस. गुप्त राखण्यासारखें कांहीं नसेल तर सर्व वृत्तांत आम्हांला सांग." सावित्रीने सुखानें गोड झालेलें आपलें दारुण दुःख सर्व वर्णन करून सांगितलें तेव्हां सर्व ॠषी अेकस्वरानें बोलले :"आमच्या राजाचें सारें कुळ संकटरूपी काळोख्या खड्ड्यांत गडप होत होतें, हे साध्वी, तूं आपल्या शीलानें, आपल्या व्रतानें आणि पुण्याअीनें आज तारलें आहेस." गोष्टी संपल्या, अिकडे रात्रही संपली आणि अरुणोदयाबरोबर द्युमत्सेन राजाच्या राज्यांतील लोक-प्रांतानिधी राजाला परत बोलावण्यासाठीं तेथें येअून पोंचले. शत्रूच्या येथें मोठी राज्यक्रांती झाली, शत्रू मारले गेले आणि प्रजेनें अेकमतानें राजा द्युमत्सेनच आम्हांला राजा पाहिजे असा आग्रह धरला. म्हणून आम्ही आपल्याला बोलवायला आलो आहोत" असें सचिवांनीं सांगितलें. अिकडचें सगळे वर्तमान अैकून सचिवसुद्धां तपस्विनी सावित्रीच्या पाया पडले.

नारदांनी भाकित केलेल्या सावित्रीच्या दुर्दैवामुळें दुःखित झालेला सावित्रीचा पिता आपल्या घरीं आज कोणत्या स्थितींत असेल बरें ? हा आनंदसमाचार तत्काळ त्याला पोचता करण्याचें कुणाला ना कुणाला सुचलेंच असेल.

वैशंपायन म्हणतातः सावित्रींच्या या पुण्यकथेने आजवर असंख्य लोकांना आश्वासन दिलें आहे. आणि अिथून पुढेंहि जे कोणी सावित्रीचें हें अुत्कृष्ट आख्यान श्रवण करून त्याचें ध्यान धरतील त्यांचे सर्व मनोरथ पूर्ण होअून ते दुखःमुक्त होतील..

१९३०

# वटसावित्री

**ज्येष्ठ पौर्णिमा** **१ दिवस**

हा सण अुन्हाळ्याच्या सुटींतच पुष्कळसा जातो. 'सतीच्या पातिव्रत्यापुढें मृत्युहि हार खातो' असा बोध असणाऱ्या या गोष्टींत असामान्य काव्य भरलेलें आहे. वटवृक्षाची पूजा करण्यापेक्षां सावित्रींचीच पूजा करणें हें अधिक योग्य आहे. सावित्री-च्या कथेंत स्त्रियांचें स्वातंत्र्य आणि स्त्रीधर्माचा सर्वोच्च आदर्श पाहायला मिळतो. या दिवशीं सावित्रीचें चरित्र अनेक प्रकारें गायिलें पाहिजे. मुलींनीं विशेषतः हा सण साजरा करावा.

## महाअेकादशी : : १५

आषाढ शु० ११ १/२ दिवस

या दिवसापासून चातुर्मासाला आरंभ होतो. चातुर्मासाच्या निमित्तानें कित्येक व्रतें घेण्याचा हा दिवस आहे. पावसाळ्यांत हवा चांगली नसते. विशिष्ट प्रकारचा संयम स्वीकारला तरच पावसाळा निर्विघ्न आणि सुखानें पार पडतो. पावसाळ्यांत प्रवास करणें कठीण असल्यामुळें अेकाच ठिकाणीं बसून अध्ययन करण्याचा जुना रिवाज होता. या दिवशीं सर्वांनीं पहांटे ४वाजतां स्नान करून सामुदायिक प्रार्थना करावी. प्रार्थनेंत गीतेचा ९ वा अध्याय म्हणावा. रात्रीं घरच्या, शेजारच्या मंडळींनीं एकत्र येऊन तुकाराम महाराजांच्या निवडक अभंगांचें भजन करावें.

या दिवशीं किंवा आषाढी अमावास्येदिवशीं, ज्या दिवशीं सवड असेल त्या दिवशीं, कांतण्याची चढाओढ ठेवावी, आणि ती ठेवली तर तो दिवस सबंध सुटीचा समजावा. हवेंत दमटपणा असतो तेव्हां सूत अधिक चांगलें कांततां येतें.

पावसाळ्यांत गोशाळेमध्यें डांसांचा उपद्रव फार असतो. म्हणून रात्रीं धूर करून जनावरांचें रक्षण करणें अिष्ट आहे.

## आचार्य देवो भव : : १६

( आषाढ शु. १५ )

मनु भगवानानें म्हटलें आहे, आणि आमचीहि अशी श्रद्धा आहे कीं सावित्री म्हणजे विद्या ही आमची माता आहे आणि आपण आचार्य आमचे पिता आहांत, अज्ञान अवस्थेंत जन्मलेल्या आम्हांला ज्ञानाचे संस्कार देऊन आपणच आम्हांला नवा जन्म दिला आहे.

आपल्या डोळ्यांत प्रेमाची जादू आहे; आपल्या चित्तांत ज्ञानापासून अुत्पन्न होणारें कल्याण आहे; प्रभूचें मंगल हृदय आपल्याला मिळालें आहे; म्हणूनच तर आपण अशी निःस्वार्थ सेवा करीत आहांत.

मूर्तिकार जसा ओबडधोबड दगडांत मूर्तीला प्रथम पहातो आणि मागाहून त्यांतून कोरून त्या मूर्तीला प्रगट करतो, तद्वत् हे गुरुदेव, शिष्याच्या प्राणाची संपूर्णता आपण पहातां, आणि आपल्या अद्भुत कौशल्यानें तिचा विकास करतां. जीवनाची सफलता आम्हांला आपल्याकडूनच लाधते.

स्वतः निष्काम असूनसुद्धां आपण परमेश्वरापाशीं मागितलें कीं " माझें ज्ञान समृद्ध होवो; मी मोक्षविद्या धारण करणारा व्हावें; माझें शरीर निरोगी आणि स्थिर असो; माझी जीभ अमृतस्रोती बनो; माझें अध्ययन विस्तृतपणें वाढो; माझ्या ज्ञानाचा शेवट कधींहि न येवो."

आणखी आपली प्रार्थना आहे कीं, " पाणी जसें तलावाकडे वाहातें, महिने जसें वर्षाकडे वळतात, तसे सर्व ब्रह्मचारी माझ्याकडे येवोत. त्यांच्या शंका दूर होवोंत, त्यांचें ज्ञान वाढो; त्यांची वृत्ति संयमशील होवो; आणि अशा विद्यार्थ्यांच्या द्वारां, या ठिकाणीं ज्ञानाचें सत्र आहे, अशी माझी कीर्ति पसरो."

अितकी वत्सलता आम्हांला अितरत्र कुठें मिळणार? आम्ही अेक आपल्यालाच ओळखतों; आपल्याला आम्ही शरण आहों; आपली आज्ञाच आम्हांला प्रमाण आहे. त्वं हि नः पिता य अस्माकं अविद्यायाः परं पारं तारयसि । नमः परमऋषिभ्यः नमःपरम ऋषिभ्यः । ( तूंच आमचा, पिता, तूंच आम्हांला अविद्येच्या परतीराला घेऊन जातोस. थोर ऋषींना नमस्कार असो. )

# गुरुपूर्णिमा

आषाढ १५ १ समय

गुरुपूर्णिमेचा सण अवश्य साजरा करण्यासारखा आहे. पण वाटेल त्या माणसाला ईश्वर समजून त्याची आंधळी पूजा करण्यानें गुरूंचा किंवा शिष्याची कोणाचीच उन्नति होणार नाही. हिंदुधर्मांत श्रीवेदव्यासांचें स्थान असाधारण आहे. गुरुपूर्णिमेच्या दिवशीं वेदव्यासांचें स्मरण करून त्यांचें कार्य समजून घ्यावें हें उचित आहे,

श्रीख्रिस्ताचें जीवन, कथन आणि मरण यांविषयींहि सांगतां येईल.

शीखधर्मांत सांगितलेलें गुरूचें रहस्य, त्यांच्या गुरूंची तेजस्वी चरित्रें वगैरे दत्तजयंतीच्या दिवसाप्रमाणें आजहि सांगता येतील. ( दत्तजयंती प्रकरण पहा. )

या दिवशीं विद्यार्थ्यांनीं संस्थेसाठीं विशेष काम करावें, सेवा द्यावी. आपल्या संस्थेसाठी फंड गोळा करता आला तर तो करावा.

## मराठी मीरा 

### आषाढ वद्य १३

जनाबाओीच्या आओीबापांनीं तिला एका भगवद्भक्ताच्या घरीं दासी म्हणून देअून टाकलें; तेथें तिनें आजन्म दळणकांडण करून स्वतःचें पोट भरलें आणि ओीश्वराची भक्ति करून आपल्या जन्माचें सार्थक केलें.

जनाबाओीचें लग्न झालें नव्हतें. ज्यांच्या घरीं ती दासी होती ती सगळी ओीश्वर-परायण, धर्मभीरु मंडळी होती. ज्याप्रमाणें मीराबाओीनें भगवंतांशीं लग्न लावून घेतलें होतें त्याचप्रमाणें जनाबाओीनेंहि केलें होतें. मीराबाओी राजघराण्यांतील असल्यानें तिचा छळ झाला आणि तिच्या बलिदानानंतर तिचें देव्हारे माजले. बिचाऱ्या जनाबाओीला विचारतो कोण ?

. तसें पाहिलें तर जनाबाई म्हणजे महाराष्ट्राची मीराबाओी. तिनें नम्रपणें नामदेवाच्या कुटुंबाची सेवा केली आणि लग्नाच्या अभावीं जें प्रेमजीवन अतृप्त होतें तें हृदयानें विठोबाशीं रममाण होअून समृद्ध केलें. विठोबा येअून तिची वेणी फणी करीत असें, तिच्या दळणांकांडणांत मदत करीत असे, आणि थंडीच्या दिवसांत तिची वाकळ पांघरून निजत असे.

मीराबाओीच्या काव्यांत जी प्रेमोत्कट भक्ति आहे तीच अगदीं भोळ्या भाषेंत जनाबाओीच्या अभंगांतून दिसून येते. भक्तिकाव्यांत स्त्रीसहज भाषा जर पहा-वयाची असेल तर ती जनाबाओीच्या अभंगांत पहावी. जनाबाओीनें शरीरधारणासाठीं शेवटपर्यंत काबाडकष्ट केलेले दिसतात. खरोखर जनी ही जनतेची प्रतिनिधि होती व तिनें जनार्दनाला आपलें जीवन अर्पण करून कृतार्थता मिळविली होती.

मुलींच्या शाळेंत जनाबाओीचा दिवस पाळून त्या दिवशीं तिचे अभंग म्हणत म्हणत दळणकांडणाचा कार्यक्रम ठेवावा.

१९–१२–३९

# नागपंचमी : : १८

श्रावण शु. ५.

नागपंचमीचा अुत्सव महाराष्ट्रांत मोठ्या धामधुमीनें साजरा करण्यांत येतो. रानांतून चिकणमाती आणून, कणीक मळतात तशी रूच्या पोलासकट ती मळून तिला मोठया फडीच्या नागाचा आकार देतात. त्या नागाच्या शेपटीची मोड अशी कांहीं सुन्दर बनवितात कीं पहातच राहावें. नागाला भयंकर असें दोन डोळे पाहिजेतच; तेव्हां डोळ्यांच्या ठिकाणीं दोन गुंजा बसवून टाकायच्या! नागाला ओश्वरानें दुहेरी जीभ दिलेली असते. ही देणगी निसर्गानें मुत्सद्द्यांना, वकीलांना आणि कोर्टांत साक्षीदाराचा धंदा करणाऱ्यांना दिली असती तर पुष्कळच सोय झाली असती. बिचाऱ्या नागाला बोलायचेंच नसतें तेथें खऱ्याखोटयासाठीं दोन जिभा घेअून तो करणार काय? पण निसर्गानें त्याला दुहेरी जीभ दिली आहे म्हणून आम्हीहि दूर्वांचीं दोन पानें त्याच्या तोंडांत खुपसून देतो. त्याच्यापुढें दुधाचा पेला ठेवून त्याची पूजा करतात. मग काय, तो खरोखरीच अेखाद्या कल्याणकर्त्या देवतेप्रमाणें भासूं लागतो.

पण या नागपंचमी मागें अितिहास काय आहे? प्रत्येक सणाच्या किंवा व्रताच्या पाठीमागें त्याच्या संबंधींचा अितिहास हा असतोच. नागपंचमीच्यामागें अेक लहानशी करुण दंतकथा तर आहेच; पण नागपूजा जी अितकीं सार्वत्रिक झाली होती तिच्यामागें तर अेक मोठा महाभारत अितिहास आहे. महाभारताच्या आदि-पर्वांतच तो नकळत विणला गेला आहे.

आपल्या अिकडे म्हणजे ब्राह्मणांत आणि आर्यांत गोत्रप्रवर असतात; तशी द्राविडादि अितर जातींत देवकें असत. अिंग्रजींत देवकांना Totem म्हणतात. आज कित्येक पहाडी जाती आणि जंगली लोक आपल्या देवकांच्या नांवांनी ओळखले जातात. महाभारतकाळीं आर्य आणि नागजातींमध्यें युद्धें होत असत. या नागजातीचा तक्षक नांवाचा राजा होता. त्यानें परीक्षित राजाचा सूड घेण्यासाठीं त्याच्या नगरींत घुसून त्याचा खून केला. मग तर या दोन जमातींमध्यें भयंकर युद्ध सुरू झालें. तें शेवटीं एका आस्तिक ऋषीनें मिटविलें. या आस्तिकाचा पिता आर्य होता आणि माता

नागकन्या होती. अशा आंतरजातीय विवाहाशिवाय हा झगडा मिटण्यासारखा नव्हता. हे नागलोक मोठे शूर, कलारसिक, नगर-रचना-कुशल, आणि पुरोहिताचें काम. करण्याअितके विद्वान होते. आर्य आणि नाग यांच्यामध्यें आंतरजातीय विवाह व्हावा अितके ते परस्परांच्या सहवासांत राहिले होते. शेवटीं नागजाति आर्यांत मिसळली आणि त्यांच्या संतोषाप्रीत्यर्थ हा सण आर्यांच्या सणांत नागपूजा म्हणून घातला गेला.

आर्यांनीं आपल्या चातुर्यानें अेक आंतरजातीय विग्रह दूर केला याची खूण म्हणून या नागपंचमीकडे आपल्याला पहातां येतें.

अेकाद्या विषयीं भीति, धाक, किंवा आदर असला म्हणजे सुद्धां भोळा प्राकृतिक मनुष्य पूजेचा अुपाय अजमावून पहातो. आजची नागपूजा ही नागाच्य भीतिमुळें अुत्पन्न झाली असें म्हटलें तर तें नाकबूल करतां येणार नाहीं. पण हिंदु लोकांनीं शेवटीं त्यालाहि अहिंसेचें रूप दिलेलें दिसतें. तें कांहीं असो, पण परंपरेनें आचारांत आलेल्या व्रतादींच्यामुळें हिंदुस्थानची संस्कृति अखंडित राहिली आहे. आणि हिंदुधर्मानें पुष्कळ रानटी चालीरीतींना अुदात्त ( Sublimate ) केलें आहे.

---

टीपः— या विषयावरील माझा "अैतिहासिक कल्पनातरंग" हा लेख नजरेखालीं घालण्यासारखा आहे.

# नागपंचमी

**श्रावण शुद्ध ५** — **१ दिवस**

मनुष्येतर सृष्टीशीं समभाव, हिंस्र प्राण्यांविषयींहि दयाभाव आणि अहिंसेचें अभयदान या तीन गोष्टी या सणांतून काढतां येतील. नागपचंमीच्या दिवशीं झोपाळ्या-च्या खेळाची प्रथा सार्वत्रिक आहे. वैर शमल्यानंतर करण्यांत येणाऱ्या अुत्सवाचें हें प्रतीक आहे. ही प्रथा चालू ठेवण्यासारखी आहे. नागपंचमीच्या दिवशीं तऱ्ह-तऱ्हेचे मर्दानी खेळ खेळण्याचा कार्यक्रमसुद्धां ठेवावा.

सगळेच सर्प कांहीं विषारी असत नाहींत. पुष्कळ सर्प शेतांत राहून शेतीचें नुक-सान करणाऱ्या अुंदरांना खाअून टाकतात. म्हणून त्यांना क्षेत्रपाळ म्हटलें जातें. त्यांना मारल्यानें शेतीचेंच नुकसान होतें ही गोष्टहि समजावून द्यावी.

## श्रावण सोमवार : : १९

### दुपारची अर्धी सुट्टी

पुष्कळ लोक श्रावण सोमवारीं अर्ध्या दिवसाचा अुपवास करतात. म्हणून हीं सुटी देण्याचीं जरूर आहे. या दिवशी महिम्न अित्यादी स्तोत्रें तोंडपाठ करण्याचा कार्यक्रम ठेवतां येअील. प्रत्येक सोमवारच्या वेगवेगळ्या कथा आहेत. त्यांचा संग्रह केलेला असला तर बरा.

# श्रावण पूर्णिमा

: : २०

## १ दिवस

हा दिवस रक्षाबंधनाचा आहे. भाऊबीज जसा शुद्ध निष्काम प्रेमाचा दिवस' तसा हा दिवस नाहीं. हा निष्कामपणें रक्ष्यरक्षक संबंध जोडण्याचा दिवस आहे. जे स्वतः आपलें रक्षण करूं शकत नाहींत ( किंवा करूं इच्छीत नाहींत ) असे लोक, त्यांचा ज्यांच्यावर पूर्ण विश्वास असतो अशा माणसांकडून, रक्षणाची अपेक्षा ठेवतात आणि त्याचेंच द्योतक म्हणजे राखी. स्त्रिया, ब्राह्मण ( ! ), गायी हे तीन्ही वर्ग रक्षणाचे अधिकारी समजले जातात.

राखीच्या दिवशीं आपल्या हातांत कोणी राखी बांधो वा न बांधो, पण रक्ष्य वर्गाच्या हिताचें चिंतन या दिवशीं केलेंच पाहिजे. विद्यार्थी उगीच गंमतीनें पशु-पक्ष्यांना आणि आपल्यापेक्षां लहानांना पुष्कळ वेळां त्रास देतात. राखीच्या दिवशीं ही स्थिति सुधारण्याचा विचार त्यांनीं केला तर बरें. मात्र हा विचार त्या दिवसापुरताच असतां कामाचा नाहीं. समाजांतील चुकीच्या समजुतीमुळें, जडतेमुळें किंवा तिरस्कारामुळें हरिजनवर्गाचा कांहीं कमी छळ होत नाहीं. रक्षाबंधनाच्या दिवशीं हरिजन जर उच्च म्हटल्या जाणाऱ्या जातीच्या हातांत राखी बांधूं लागले तर सहृदय हिंदूंच्यावर त्याचा मोठा परिणाम होईल. समाजांत ही चाल चालू करण्याच्या कामीं शाळांची मदत होऊं शकेल.

आणि हा प्रेमतंतु हातानें कांतलेल्या सुताचाच असूं शकतो. बाजारी सूत प्रेमाचें वहन कसें बरें करूं शकेल ?

श्रावणी पूर्णिमा द्विज लोकांच्या उत्सर्जन—उपाकर्माचा दिवस होऊन बसला आहे. ' कुंडलें गेलीं नि कान राहिले ' अशासारखी ही स्थिति आहे. विद्याध्ययना-च्या दीक्षेचा हा दिवस; पण आज फक्त जानवें बदलणें आणि सातू व पंचगव्य भक्षण करणें यांतच त्याची परिसमाप्ति होते. जानवें घालणारे वेदाचें अध्ययन करीत नाहींत, आणि जानवें घालण्याची नवी चाल पाडणारेहि अध्ययनाविषयीं आस्था ठेवीत नाहीत. जानव्यासाठीं किंवा गरीबांच्या रक्षणासाठीं म्हणून या दिवशीं पुष्कळ सूत कांतले गेलें तर श्रावणी पूर्णिमेंत कांहीं जीव येईल. श्रावणी पूर्णिमेच्या सबंध दिवसभर सूत कांतून तें जर गोरक्षणासाठीं अर्पण करण्यांत आलें तर यज्ञो-पवीत आणि रक्षाबंधन हीं दोन्हीं कृतार्थ होतील.

# गोकुळाष्टमीचा उत्सव 

(श्रावण व० ८)

अेका वृद्ध साधूशीं, देशांतील राजकीय स्थितीविषयीं माझें अेकदां बोलणें झालें. संभाषण चालूं असतां राजनिष्ठेसंबंधीं मी कांहींसें बोललों. साधुमहाराज अेकदम गरजले, " अहो, हिंदुस्थानांत फक्त दोनच राजे झाले आहेतः अेक मर्यादापुरुषोत्तम श्रीरामचंद्र आणि दुसरे जगद्गुरु श्रीकृष्ण. अजूनहि या दोघांचेंच आपल्या लोकांवर राज्य चालत आहे. राजनिष्ठा त्यांच्याविषयींच संभवते. जमिनीवर नाहींतर पैशावर राज्य करणारे कोणीहि असोत, हिंदूंच्या हृदयावर राज्य चालविणारे फक्त हे दोघेच आहेत. " मला ही गोष्ट अगदीं पटली. भजन समाप्त होतांच ' राजा रामचंद्रकी जय ' किंवा ' गोपालकृष्ण की जय ' पुकारून लोक जयजयकार करूं लागतात तेव्हां जशी भक्ति उचंबळून येते तशी भक्ति दुसऱ्या कोणत्याही मनुष्याविषयीं अुत्पन्न होत नाहीं.

श्रीरामचंद्रांचें जीवन जितकें अुदात्त तितकेंच सुगम आहे. रामचंद्र हा आर्य पुरुषाचा आदर्श पुरुष—पुरुषोत्तम आहे. समाजाच्या नीतिनियमांचें, रिवाजांचें ते परिपूर्ण पालन करतात, अितकेंच नव्हे तर कोणाहि प्रजासत्ताक राजाच्या राष्ट्राध्यक्षालाहि अुदाहरणभूत होअील असा लोकमताविषयीं मान श्रीरामचंद्रांना आहे. माझें जीवन समाजासाठीं आहे असा निश्चय श्रीरामचंद्रामध्यें दृढ आहे.

श्रीकृष्ण हेहि पुरुषोत्तम आहेत, पण भिन्नयुगाचे पुरुषोत्तम आहेत. समाजसंघटना जेव्हां स्वतःच्याच आत्मिक अुन्नतीच्या आड येते तेव्हा तिचीं बंधनें तोडणें आणि नवीन नियम तयार करणें ही वृत्ति श्रीकृष्णांत दिसून येते. तरी पण श्रीकृष्ण हे अराजक वृत्तीचे नव्हते. लोकसंग्रहाचें महत्त्व ते चांगल्या प्रकारें जाणत असत. श्रीकृष्णांनीं धर्माला अेक नवीन स्वरूप दिलें. आणि त्यामुळेंच श्रीकृष्णाच्या जीवनांतील प्रत्येक प्रसंग रहस्यमय बनला आहे. अेखाद्या मोठ्या व्याकरणकारानें अेक मोठा सर्वव्यापी नियम दाखविल्यानंतर जसे त्याचे अपवाद अेका सूत्रांत ग्रथित करावे तसे श्रीकृष्णांनीं आपल्या जीवनांत जणूं मानवधर्माचे सर्व अपवाद सूत्रबद्ध केले आहेत. गोपींबरोबर अत्यंत शुद्ध, पवित्र पण मर्यादारहित प्रेम.

दुराचारी राजा मामा असूनसुद्धां त्याचा वध, भक्ताची प्रतिज्ञा खरी करण्यासाठीं स्वतःची प्रतिज्ञा मोडूनसुद्धां युद्धांत शस्त्रग्रहण अित्यादि सर्व प्रसंग म्हणजे "तत्त्व संभाळण्यासाठीं नियमभंग" केल्याचे दृष्टांत आहेत. श्रीकृष्णांनीं आर्यजनतेला अधिक अंतर्मुख केलें, अधिक आत्मपरायण केलें. भोग आणि त्याग, गृहस्थाश्रम आणि संन्यास, प्रवृत्ति आणि निवृत्ति, ज्ञान आणि कर्म, अिहलोक आणि परलोक अित्यादि सर्व द्वंद्वांचा विरोध आभासरूप आहे, सर्वांमध्यें अेकच तत्त्व भरलेलें आहे, असें श्रीकृष्णांनीं आपल्या जीवनानें आणि अुपदेशानें सिद्ध करून दाखविलें आहे. आर्य-जीवनावर जास्तींत जास्त संस्कार श्रीकृष्णांचाच झाला आहे, तरी या संस्काराचें स्वरूप कसें आहे हें निश्चित करणें कठीण आहे. अत्यंत सरळ भाषेंत लिहिलेल्या भगवद्गीतेचे जसें अनेक अर्थ करण्यांत आले आहेत तसें कृष्णचरित्रांत असलेलें रहस्यहि विविध प्रकारांनीं वर्णिलें गेलें आहे. वाल्मीकिरामायणांतील रामचंद्रांत आणि तुलसीरामायणांतील रामचंद्रांत जसें महदंतर आहे, तसा महाभारतांतील श्रीकृष्ण आणि तुकारामबुवांचा श्रीकृष्ण अेक असूनहि भिन्न आहेत. हल्लीच्या काळांत सुद्धां नवीनचंद्र सेन यांचा श्रीकृष्ण बंकीमचंद्रांच्या श्रीकृष्णाहून भिन्न आहे, गांधीजींचा श्रीकृष्ण टिळकांच्या श्रीकृष्णाहून वेगळा आहे. आणि अरविंद घोषांचा श्रीकृष्ण तर सगळ्या पेक्षां निराळाच आहे. अशा प्रकारे सुलभ आणि दुर्लभ, अेक आणि अनेक, रसिक आणि विरागी, बंडखोर आणि लोकसंग्राहक, प्रेमळ आणि निष्ठुर, मायावी आणि सरळ अशा श्रीकृष्णाची जयंती कशी साजरी करावी हें ठरविणें महाकठीण आहे.

श्रीकृष्णांचें चरित्र त्यांच्या जीवनाअितकेंच व्यापक आहे. जगांतील प्रत्येक स्थिति श्रीकृष्णांनीं भोगली आहे. प्रत्येक स्थितीचा श्रीकृष्णांनीं आदर्श दाखविला आहे. श्रीकृष्णांचें बालपण अतिशय रम्य आहे. गायी वासरांवरील त्यांचें प्रेम, वनमालांविषयीं त्यांची आवड, मुरलीचा मोह, बाळमित्रांचा त्यांचा स्नेह, मल्लविद्ये-विषयीं त्यांचा अनुराग हें सर्व कांहीं अद्भुत आणि अनुकरणीय आहे. लहान मुलांनीं अवश्य त्यांचें अनुकरण करावें. सुदामाचें चरित्र लक्षांत आणून गोकुळाष्टमीदिवशीं आपण आपल्या दूर राहात असलेल्या मित्रांना दोन दिवस अेकत्र राहाण्यासाठीं, श्रीकृष्णाचें गुणगान करीत खेळण्यासाठीं बोलावलें तर तें पुष्कळ अुचित होअील.

...६

श्रीकृष्णांच्या मनांत लहानमोटा, गरीब श्रीमंत, ज्ञानी–अज्ञानी, सुंदर किंवा कुरूप असा कसलाहि भेद नव्हता. गाअी चारायला न्यायच्यावेळीं श्रीकृष्ण साऱ्या सोबत्यांना सांगत कीं प्रत्येकानें आपापलें खाण्याचें बरोबर घेअून यावें. मग ते सगळे मिळून सर्वांची शिदोरी अेकेठिकाणीं करून प्रेमानें वनभोजन करीत. आजहि आपण अेका शाळेचे विद्यार्थी, अेका ऑफिसांतील कर्मचारी, अेका मिलमधील कामगार, अेका क्लबांत खेळणारे सभासद आपापल्या घरांतून खाण्याचें घेअून अेकत्र मिळून शहराच्या किंवा गांवाच्या बाहेर अेखाद्या विहिरीवर किंवा नदीच्या कांठीं झाडाखालीं गप्पा मारीत, गात, खेळत किंवा भजन करीत अेक दिवस काढूं तर कांहींसुद्धां बिघडणार नाहीं. मात्र या वनभोजनांत लाडू, भजीं, चिवडा नाहीं चालणार. गोकुळाष्टमीदिवशीं मुख्य आहार गोरसाचाच असला पाहिजे. दूध, दहीं, लोणी आणि कंदमूळफळ हाच आहार या दिवशीं योग्य. धर्मसंशोधक जगद्गुरूचा ज्या दिवशीं जन्म झाला त्या दिवशीं मुलांनीं असा सात्त्विकच आहार करावा. मोठ्या माणसांना अुपवास करावा. अुपवासाची प्राचीन प्रथा सोडूं नये. त्यांत पुष्कळ खोल रहस्य आहे. अुपवासानें मन अंतर्मुख होतें. दृष्टि निर्मळ होते, शरीर हलकें राहातें. वारंवार अुपवास करण्याची सवय असेल तर अुपवासादिवशीं मन अधिक प्रसन्न राहातें, असा अनुभव पुष्कळांचा आहे. अुपवासानें वासना शुद्ध होते, संकल्पशक्ति वाढते, शरीरांत कांहीं दोष नसेल तर अुपवास केल्यानें चित्त अेकाग्र होतें आणि धर्माची अत्यंत गूढ तत्त्वें स्पष्ट होतात. अुपवास करून, बुद्धियोग असेल तर धर्मतत्त्वाचें चिंतन करावें, आणि तितकी शक्ति नसेल त्यानें श्रद्धावान लोकांशीं धर्मचर्चा करावी. तेंहि घडूं शकले नाहीं तर गीतेचें पारायण करावें. नामसंकीर्तन, भजन वगैरे करावें सात्त्विक संगीतयुक्त भजनें गावींत. अुपवासादिवशीं व्यावहारिक कामें शक्य तर कमीं करावींत, पण रिकामा वेळ आळस, निद्रा किंवा व्यसनें यांत घालवूं नये, पुष्कळ वेळां आपल्याला सुंदरसुंदर धार्मिक वचनें, भजनें, पदें आठवून येतात, पण तीं लिहून काढायला आपल्याला वेळ मिळत नाहीं. या दिवशीं तीं लिहिण्यांत वेळ काढणें कांहीं वावगें नाहीं.

सार्वजनिक कार्य करण्याची ज्यांना शक्ति असेल त्यांनीं गोपाळाच्या जन्मोत्सवादिवशीं गोरक्षणाची चळवळ करावी याहून अुत्तम गोष्ट कोणती असूं शकेल? श्रीकृष्णाच्या सोबत्यांना दूधतूप जितकें मिळत होतें तितकें दूधतूप जोवर आपल्या

मुलांना मिळत नाहीं तोंवर श्रीकृष्णजन्मोत्सव आपण योग्य प्रकारे साजरा केला असें म्हणतांच येणार नाहीं. श्रीकृष्ण हे अप्रतिम मल्ल होते, गृहस्थाश्रमांत राहूनहि ब्रह्मचर्य पाळीत होते, श्रीकृष्ण दीर्घायु होते, म्हणूनच प्रत्येक आखाड्यांत जन्मोत्सव साजरा केला गेला पाहिजे आणि श्रीकृष्णांच्या चरित्रांतील या विसरलेल्या भागाची आठवण पुनः ताजी केली पाहिजे. ज्यांचे पांडित्यांतच जीवन व्यतीत करण्याची अिच्छा असेल त्यांच्यासाठीं सर्वोत्कृष्ट काम हें कीं त्यांनीं, गीतेंत श्रीकृष्णांनीं अर्जुनाला जसा अुपदेश केला आहे तसेच श्रीकृष्णांनीं भिन्न भिन्न प्रसंगीं काढलेले अुद्गार महाभारतांमधून किंवा भागवतांतून, विष्णुपुराणांतून किंवा हरिवंशांतून जितके मिळतील तितके सर्व अेकत्र करावे. मग हे अुद्गार आणि श्रीकृष्णचरित्र याला अनुसरून गीतेचा अर्थ बनवावा आणि या महान जगद्गुरूंचें जीवनदर्शन (Philosophy of Life) काय होतें, त्याचें राजकारण काय होते तें निश्चित करून लोकांपुढे ठेवावें.

स्त्रियांनीं गोकुळाष्टमीचा दिवस कसा साजरा करावा हा फार नाजूक प्रश्न आहे. भक्तीच्या अतिरेकाचें स्वरूप आपल्या भक्तिसूत्रांत नारदानें वर्णन केलें आहे, त्यावरून नवोवृत्तींना गोपी कल्पून परब्रह्म परपुरुषावर त्या किती आसक्त होत्या याचें वर्णन कित्येक कवींनीं अितके कांहीं केलें आहे कीं श्रीकृष्णांच्या चरित्राचें परिपूर्ण रहस्य लोक जवळ जवळ विसरून गेले आहेत. श्रीकृष्णांना गोपीजनवल्लभ म्हटलें आहे. श्रीकृष्ण आणि गोपी यांच्यामधील प्रेम किती विशुद्ध आणि आध्यात्मिक होतें याची कल्पना ज्या हृदयाला येअू शकली नाहीं त्यांनी अेक तर कृष्णाला खाली अुतरविला आहे अथवा त्या प्रेमाचें वर्णन करणाऱ्या कवींना हलक्या वृत्तीचे आणि असत्यवादी ठरवून टाकले आहे. कृष्ण–गोपींमधील प्रेम वर्णन करतांना कवींनी चूक केली नाहीं असें माझे म्हणणें नाही. माझे तर हे म्हणणें आहे कीं समाजाची स्थिति पाहून कवींनी अधिक सावधपणे त्या प्रेमाचें वर्णन करणे अिष्ट होते. मुसलमानी धर्मांतील सुफी पंथाच्या मस्त कवींना आणि फकीरांना कट्टर मुसलमान राजे सजा करीत त्यावेळीं सांगत कीं हें साधू सांगतात तें खोटे नाहीं पण अनधिकारी समाजापुढें अशा रीतीनें रहस्यमय गोष्टी ठेवून तें समाजाचें नुकसान करतात आणि म्हणूनच ते शिक्षेला पात्र आहेत. गोपींचें प्रेम आपल्याला समजत नाहीं म्हणून कांहीं आजच्या नीतिकल्पनांना पसंत पडेल असें स्वरूप त्या प्रेमाला देण्याची जरूर नाही. मीराबाईनें

गोपींचे प्रेम कसें होते ते स्पष्ट करून दाखविले आहे. जेव्हा जेंव्हा धर्मावरून लोकांची श्रद्धा अुडून जातें तेव्हां तेव्हां ती श्रद्धा पुनः स्थापन करण्यासाठी मुक्त पुरुष या जगात अवतार घेतात आणि आपल्या प्रत्यक्ष अनुभवाने आणि चरित्राने लोकांत धर्माविषयीं श्रद्धा अुत्पन्न करतात. याला अनुसरून गोपींच्या शुद्ध भक्तीविषयीं जेव्हां लोकांत अश्रद्धा अुत्पन्न झाली तेव्हा गोपींपैकी अेकीनें–कदाचित् राधेनेंहि असेल-मीरेचा अवतार घेअुन प्रेमधर्मस्थापना केली. जर आपल्याला अीश्वर आणि भक्त यांच्यामधील हा अनिर्वचनीय प्रेमसंबंध स्पष्ट करता आला तर मग गोपींच्या प्रेमाची किंवा विरहाची पदें गाण्यात मला कांहीं हरकत दिसत नाहीं. मीराबाअीचा त्याग आपल्या हातून होणार नाहीं. काळ वाअीट आला म्हणून काय मीराबाअीला आपण विसरून जावें? श्रीकृष्णाबरोबर फक्त गोपींचाच संबंध होता असें नाहीं. यशोदा बाल–कृष्णाची पूजा करी, कुंतीं पार्थसारथीची पूजा करी, सुभद्रा आणि द्रौपदी कृष्णाला बंधुरूपानें पूजीत. श्रीकृष्णांचें संपूर्ण चरित्र आपल्या स्त्रियांच्यापुढें ठेवलें पाहिजे. श्रीकृष्ण किती संयमी होते, किती नीतिज्ञ होतें, किती धर्मनिष्ठ होते हें सर्व स्त्रियांपुढें स्पष्ट केलें पाहिजे., आणि मगच गोपीप्रेमाचा आदर्श त्यांच्यापुढें ठेवला पाहिजे. प्रेम आाण मोह यांच्यामध्यें स्वर्ग– नरकाअितका भेद आहे. तो स्पष्ट करून दाखविला पाहिजे. रासलीलेंत गोपींच्या मनांत मलिन कल्पना येतांच श्रीकृष्ण-असंख्य रूपधारी श्रीकृष्ण अेकदम अदृश्य झाले, गोपींचे मन पवित्र झाले तेव्हांच तें फिरून प्रगट झाले असा सुंदर प्रसंग पुराणांत – भागवतांत वर्णन केला आहे. त्याचें रहस्य प्रत्येकानें समजून घेतले पाहिजे. तें रहस्य कोणत्याहि माणसापासून गुप्त ठेवण्यांत सुरक्षितता नाहीं. अर्धवट ज्ञानामुळे अुत्पन्न होणारे दोष काढून टाकण्यांचा अुपाय संपूर्ण ज्ञान हा आहे, अज्ञान नव्हें. प्रेमाला आपण त्याच्या शुद्ध रस्त्याने नेले पाहिजे. प्रेम दाबल्याने दबत नाहीं, पण दाबू जातां विकृत मात्र होतें.

गोकुळाष्टमीदिवशी आपण सुदामचरित्र गावें, श्रीकृष्णांनीं गोपींना केलेला अुपदेश गावा, अुद्धवाबरोबर श्रीकृष्णांनी गोपींना पाठविलेला संदेश गावा, गीतेचें रहस्य समजून घ्यावें, रास रमावा आणि अुपवास करून शुद्ध वृत्तीनें त्यांत असलेले रहस्य समजून घ्यावें.

गोकुळाष्टमीदिवशीं आपण गायीची पूजा केली तर त्यांत कांहीं वावगें नाहीं. गायीची पूजा करण्यांत पशूला आपण परमेश्वर मानतो असें नाहीं, तर त्या पूजेच्या

द्वारां आपण प्रेम आणि कृतज्ञता व्यक्त करीत असतो. नदीची पूजा, तुळशीची पूजा, गायीची पूजा, ही योग्यप्रकारें समजून घेअून जर आपण केली तर त्यामुळें अंतःकरणाचें अुत्कृष्ट शिक्षण मिळेल, रसवृत्ति विकसेल, आणि हृदय पवित्र होअून संस्कारी होअील. प्रत्येक पूजेंत अेकच भाव असतो असें नाहीं. पूजा कृतज्ञतेनें होअूं शकते, निष्ठेमुळें होअूं शकतें, प्रेमामुळें होअूं शकते, आदरबुद्धीनें होअूं शकते, भक्तीनें होअूं शकतें, आत्मनिवेदनवृत्तीनें होअूं शकतें, किंवा स्वस्वरूपाच्या संधानानें होअूं शकतें. या दृष्टीनें पहातां गायीची पूजा करण्याला अेकेश्वरवाद्याला किंवा निरीश्वरवाद्यालासुद्धां हरकत वाटूं नये. निरीश्वरवादी ऑगस्टस कॉम्त मानवजातीचा पुतळा बनवून त्याची पूजा नव्हता का करीत? श्रावण महिन्यात पुष्कळशा गायी वितात. घरांतल्या लहान लहान मुलींनीं कृतज्ञतापूर्वक जर गायीची आणि अिकडे तिकडे अुड्या मारणाऱ्या अचपळ अशा छोट्या वासरांची हळदीकुंकवानें पूजा केली तर त्यांच्यांत किती प्रेम--वृत्ति जागृत होअील बरें!

मुलींच्या शाळेंत अनेक रीतींनीं कृष्णजयंती साजरी करतां येअील. घरांतली जमीन चांगली सारवून तिच्यावर रांगोळी काढण्याची चढाओढ लावतां येअील. मुलींनीं गावें, रास खेळावा, कृष्णजीवनांतील निरनिराळ्या प्रसंगांचें गद्यांत आणि पद्यांत वर्णन करावें, घरांतून फलाहार घेअून येअून शाळेंत सर्वांनीं मिळून खावा. त्या दिवशीं शाळेंतील मुलींना आपल्या मैत्रिणींना घेअून येण्याचीहि परवानगी असेल तर अधिक आनंद येअील आणि अधिक मुली शिक्षणाकडे आकर्षिल्या जातील. धार्मिक शिक्षण जर परिणामदायी करायचें असेल तर शाळेला प्रत्येक सणाच्या प्रसंगी देवळाचें स्वरूप दिलें पाहिजे. मूर्तिपूजेला जर आपण बुजत नसूं तर गोकुळाष्टमी दिवशीं शाळेंत पाळणा बांधून पाळणे गावे. यांत मुलींच्या मातासुद्धां अवश्य भाग घेतील.

आज मुलींच्या शाळा समाजाचें अेक अंग बनलेल्या नाहींत. मुलींच्या शाळांनीं समाजांत मूळ धरलेलें नाहीं. आणि त्यामुळें त्या शाळा चालविणाऱ्या अुत्साही देशसेवकांचें अर्धेअधिक श्रम वायां जात आहेत. गोकुळाष्टमीसारखे सण साजरे करण्यांत समाजांतील सर्व स्त्रिया जर भाग घेअूं लागल्या तर शिक्षण हां हां म्हणतां यशस्वी होअील, शिक्षणाचा लाभ शाळेंत शिकणाऱ्या मुलींनाच नव्हे तर साऱ्या समाजाला मिळेल आणि आपण शिक्षणाचें जें पवित्र काम करीत आहों त्यावर कृष्ण-परमात्म्याच्या अमृतदृष्टीचा वर्षाव होअील.

३०–८–२३

## २ गोकुळ अष्टमी

तोच तो सूर्य रोजच्या रोज अुगवतो, तरी दररोज नवा प्राण, नवें चैतन्य, नवें जीवन घेअून येतो. सूर्य जुनाच आहे असें समजून पक्षी निरुत्साही होत नाहीत. कालचाच सूर्य आज आला आहे असें म्हणून द्विजगण परिचयामुळें भगवान दिनकराचा निरादर करीत नाहींत. ज्या माणसाचें जीवन शुष्क झालें आहे, ज्याच्या डोळ्यांचा नूर अुतरून गेला आहे, ज्याच्या हृदयांतील रक्त फिरायचें थांबलें आहे त्यालाच सूर्य जुना आहे. ज्याच्यांत चैतन्याचा थोडातरी अंश राहिला आहे त्याला भगवान् सूर्यनारायण नित्यनूतन आहे. गोकुळ अष्टमी दरवर्षी येते. दरवर्षी तीच तीं कथा आपण अैकतो, त्याच त्या पद्धतीने अुपवास करतो आणि त्याच रीतीने कृष्णजन्माचा अुत्सव करतो; तरी हजारो वर्षें झालीं गोकुळ अष्टमी दरवर्षी त्या जगद्गुरूचा नवाच संदेश आपल्याला देत आली आहे. कृष्णपक्षांतील अष्टमीच्या वक्र चंद्राप्रमाणें अेका पायावर भार देअून अेक पाय वांकडा ठेवून शरीराला कमनीय असा वांक देअून बंकिमचंद्र * मुरलीधराने ज्या दिवशी दुनियेत प्रथम प्राण फुंकला त्या दिवसापासून आजतागायत प्रत्येक निराश्रित मनुष्याला आश्वासन मिळालें आहे कीं 'नहि कल्याणकृत कश्चिद् दुर्गतिं तात गच्छति ।' – जो मनुष्य सन्मार्गाकडे वळला आहे, जो धर्माला चिकटून राहिला आहे त्याला, बाबा, कधींहि दुर्गति नाहीं.

× × ×

लोकांना वाटतें कीं धर्म हा दुबळ्याच्यासाठीं आहे. फार फार तर व्यक्तीव्यक्तीमधील संबंधांत तो उपयुक्त असेल. पण राजे आणि सम्राट हे म्हणतील तोच धर्म. साम्राज्यशक्ति धर्माहून पर आहे. व्यक्तीचा पुण्यक्षय होत असेल, पण साम्राज्य ही मात्र अलौकिक वस्तु आहे. अीश्वराच्या विभूतीपेक्षां साम्राज्याची विभूति श्रेष्ठतर. साम्राज्य जेव्हां हातीं विजयपताका घेअून फिरूं लागतें तेव्हां अीश्वर दिवसाच्या अुजेडांतील चंद्राप्रमाणें कुठेंतरी दडी मारून बसतो.

मथुरेंत कंसाची भावना अशीच होती; मगधदेशांत जरासंधाला असेंच वाटे; चेदिदेशांत शिशुपालाची हीच मनोदशा होती; जलाशयांत राहाणारा कालिनाग असेंच मानीत असे; द्वारकेवर हल्ला करणाऱ्या कालयवनाची विचारसरणी हीच होती; मह्!

---

* बंकिमचंद्र = वक्रचंद्र ( the crescent Moon )

पापी नरकासुराला अशीच शिकवण मिळाली होती; आणि दिल्लीलासम्राट कौरवेश्वर-सुद्धां याच वृत्तींत वाढला होता. हे सर्व महापराक्रमी राजे अंध किंवा अज्ञानी नव्हते. त्यांच्या दरबारांत अितिहासवेत्ते, अर्थशास्त्रविशारद आणि राजकार्यधुरंधर असे अनेक विद्वान होते. ते आपली शास्त्रें पिळून त्यांचें सार काढून आपापल्या सम्राटांना अैकवीत असत; पण जरासंध म्हणे, 'तुमचे अितिहासाचे सिद्धांत ठेवा बाजूला; माझा पुरुषार्थ माझ्या बुद्धिबळानें आणि बाहुबळानें हे तुमचे सिद्धांत खोटे पाडण्यांत आहे.' काळयवन सांगे, 'मी एकच अर्थशास्त्र जाणतो: दुसऱ्या देशांना पिळून त्यांचें धन हरण करणें; धनवान होण्याचा हाच एकमात्र सरळ, सोपा आणि म्हणून सशास्त्र मार्ग आहे.' शिशुपाळ म्हणे, 'न्याय अन्याय हे सामान्य लोकांच्या आपसांतील भांडणतंटच्यांत चालतील. आम्ही आहोंत सम्राट. आमची जातच वेगळी. अिज्जत आणि अिस्रत हाच आमचा धर्म.' कौरवेश्वर म्हणे, 'जितकीं म्हणून रत्नें आहेत तीं सर्व आमचा वारसा; आमच्या कडेच तीं आलीं पाहिजेत. यतो रत्नभुजो वयम्। (कारण आम्ही रत्नभोगी आहोंत—रत्नांचा उपभोग घेण्यासाठींच आम्ही जन्माला आलों आहोंत.) जगांत जेवढे म्हणून तलाव आहेत ते सर्व आमच्याच विहारा-साठीं आहेत. लढाओ केल्यावांचून कुणालाहि सुओच्या अग्राअेवढीसुद्धा जमीन आम्ही देणार नाहीं.'

पक्षपातशून्य नारदांनीं कंसाला सावध केलें होतें कीं बाबा परक्या शत्रूला तूं पुष्कळ जिंकलें असशील, पण तुझ्या साम्राज्यांत—नव्हे, तुझ्या घरांतच—तुझा शत्रु अुत्पन्न होओील. ज्या सावळ्या वहिणीला तूं आश्रित दासीच्या स्थितीला नेअून ठेवलें आहस तिच्याच पुत्राच्या हातानें तुझा नाश होओील; कारण तो धर्मात्मा असेल. त्याचा तेजोवध करण्याचे जितके प्रयत्न तूं करशील ते सारे त्यालाच अनुकूल होतील. कंसानें मनांत विचार केला, 'Forewarned is forearmed.' अेवढी सूचना वेळेवर मिळाली आणि 'पाण्याअगोदर पाळ' आपण न बांधली तर आपण अितिहासज्ञ कसले? आपण सम्राट कसले? नारदांनीं सांगितलें 'ही तुझी विनाशकाळची विपरीत बुद्धि आहे. मी सांगत आहे हा अितिहासाचा सिद्धांत नाहीं, ही धर्माची अनुभव—वाणी आहे; हें सनातन सत्य आहे. वसुदेव—देवकींच्या आठ अपत्यांपैकीं अेकाच्या हातून तुझें मरण घडून येणारच. तुला आतां एकच अुपाय आहे. अजून पश्चात्ताप कर आणि श्रीहरीला शरण जा.' मानी कंसानें

तिरस्कारपूर्वक हंसून अुत्तर दिलें, ' सम्राट हे साम्राज्यभूमीवर पराजय घेतल्यावांचून पश्चात्ताप करीत नसतात. ' ' तथास्तु ' म्हणून निराश झालेले नारद चालते झाले. कंसानें विचार केला, आजपर्यंतचे सम्राट यशस्वी झाले नाहींत याचें कारण त्यांचा बेसावधपणा; त्यांना पुरतें सावध रहायचें समजलें नाहीं. मी सुद्धां जर गाफिल राहिलों तर मलाहि पराजय घ्यावा लागेल.पण त्याचें नाहीं कांहीं अेवढें. जो वीर आहे. त्यानें सदोदित जयाची धडपड करावी नि पराजयासाठीं तयार राहावें. हरलों तर त्यांत वाअीट कांहीं नाहीं; पण धर्माच्या नांवानें सुरवातीलाच थांकायचें यांत नामुष्की आहे. धर्माचें साम्राज्य साधुसंत-वैरागी आणि देव—ब्राह्मण यांना लखलाभ असो; मी आहे सम्राट. मी अेक शक्तीलाच ( सत्तेलाच ) ओळखतों.

क्रूर होअून कंसानें वसुदेवाच्या सात निरपराध अर्भकांचा खून केला आहे. कृष्ण जन्माच्या वेळीं अीश्वरी लीला झाली. आणि कृष्णपरमात्म्या-अैवजीं कन्यादेहधारी शक्ति कंसाच्या हातीं आली. कंसानें तिला जमिनीवर आपटली, पण शक्तीनें कांहीं शक्ति मरायची आहे थोडीच ? वसुदेवानें गुप्त रूपानें कृष्णाला गोकुळांत आणून ठेवलें. पण परमात्म्याला कोणतीच गोष्ट लपवून ठेवावयाची नव्हती. परमात्म्याला कुठें उघडपणाची भीति ( Sin of secrecy ) होती ? शरमिंद्या झालेल्या कंसाला शक्तीनें अट्टाहास करून सांगितलें, " तुझा शत्रु तर गोकुळांत ' दिन दूना रात चौगुना ' असा वाढत आहे. " मथुरे-हून गोकुळवृंदावन फारसें दूर नाहीं, चारपांच कोस सुद्धां नसेल. कंसानें कृष्णाला मारण्याचें जेवढे म्हणून सुचले तेवढे प्रयत्न केले. पण श्रीकृष्णाचें मरण कशांत आहे हें त्याला समजलें नाहीं. श्रीकृष्ण कांहीं अमर नव्हते. तसे मरणांधीनहि नव्हते. धर्मकार्य करण्यासाठी ते आले होतें, धर्माचें राज्य स्थापन झालें नाहीं तोंवर ते विराम कसें पावतील ? कंसाला वाटलें कृष्णाला आपल्या दरबारांत बोलावून त्याला मारूं, पण तेथेंच त्याची बाजी बिघडली, कारण प्रजेनें परमात्मतत्त्व ओळखलें आणि ती परमात्म्याला अनुकूल झाली.

कंसाचा नाश झालेला पाहून जरासंधानें सावध व्हायला पाहिजे होतें. पण जरासंधाला वाटलें कीं, नाहीं, कंसापेक्षां मी अधिक सावध आहे, मी अनेक भिन्न भिन्न अवयव सांधून माझें साम्राज्यशरीर प्रबळ केलें आहे. मल्लयुद्धांत माझ्या

बरोबरीचा कोण आहे ? माझ्या नगरीचा कोट दुर्भेद्य आहे, मला भीति कसली ? पण जरासंधाच्याहि बाभळीच्या दांतणासारख्या दोन चिरफळ्या झाल्या. कालिनाग आपल्या जलस्थानाला नमुनेदार सुरक्षित स्थान समजत होता. त्यांचें विष असह्य होतें नुसत्या फुत्काराने तो मोठमोठ्या फौजांना चीत करी; त्याच्या विषाचेंही कांहीं चाललें नाहीं. कालयवन चढाअी करून आला, पण निजलेल्या मुचकुन्दाच्या क्रोधाग्नीनें मधल्यामध्येंच जळून मेला. नरकासुर एका स्त्रीच्या हातानें पराभूत झाला आणि मेला. कौरवेश्वर दुर्योधन द्रौपदीच्या क्रोधवह्नीत भस्म झाला; आणि शिशुपालाला त्याने केलेल्या भगवन्निंदेनेंच मारून टाकलें.

षड्रिपूंसारखे हे सहा सम्राट त्यावेळीं मेले. सप्तलोक आणि सप्तपाताळ सुखी झाले आणि जन्माष्टमी सफल झाली. तरी अितक्या काळानंतरसुद्धां दरवर्षी आपण हा अुत्सव कशासाठीं करीत असतो ? अेवढ्याचसाठीं कीं अजून आपल्या हृदयांतून त्याचप्रमाणें सामाजिक जीवनांतून षड्रिपूंचा नाश झालेला नाहीं; आपल्याला ते अत्यंत पीडा देत आहेत; आपण निराश झाल्यासारखे होतों, अशा प्रसंगीं आपल्या हृदयांत कृष्णाचा जन्म झाला पाहिजे. ' जेथें पाप आहे तेथें पापपुंजहारीहि असतो ' या आश्वासनाचा आपल्या हृदयांत अुदय झाला पाहिजे. मध्यरात्रीच्या अंधःकारांत कृष्णचंद्राचा अुदय झाला तरच निराश झालेलें जग आश्वासित होअील आणि धर्मामध्यें दृढ राहूं शकेल.

४–९–२१.

# ३ लोकनायक श्रीकृष्ण

ज्याला कोणाचा आश्रय नाहीं त्याला म्हणे महादेवाकडून आश्रय मिळतो. आंधळे, पांगळे, अपंग, वेडे यांनाच नव्हे तर भूतप्रेत, विषधर सर्प अित्यादींनासुद्धां महादेवाजवळ आश्रय मिळतो. विष्णूची कीर्ति जरी अशी गायिलेली नसली तरी तो सुद्धां दीनानाथ आहे. कृष्णावतार तर दीनदुबळे आणि दुःखी यांच्यासाठींच होता. श्रीकृष्ण हा प्रजाकीय अवतार आहे दाशरथी रामाला आपण ' राजा रामचंद्र ' म्हणतों. श्रीकृष्णाला ' राजा श्रीकृष्ण ' म्हटलें तर कानाला कसें चमत्कारिक वाटतें ! श्रीकृष्ण जरी मोठमोठ्या सम्राटांचेहि अधिपति होते तरी ते बहुजनसमाजाचेच होते.

लहानपणीं त्यांनी गवळ्याचा धंदा केला, मोठे झाले तेव्हां सओस (सारथी) बनले. राजसूय यज्ञासारख्या राजकीय उत्सवांत उष्ट्या पत्रावळी उचलण्याचें काम त्यांनी स्वतःसाठीं पत्करलें. आज कोणता लोकनायक अितकें निष्पाप जीवन दाखवूं शकेल? श्रीकृष्णांनीं अिंद्राचा गर्वज्वर अुतरविला, ब्रह्मदेवाचा ज्ञानगर्व शमविला. धर्मशास्त्रांच्या कोंडत्या हवेंत वाढलेल्या अृषींना आपलें रहस्य समजावून दिलें, नारदाचा मोह घालविला, तरी स्वतः शेवटपर्यंत गोपबंधूच राहिले. गोपीजनवल्लभ हेंच नांव त्यांना पसंत पडलें. वनमाला हीच आभूषण म्हणून त्यांना आवडली; सुदाम्याचें पोहे, विदुराघरच्या कण्या आणि द्रौपदीच्या थाळीतील भाजीचें पान खाअूनच त्यांचें हृदय संतोषलें. कुब्जेची सेवा स्वीकारण्यांतच त्यांनी कृतार्थता मानली. गरीबांचे साहाय्यक, 'दीनन दुखहरन देव संतन हितकारी' च ना ते!

श्रीकृष्णांनीं गीता अुपदेशिली. कशासाठीं? युधिष्ठिराला साम्राज्यपद देवविण्यासाठीं? छेः छेः, 'स्त्रियोवैश्यास्तथा शूद्राः' सुद्धां परमगति मिळवूं शकतात हें आश्वासन देण्यासाठीं; 'अनन्य भक्तांचा योगक्षेम मी स्वतः चालवितो' अशी खात्री देण्यासाठीं; दुराचारीसुद्धां जर पश्चात्ताप करील आणि अीश्वरभजन करील तर तो मुक्त होऊन जाअील असें वचन देण्यासाठीं; भक्त आपलें हृदय शुद्ध करील तर त्याला सर्व प्रकारचें पांडित्य-बुद्धियोग पुरविण्याची हमी देण्यासाठीं.

आणि या गीतेंत भगवंतांनीं तत्त्वज्ञान तरी कसलें अुपदेशिलें आहे? भगवान म्हणतात, 'तुम्ही ज्ञानी खुशाल व्हा, पण तुम्हांला लोकसंग्रह सोडतां येणार नाहीं. खरे ज्ञानी असतात ते तर सर्वभूतहितेरताः असतात.'

श्रीकृष्णानीं अवतार घेअून केलें काय? कृत्रिम प्रतिष्ठा मोडली, अभिमानी प्रतिष्ठित लोकांना अपमानित केलें आणि निष्पाप हृदयाच्या दीनजनांना श्रेष्ठ करून दाखविलें. धर्माला पांडित्याच्या जाळ्यांतून वांचवून भक्तीच्या शुभ्र आसनावर बसविलें, राजा अिंद्राचा गर्व हरण करून, त्याचा करभार बंद करून प्रजेंत गोवर्धनरूपी देशपूजा सुरू केली. राजेलोकांना नम्र केलें आणि लोकांना अुन्नत केलें.. आणि अितकें करूनहि स्वतः लोकांचे पुढारीसुद्धां बनले नाहीत.

अेकदांच–फक्त अेकदांच–लोकांची श्रीकृष्णावरील श्रद्धा ढळली होती. देशांत श्रीकृष्ण आहे म्हणून जरासंध पुनः पुनः आपणांवर चढाअी करून येतो अशी लोकांची समजूत झाली. श्रीकृष्णांनीं लोकमताला मान देअून मध्यदेशाचा त्याग

करून समुद्रवलयांकित द्वारकेंत जाऊन वास्तव्य केलें. यांत लोकांवर राग नव्हता, त्यावेळीं आयोनियन लोक हिंदुस्थानावर हल्ला करण्याच्या तयारींत होते. त्यांना विरोध करण्यासाठीं, त्यांचा हल्ला थांबविण्यासाठीं पश्चिम किनाऱ्यावर अेक जबरदस्त लष्करी ठाणें बसविल्यानेंच लोकांचें रक्षण होण्याजोगें होतें. श्रीकृष्णांनी द्वारावतीला जाऊन हिंदुस्थानच्या या दाराचें रक्षण केलें आणि आर्यावर्ताला सुरक्षितपणा आणला. अशा दीननाथाच्या शतकानुशतकें साजरा केल्या जाणाऱ्या जन्मदिवसाला लोकसत्तेच्या या दिवसांत दुप्पट महत्त्व आहे.

४-९-२१

## ४ दिव्य जन्मकर्म

आपण सुखांत असूं किंवा दुःखांत असूं, जागृत असूं किंवा निजलेले असूं, स्वतंत्र असूं किंवा परतंत्र असूं, जुलमी असूं किंवा गुलाम असूं, अेक असूं किंवा फुटलेले असूं, जन्माष्टमी ही दरवर्षीं येतच राहाणार. सूर्य अुगवतो आणि मावळतो, चंद्राची वृद्धि होते आणि क्षय होतो, नदीचें पाणी वाहात असतें, ऋतुचक्र चालूंच असतें, ग्रहणें लागतात आणि सुटतात, कालप्रवाह वाहात जात असतो, तशी जन्माष्टमी नामस्मरण करवीत येते आणि नामस्मरण करवीत जाते. आपण स्वतंत्र होतों तेव्हांहि जन्माष्टमी येअी; आपलें पतन होअूं लागलें तेव्हांहि जन्माष्टमी येअी; आपण फिरून अुठण्याचा प्रयत्न करीत आहों तेव्हांहि जन्माष्टमी आली आहेच. तुम्ही तिचा अुपदेश अैका किंवा अैकूं नका, ती यायची आणि जायची. ज्याचें ध्यान जागृत असेल तो तिचा अुपदेश अैकेल आणि धन्य होअील.

जन्माष्टमी पुरातन आहे, सनातन आहे, कारण कीं ती संपूर्ण आहे. जन्माष्टमी हा कृष्णावताराचा सण आहे. कृष्णचरित्र अद्भुत, विविध आणि संपूर्ण आहे— क्षीरसागरासारखें आहे. ज्याच्यापाशीं जितकी शक्ति असेल तितकें त्यांतून त्याला घेतां येअील. तरी श्रीकृष्णाच्या चरित्राचा पार मी गांठला आहे असें कोणी म्हणूं शकणार नाहीं.

× × × ×

श्रीकृष्णांचा जन्म कारागृहांत झाला. मातापित्यांच्या वियोगांत त्यांना बालपण घालवावें लागलें. गोपींच्याशीं विविध लीला खेळण्यांत ते मग्न असत, असें चित्र

पुराणकारांनीं आपल्याला दिलें आहे. पण आपले आओीबाप परराज्यांत बंदीवान आहेत, ही गोष्ट श्रीकृष्ण विसरले नव्हते, श्रीकृष्णांनीं आपलें सारें बाळपण गोपींच्यांत बसून मुरली वाजविण्यांत घालावलें नव्हतें. मेहनत करून ते मल्लविद्येंत प्रवीण झाले होते. दुष्टांचें दमन करण्याचा वस्तुपाठ त्यांनीं लहानपणापासूनच घेतला होता. मथुरेच्या राजकारणांशीं ते परिचित राहात. अनुकूल वेळ येतांच त्यांनीं कंसाचा कांटा काढला, मातापित्यांना सोडविलें आणि मगच गुरूपाशीं विद्या शिकायला गेले.

ज्यायोगें मातेची मुक्ति होओील, पित्याची मुक्ति होओील ती विद्या प्रथम त्यांनीं घेतली. त्या नंतर आत्म्याची भूक शमविण्यासाठीं, ज्ञानाची तहान भागविण्या-साठीं आणि विद्यानंद लुटण्यासाठीं ते सांदीपनीच्या विद्यापीठांत गेले. प्रथम माता-पित्यांची मुक्ति, मग विद्या--हा श्रीकृष्णाचा जीवनमंत्र होता. मातापित्यांच्या मुक्ती-मार्गे-स्वदेशाच्या मुक्तीमार्गे-तारुण्यांतील दिवस घालवावें लागले याचा श्रीकृष्णांना कधींही पश्चात्ताप झाला नाहीं! कर्तव्यपालनाच्या अुत्साहानें श्रीकृष्णांची बुद्धि अितकी तीव्र झाली होती कीं गुरुजवळ विद्या शिकतांना काळ किंवा श्रम त्यांना लागलेच नाहींत. मातापित्यांना सोडविलें, विद्या पुरी केली, गुरूंना दक्षिणा देअून टाकली, आणि मग श्रीकृष्णांनी विवाह केला आणि विवाहानंतर सारें आयुष्य निरासक्तवृत्तीनें परोपकार करण्यांत घालविलें. जेव्हां अितर सर्वजण आपल्या राज्याचा आणि आपापल्या अुत्कर्षाचा विचार करीत त्या वेळीं श्रीकृष्ण सगळ्य भारतवर्षाच्या राजकारणाचा आणि धर्मसंस्थापनेचा विचार करीत. लोकसंग्रह म्हणजे लोकसंख्येचा संग्रह असें श्रीकृष्ण मानीत नव्हते, आणि म्हणूनच त्यांनी भयंकर मनुष्यसंहार पहात असतांनासुद्धां धर्मालाच चिकटून राहाण्याची हिंमत दाखविली आणि स्वतः अप्रतिम मल्ल असूनहि आणि देशामध्यें अेवढें प्रचंड राष्ट्रक्षयकारी युद्ध माजलें असतांनासुद्धां ते निःशस्त्र आणि अयुद्ध्यमान राहू शकले. दुर्योधन आणि अर्जुन दोघे श्रीकृष्णांची मदत मागायला आले त्या वेळीं त्यांनीं दोन्ही राजपुत्रां-पुढें ठेवलेली निवड अर्थपूर्ण आहे--निःशस्त्र कृष्णाला पसंत करा, किंवा यादवसेना पसंत करा. दोघांनीं आपल्याला पाहिजे ती निवड केली आणि तिचा परिणाम काय झाला तें आपण पाहातोंच.

× × × ×

भारतीय युद्ध महान होतें, पण कृष्णचरित्र त्याहूनाहि महत्तर आहे. महाभारतांत गौरीशंकर आणि धवलगिरीसारखीं दोन प्रचंड शिखरें झळकत आहेत. या दोहोंच्या तुलनेशीं अितर सारीं अुत्तुंग शिखरेंसुद्धां टेकड्यासारखीं दिसतात. हीं दोन शिखरें म्हणजे भीष्म आणि कृष्ण. त्या महान् युद्धांत 'कर्तुमकर्तुमन्यथाकर्तुम्' शक्ति या दोघांचीच. दोघेंहि सारखेच अनासक्त, सारखेच धर्मनिष्ठ, सारखेच परोप-कारी आणि सारखेच योगी. तरी या दोघांत केवढें अंतर! दोघांचें समाजशास्त्र वेगळें, राजकीय तत्वज्ञान वेगळें आणि दोघांचें जीवितकर्तव्य वेगळें. चालू असलेली राजसत्ता टिकवावी, तिच्या द्वाराच होअील तितकें लोककल्याण साधावें, आणि वर्तमानकाळाला प्रामाणिक राहावें हा भीष्माचा विचार. तर श्रीकृष्ण अन्यायाचे शत्रु, पापपुंजांचे आग्न, रूढीचे विध्वंसक. त्यांची दृष्टि भविष्याकडे. राजकीय प्रश्नांत भीष्माचार्य हे सनदशीर धोरणाला चिकटून राहाणारे, तर श्रीकृष्ण जुन्या सडून गेलेल्या अेकूणअेक सनदशीर धोरणाच्या मुडद्याला मूठमाती द्यायला निघालेले. त्यामुळें भीष्मांनीं सत्तेचा पक्ष घेतला आणि श्रीकृष्णांनीं सत्याचा घेतला.

समाजशास्त्रांतसुद्धा दोघांमध्यें हाच भेद होता. भीष्माचार्य म्हणत, राजा कालस्य कारणम्--राजा घडवील तसा काळ. श्रीकृष्ण म्हणत, राजा कसला काळ घडवितो? काळ तर मी स्वतःच आहे आणि अेकूणअेक जुन्या रूढींचा नाश करण्यासाठीं मी अवतरलों आहे. कालोऽस्मि लोकक्षयकृत्प्रवृद्धः। भीष्माचार्यांची मान धर्मशास्त्रापुढें नेहमी वांकलेली असायची आणि धर्मशास्त्रांच्या आज्ञा संभाळ-ण्यांत ते कृतकृत्यता मानायचे; याच्या अुलट श्रीकृष्ण हे धर्माच्या आज्ञेमागें असलेले धार्मिक रहस्य समजून घेअून त्यालाच चिकटून राहायचे.

× × × ×

तरीहि काय आश्चर्य! भीष्माचार्यांनीं प्रतिज्ञापालन करून भारतवर्षांत राज्यक्रांति होअूं दिली आणि ज्या समाजव्यवस्थेला ते चिकटून पहात होते तिचाच त्यांनीं भारतयुद्धद्वारां अुच्छेद केला. श्रीकृष्णांनीं प्रतिज्ञाभंग करून आपल्या भक्ताचे प्राण वांचविले आणि भीष्माला यश दिलें.

× × × ×

शरीर ज्याप्रमाणें अनेक नवीं नवीं वस्त्रें धारण करतें, आत्मा जसा नवा नवा देह धारण करतो तसें धर्माच्या सनातन आत्म्यालाहि नवे नवे विधी शोधून

काढल्यावांचून गत्यंतर नसतें. अिंद्राच्या पूजेंत जेव्हां कांहीं अर्थ अुरत नाहीं तेव्हां गोवर्धनाची पूजाच चालविली पाहिजे आणि यज्ञयागाची धामधूम करण्यापेक्षां श्रीकृष्णाला शरण जाणें हेंच अधिक श्रेयस्कर आहे हें जन्माष्टमी आपल्याला शिकविते.

श्रीकृष्णाचें चरित्र आपण अजून लक्षपूर्वक पाहिलेलें नाहीं. श्रीकृष्णाची बालपणाची लीला आणि मोठेपणांतील जगदुद्धाराचें अवतारकृत्य अितकें कांहीं मोहक आणि अुदात्त आहे आणि श्रीकृष्णाला अवतार समजून आपण अितकें कांहीं आश्चर्यमूढ झालों आहोंत कीं या पुरुषोत्तमानें आदर्श मनुष्य म्हणून कशा प्रकारें आपलें आयुष्य घालविलें तिकडे आपलें लक्ष जात नाहीं. आजपर्यंत आपण जितक्या नररत्नांचीं चरित्रें वाचलीं आहेत अथवा पाहिलीं आहेत त्या सर्वांहून श्रीकृष्णाचें चरित्र वेगळें पडतें. लहानपणीं शिंक्यावरच्या लोण्याचा नैवेद्य आत्मदेवाला समर्पण केल्यानंतर यशोदामाता पकडील या भीतीनें घाबरलेल्या श्रीकृष्णाची नाटकी लीला सोडून दिली तर श्रीकृष्णाच्या सबंध जीवनांत दुःखाचा किंवा भयाचा कुठें लवलेशहि आढळत नाहीं. अितक्या विविध घटनांनीं परिपूर्ण जीवन असूनसुद्धां श्रीकृष्ण कधीं दिङ्मूढ झाले नाहींत, दुःखानें दडपून गेले नाहींत किंवा अुदासीनतेनें नेभळे बनले नाहींत. ज्याला आसक्तीच मुळीं नाहीं तो अुदासीन कशाला राहील? जो ब्रह्मानंद जाणतो तो कशाला भिणार? सर्व भूतांमध्यें जो स्वतःस पाहातो त्याच्या मनांत राग, द्वेष किंवा जुगुप्सा कोठून असणार? हेंच श्रीकृष्णाचें पूर्णत्व आहे. श्रीकृष्णाला अेका ब्राह्मणानें लाथ मारली ती त्यांनीं अलंकाराप्रमाणें धारण केली. गांधारीनें घोर शाप दिला त्याचा श्रीकृष्णानें आपल्या अवतारकृत्याचा सहाय्यक म्हणून आदर केला. अभिमन्यु मारला गेला, घटोत्कच मारला गेला, द्रौपदीच्या पुत्रांचा वध झाला, अठरा अक्षौहिणीं सेनेचा नाश झाला, महान महान आचार्य पडले, यादवकुळाचा संहार झाला, पण श्रीकृष्ण जसेच्या तसेच अक्षुब्ध, अविचलित, गंभीर जणूं काय प्रलयकाळानंतरचा महासागरच

× × × ×

भारतीय युद्धांत संग्रामभूमीवर घायाळ झालेले हजारो मुमूर्षू योद्धे रक्तामांसाच्या चिखलांत लोळत पडले आहेत आणि त्यांच्यामध्यें श्रीकृष्णांची कारुण्यमूर्ति प्रत्येकाच्या माथ्यावर आपला शीतल वरदहस्त फिरवीत हिंडत आहे असें चित्र

अेखादा समर्थ चित्रकार काढून देअील? शेकटच्या घटकेला श्रीकृष्णाचें दर्शन! हें महाभाग्य ज्या काळाला मिळालें तो काळ धन्य होय! त्या वेळच्या कवींनीं 'मरणोन्मुख वीरांचा विसांवा हा श्रीहरी आहे' अशीं भावपूर्ण गीतें गायिलीं असतील!

× × × ×

जबरदस्त संकट पाहिलें कीं आघाडीला राहावें किंवा अेकट्यानेंच सारें संकट आपल्या डोक्यावर घ्यावे आणि जेव्हां राज्यवैभव किंवा कीर्ति मिळण्याचा प्रसंग येअील तेव्हां लाजाळू वधूप्रमाणें मागें मागें राहावें, हा श्रीकृष्णाचा स्वभाव कितीं वरें अुदात्तमधुर आहे. गोकुळांत जेवढे म्हणून राक्षस आले तेवढे श्रीकृष्णानें स्वतः मारले. यमुनेंत कालिया नाग येअून राहिला आणि त्यानें सार्‍या वृंदावनाला पाडा द्यायला सुरुवात केली तेव्हां आपलें काय होअील याचा विचार न करतां श्रीकृष्णानें कदंबाच्या झाडावरून संकटाच्या खाअींत अुडी घेतली. सारे गोपाल बालक भयभीत झाले. कित्येकजण घराकडे पळाले, कित्येकजण तिथच्या तिथेंच मूढ होअून खांबासारखे थिजून गेले. कोणाला कांहीं सुचेना. एकट्या श्रीकृष्णांनीं कालियाबरोबर युद्ध करून त्याला हरविलें, नमविलें आणि जीविनदान देअून सोडून दिलें. कंसवधांतहि ते स्वतःच आघाडीला आणि जरासंधवधांतसुद्धां तेच अग्रेसर. जेथें जेथें म्हणून संकट असेल तेथें तेथें ते स्वतः हजर आणि पुढारी.

× × × ×

अिंद्रानें प्रलयकाळाचा वर्षाव सुरू केला तेव्हांसुद्धां श्रीकृष्णानें गोवर्धन अुचलून प्रजेचें रक्षण केलें; पण त्याबरोबर लोकांना हाहि बोध दिला कीं गोवर्धन अुचलण्यांत जेव्हां प्रत्येक मनुष्य मदत देअील तेव्हांच प्रभु श्रीकृष्ण स्वतःचें बोट अुचलेल. शक्ति परमात्म्याची पण प्रयत्न तुमचा.

× × × ×

जन्माष्टमीदिवशीं श्रीकृष्णाजवळ आपण काय मागावें? प्रत्येकानें आपापल्या वृत्तीप्रमाणें मागून घ्यावें. पांडवगीतेंत भारतकालीन प्रमुख व्यक्तींनी श्रीकृष्णाजवळ काय काय मागितलें होतें तें श्लोकबद्ध केलें आहे. कृपण कृपणाप्रमाणें मागून घेअील, भक्त भक्तहृदयानें मागून घेअील, अभिमानी अभिमानाला शोभेल अशीं वचनें काढील,

आपलें पापसुद्धां परमात्म्यावर ढकलून देअील. पण मागायचें असेल तर वीरमाता, धर्ममाता, तपस्विनी कुंतीनें जें मागणें मागितलें तेंच मागितलें पाहिजे. भागवतांत कुंतीची प्रार्थना किती सुंदर शब्दांत दिलेली आहे! कुंतीमाता म्हणते, ' हे भगवन्, ज्यामुळें तुझें विस्मरण होअील असें वैभव मला नको. ज्यायोगें सदोदित तुझें चिंतन होअील, शरणांगतता वाढेल अशी आपत्ति तूं आम्हांला दे. भगवन्! आम्हांला आपत्ति दे–' आपदः सन्तु नः शश्वत्।' कारण,

विपदो नैव विपदः संपदो नैव संपदः।
विपद्विस्मरणं विष्णोः संपन्नारायणस्मृतिः।

परमात्म्याला विसरणें हेंच मोठें संकट आणि नारायणाचें अखंड स्मरण हीच संपत्ति, हेंच वैभव, हेंच श्रेयप्रेय, हेंच स्वराज्य, स्वाराज्य आणि साम्राज्य.
१३-८-२२

## ५ प्रतीक्षा

जन्माष्टमीसारखे अुत्सव वर्षानुवर्षें आपण कां म्हणून साजरे करीत असतों बरे? ज्या दिवशीं आपल्या हृदयांत श्रीकृष्णाचा अुदय होअील त्याच दिवशीं आपली खरी जन्माष्टमी होअील. तोंपर्यंतच्या अशा जन्माष्टम्या फुकटच आहेत. आपल्या हृदयांत कृष्णजन्म केव्हां होणार कुणाला माहीत! म्हणूनच शबरीप्रमाणें आपण अखंड त्याच्या प्रतीक्षेत, त्याच्यासाठीं आतुर राहिलें पाहिजे. अशा आतुरतेशिवाय हृदयांत कृष्णजन्म कधींहि होणार नाहीं हेंहि तितकेंच खरें.

चोर येतील म्हणून आपण पहारा करतों तोसुद्धां रातरभर करावा लागतो. चोर काय सांगून येतात थोडेच? ते केव्हांहि येतील. सरहद्दीवर शत्रूचा हल्ला येअील म्हणून अखंड चौकी पहारा ठेवावा लागतो. वर्षानुवर्षें हा पहारा कायम ठेवावा लागला म्हणून काय झालें? सरहद्दीवर बेसावधपणें राहून मुळींच भागणार नाहीं. समुद्रांतील तुफानांत जहाज फुटलें म्हणजे जीव बचावण्यासाठीं म्हणून बुचाच्या बंड्या ( कॉर्क जॅकेट ) घालून लोक समुद्रांत पडतात. अैन संकटाच्यावेळीं घाबरलेल्या आणि क्षुब्ध मनःस्थितींत कांहीं सुचणार नाहीं या भीतीनें खलाशांच्याकडून वेळोवेळीं त्याची कवाअीत करून घेण्यांत येते, नाहींतर आणीबाणीच्या प्रसंगीं चूक व्हायची. श्री. मेघाणी या प्रख्यात गुर्जर लोककथालेखकानें अेका लुटारूची गोष्ट दिली

आहे. घरांत पाहुणे केव्हां येतील कुणास ठाअूक, आतिथ्य करण्यांत चूक झाली तर स्वत्व गेलें, अशा समजुतीनें वाटेल तेथून धन पैदा करून तो अखंड स्वैपाक तयार ठेवीत असे. ती गोपीचंदाची आअी मैनावतीसुद्धां गोसावीमहाराज केव्हां येतील हें सांगतां येणार नाहीं अेवढ्यासाठीं अुन्ह अुन्ह जेवण हातांत घेअून सकाळपासून संध्याकाळपर्यंत अुभीच राहात असे. बेसावधपणा झाला आणि तेवढ्यांत स्वामी-महाराज आले तर? अृषींनीं शबरीला सांगून ठेवलें होतें कीं श्रीरामचंद्र येअून तुला दर्शन देतील आणि तुझा अुद्धार करतील. लहानपणापासून थेट म्हातारपणा-पर्यंत सारा जन्म तिनें रामाच्या प्रतीक्षेंत घालविला. अृषींचे शब्द फुकट जायचे नाहींत असा तिला विश्वास होता. रामदर्शनाच्या आशेनें, शरीर थकलें होतें तरी, ती टिकली. शेवटीं तिनें रामाचें दर्शन घेतलें, रामाचें स्वागत केलें; मग जगण्यांत कांहीं तिला अर्थ वाटला नाहीं. अेक सबंध आयुष्य तिनें आतुरतेंत घालविलें.

दर्शनाच्या आनंदापेक्षां ही आतुरतेची कृतार्थता कांहीं विशेष आहे. प्राप्ती-पेक्षां प्रतीक्षेंत जीवनाची गोडी अधिक आहे. श्रद्धा, आकांक्षा, तपस्या, आशा, निराशा—हेंच जीवनाचें दुर्लभ भांडवल आहे.

हें दुर्लभ भांडवल मिळविण्यासाठीं अशा अुत्सवांचा अपयोग आहे.

जगामध्यें राक्षसांचें पेव फुटलें आहे. गरीबांचा कोणी वाली राहिला नाहीं. राक्षस अनेक रूपें धारण करून प्रजेला पीडतात, दांभिकपणें फसवितात, पापमार्गा-कडे लोकांना लालचावतात आणि खड्ड्यांत पाडतात. माणसाची शक्ति, माणसाची बुद्धि सर्व खचून गेली आहे. लोक निराश आणि नास्तिक होअूं लागले आहेत. अशा वेळीं मंगल हृदयानें 'आतां तारणारा तूंच!' म्हणून त्या करुणामयाची प्रार्थना केली, अंतर्यामी जागा झाला, आणि युगावतार प्रगट झाला. श्रद्धापूर्वक हें सर्व मनांत आणून अेकाग्र होण्याचा आपण प्रयत्न करतो, याचेंच नांव जयंती-अुत्सव. धरणीला तहान लागली म्हणजे आकाशांतील मेघांना जसा पान्हा फुटतो तसा अशा व्याकुळते-बरोबर आणि आतुरतेबरोबर अवतारी पुरुष प्रगट व्हायचाच. त्याला हृदयांत स्थान देण्यासाठीं हृदयाचा परिष्कार करावा, हृदय घांसून पुसून स्वच्छ करावें, तेथें आसन पसरून ठेवावें आणि त्याची वाट पहात राहावी, अेवढ्यासाठीं हे अुत्सव आहेत. पाणी आणि बर्फ हीं जशीं भिन्न नाहींत, पाणी आणि वाफ यांच्यांत जसा

तात्त्विक भेद नाहीं तसाच ही प्रतीक्षा आणि ही प्राप्ति यांच्यांत भेद नाहीं–असलाच तर केवळ अंशमात्र. दिवसेदिवस हा अंश वाढावा आणि वाढत राहावा अेवढ्यासाठीं असे अुत्सव ठेवलेले असतात.

# गोकुळाष्टमी

**श्रावण वद्य ८** **१ दिवस.**

गोकुळाष्टमी म्हणजे गीतागायक, गोपाल कृष्णाची जयंती. या दिवशीं गोसवेचा विचार प्रथम झाला पाहिजे. गोशाळेंसंबंधीं कांहींना कांहीं सेवा या दिवशीं शोधून काढली पाहिजे. मुली तर गाअींची पूजा करतीलच. या दिवशीं सर्वांनीं अेकत्र बसून, आळी-पाळीनें अेक अेक अध्याय म्हणून अठराहि अध्यायांचा पाठ करावा. गीताशास्त्राचें थोडें विवेचन व्हावें. श्रीकृष्णांनीं कंस, जरासंध, शिशुपाळ, नरकासुर आणि दुर्योधन या पांच सम्राटांचीं साम्राज्यें मोडून टाकलीं त्याचा अितिहास आज सांगावा. यांतूनच नाट्यभागहि सांपडेल, त्याचा नाट्य–प्रयोग ठेवतां येअील. दुपारीं विद्यार्थ्यांनीं आणि शिक्षकांनीं मिळून फिरायला जावें आणि वनभोजन करावें. रात्रीं भागवतांतील अेखादी कथा सांगावी. या सणाचें विवेचन पुष्कळ वेळां झालें असल्यानें त्याचा येथें विस्तार केला नाहीं.

———

# गणपति अुपासना : : २२

( भाद्रपद शु. ४ )

आपला हिंदुधर्म हा अनेक लहानमोठ्या आणि जुन्या नव्या संप्रदायांचें अेक मोठें अविभक्त कुटुंब आहे. मनुष्याच्या शक्तीप्रमाणें आणि बुद्धीप्रमाणें अेकच सत्य वेगळ्या वेगळ्या रीतींनीं त्याला प्रतीत होतें. त्यांत आणखी अनुभवाव्यतिरिक्त आपली कल्पना आणि काव्यशक्ति यांची भर घालून मनुष्य त्याची विविधता पुष्कळ वाढवितो. काळाच्या प्रवाहामुळें माणसाच्या समजुतींत जे फेरफार होतात त्या सर्व फेरफारांतून कालक्रमाचें तत्त्व विसरल्यामुळें किंवा पुसून गेल्यामुळेंहि अनेक घोटाळे अुत्पन्न होतात. पण मनुष्यप्राणि स्वभावानें असा कांहीं पुराणप्रिय आहे कीं त्रास देणारे हे घोटाळेसुद्धा संभाळून ठेवावेसें त्याला वाटूं लागतें; आणि या वृत्तीमधून कांहीं लाभ होतच नाहीं असें नाहीं. अितिहासदृष्टि असलेल्या शहाण्या माणसांना त्यांतून अितिहास मिळतो, विकासाचें तत्त्व सांपडतें; आणि स्थूल बुद्धीचीं सामान्य माणसें त्यांतून जसें मिळवितां येअील तसें आश्वासन मिळवून संतोष पावतात. विविध वृत्तीचे लोक जेथें मुळींसुद्धां अेकवाक्यता नाहीं तथेंहि अशा परिस्थितींमधूनच अैक्याचा अनुभव घेअूं लागतात.

गणेशचतुर्थीचा अुत्सवच आपण घेअूं. गणपतीची अुपासना या ना त्या प्रकारें वेदकाळापासून चालत आलेली आहे. पण आजकालचा गणेशपूजेचा पंथ वैदिक आहे असें सांगणें कठीण आहे. हिमालयाच्या पहाडांत जसे अनेक ठिकाणाहून लहानमोठे अनेक झरे निघतात आणि संयोगवशात् अेक होअून अेका नदीचें नांव मिळवितात, तसेंच या गणेशभक्तीचें झालेलें दिसतें. त्याच्या पौराणिक कथा पहायला जावें तर त्यांत कुठेंहि मेळ बसत नाहीं. आकाशांतील ताऱ्यांवरून अुत्पन्न झालेल्या पौराणिक कथा आणि कल्पना यांच्यामध्यें जसा मेळ म्हणून कांहीं नसतो, तसेंच या ठिकाणींहि झालेलें दिसतें.

आणि गणपति हाहि आकाशांतील अेखाद्या ज्योतीवरूनच बनलेला देव कशा वरून नसेल ? गणपति हा रंगानें लाल असतो. त्याला लाल फुलें आवडतात. तर ते

आकाशांतील मंगळ ग्रहच कशावरून नसेल? गणपतीच्या कित्येक चतुर्थींना 'अंगारकी चतुर्थी' म्हणतात. अंगारक म्हणजे मंगळ. ही अंगारकी चतुर्थी जर मंगळवारीं आली तर तिचें पुण्य जास्त सांगितलें आहे. गणपतीला मंगलमूर्ति तर म्हणतातच. ग्रहांत मंगळाचें नांव आहे मंगळ पण हा शुभ ग्रह समजला जात नाहीं. गणपतीची विघ्नहर्ता विघ्ननाशक म्हणून ओळख करून दिली जाते, तरी मानवगृह्यसूत्रांत सांगितलें आहे कीं रुद्र आणि ब्रह्मदेव यांनीं विनायकाला गणांचा वरिष्ठ अधिकारी म्हणून नेमलें आणि माणसाच्या कार्यांत विघ्न उपस्थित करण्याचें काम त्याच्यावर सोपविलें. महाभारतांत शिव, स्कन्द, विशाख वगैरे देवता जशा मुलांना पीडा करतात असें वर्णन केलें आहे तशीच स्थिति विनायकाच्या बाबतींतहि आहे.

जुन्या काळी देवांविषयींची कल्पना मिश्र होती. देव म्हणजे शक्ति. मनुष्याला ती त्रासहि देईल आणि मदतहि करील. राजाची खुशामत करून जसा मनुष्याला त्याचा अनुग्रह मिळवितां येतो, राजाची मर्जी खप्पा झाली म्हणजे त्याचा सत्यानाश होतो; तशीच कल्पना या देवांविषयींसुद्धां होती. गणपति प्रथम विघ्नकर्ता असावा. पुढें भक्तांनीं आराधना करून त्याला विघ्नहर्ता बनविला असावा.

अेके ठिकाणी सांगितलें आहे कीं गजासुराला मारण्यासाठीं विष्णूनें पार्वतीच्या पोटीं जन्म घेतला. दुसऱ्या अेका ठिकाणीं म्हटलें आहे कीं महादेवानें चुकीनें आपल्या द्वारपाळगणाचें डोकें उडविलें. आपली चूक लक्षांत येतांच खरा अपराधी जो गजासुर त्याचें डोकें कापून त्या गणाच्या खांद्यावर बसवून दिलें. या गोष्टींत अेखाद्या अनार्य पूजेचें वैदिक पूजेंत रूपांतर केल्याचा अुल्लेख कदाचित् असावा.

गणपति किंवा गणेश हा अनेक देवांचा सरदार असला पाहिजे. पूर्वीच्या काळीं कित्येक प्रजासत्ताक राज्यें गणराज्यें म्हणून ओळखलीं जात. त्या गणराज्याच्या लोकसभेची देवता म्हणून गणपतीची स्थापना करण्यांत आली असेल. व्यक्तीला जसा आत्मा असतो तसा संघटित समाजाला-समष्टीलाहि आत्मा असला पाहिजे. हा सामाजिक आत्मा म्हणजेच गणपति. गणपतीची पूजा करणें म्हणजे सामाजिक जीवनाला स्वतःची निष्ठा अर्पण करणें, अशीहि कदाचित् पूर्वीच्या काळीं भावना असावी.

तें कांहींहि असो, महादेव आणि विष्णु यांच्यामधला विरोध टाळण्यासाठीं गणपतीचा अुपयोग चांगला होत होता. गणपति हा शैवहि आहे आणि वैष्णवहि

आहे. अेखाद्या शुभ कार्याला सुरुवात करायची असली किंवा घराचा दरवाजा तयार करायचा असला तर तेथें गणपति बसविला कीं मिटले सारे झगडे.

आपण लिहायला शिकतों तेव्हां अ, आ, अि, ओपासून सुरुवात करीत नाहीं. ' श्रीगणेशा ' पासून सुरुवात करतों. आज, ' श्रीगणेशा ' चा अर्थच मुळीं ' आरंभ ' असा झाला आहे. आद्य लिपिकार कोणी गणेश नांवाचा योजक असेल. त्यानें लिपी शोधून काढली तेव्हां लेखनाची सुरुवात कृतज्ञतापूर्वक त्याच्या नांवापासूनच झाली पाहिजे असा रिवाज पडला असेल. व्यासांनी आपल्या डोक्यांत महाभारत रचलें, पण तें लिहून काढायला कोणी ' लेखक ' मिळेना. शेवटीं गणेशानें त्यांची ही नड सारली. पुराणांत सांगितलें आहे कीं त्रिविष्टप (तिबेट) मध्यें 'लेख' नांवाचे देवगण रहात असत. ते लेखनकलेंत प्रवीण होते. त्यांचा पुढारी गणपति होता. आपली लेखनकला फिनीशियामधून आलेली नसून तिबेटमधून आलेली असावी काय ? देववाणीच्या ध्वनीला व्यवस्थित स्वरूप देणारी आपली वर्णमाला शास्त्रीय आहे. वर्णमालेची योजना आर्यबुद्धीचें घटनाचातुर्य सूचित करते. आपली लिपिमाला तशी वाटत नाहीं. ती शास्त्रशुद्ध नाहीं. ही कुठून तरी बाहेरून आपल्याअिकडे आलेली असली पाहिजे. ती तिबेटमधून आली असली तर आश्चर्य नाहीं. पुष्कळ काळपर्यंत ब्राह्मण लोक तर लेखनकलेची अवगणनाच करीत आले. शेवटीं त्यांनाहि श्रीगणेशाला शरण जावें लागलें.

दुसरी अेक कल्पना अशी आहे कीं गणेश हा खरोखर 'गणेश' नसून गुणेश आहे. अुपनिषत्कालानंतर तीन गुणांची व्यवस्था बसविली गेली तेव्हां या तीन गुणांचा स्वामी म्हणून ' ओश सर्व गुणांचा' असा गणपति करून बसविला गेला असावा.

वेदांतविद्या जेव्हा लोकसुलभ झाली तेव्हां पुष्कळ अनार्य देव आणि त्यांची अनार्य पूजापद्धति रूपक म्हणून ओळखली जाअू लागली. ॐ कार अथवा प्रणव यांत सत्त्व, रज, तम हे तीन्ही गुण आहेत. ॐ कारांत हत्तीच्या सोंडेसारखा आकार आहे. त्यावरून गणेश अथवा गुणेश हा गजानन समजला गेला. त्याच्या डोक्यावर अर्धचंद्र आहे तो हत्तीचा दांत झाला . मन मारल्यावांचून वेदांतज्ञानाचा साक्षात्कार होणार नाहीं तेव्हां मनाची देवता जो चंद्र त्याचें दर्शन टाळून ज्ञानाची आराधना केली असेल तरच चतुर्थी म्हणजे तुरीयावस्था कृतार्थ व्हायची. गणपति हा

अुंदरावर बसतो. अुंदीर म्हणजे काळ. मनुष्यजीवनाचे तंतू तोडून खाणारा काळ तो अुंदीर. त्याच्यावर ज्याची स्वारी असा गणपति तोच मोक्षदाता.

अशा रीतीनें जंगली लोकांच्या अथवा अनार्य लोकांच्या अेखाद्या पशुपूजेवरून अेक अुपासना अुत्पन्न झाली, आणि ती बदलत बदलत वेदांत विद्येपर्यंत जाअून पोचली, असेंहि कित्येकांचें मत आहे.

पण आज जेव्हां दरवर्षी शाडू आणून त्याचे तयार केलेले गणपती घरोघर पुजले जातात, तेव्हां त्या गणपतीच्या अुपासकांच्या मनांत काय ही सर्व वेदांतविद्या जागृत असते ? पूर्वीच्या काळचा गाणपत्य संप्रदाय भयानक होता. माणसाच्या करवंटीच्या आसनावर गणपतीची स्थापना होत असे. जारण, मारण, अुच्चाटण अित्यादि गलिच्छ विद्या गणपतीच्या अुपासनेशीं जोडलेल्या होत्या. या सर्वांतून आज आपण पार पडलों आहोंत ही अीश्वराची कृपाच म्हणायची. धर्मव्यवस्थापक सांगतात कीं कलियुगांत अितर सारे देव झोपलेले आहेत. फक्त चंडी आणि विनायक—म्हणजे काली आणि गणपति— हे दोनच तेवढे जागृत आहेत. देवांतसुद्धां चातुर्वर्ण्य आहे असेंहि सांगितलें आहे. शंकर हा वर्णानें ब्राह्मण, विष्णु क्षत्रिय, ब्रह्मा वैश्य, आणि गणपति शूद्र आहे. आणि त्यांत काय नवल ? शंकर अकिंचन आणि तपस्वी, योगी आहे; विष्णु लक्ष्मीपति, अैश्वर्यवान, प्रजापालक आहे; ब्रह्मदेव तर निर्माणकर्ता; गणपति शूद्र कां गणला गेला तें समजत नाहीं. तो सामान्य जनतेचा देव आहे म्हणून ? कित्येक ठिकाणीं गणपति हे ब्रह्मदेवाचेंच अेक रूप आहे असें समजावून देण्याचा प्रयत्न झाला आहे.

महाराष्ट्रांत गणपतीला 'मोरया' म्हणतात. याचें मूळ पुण्याजवळच्या अेका स्थानिक देवतेंत आहे. मोरगांवचे साधु मोरया हे गणपतीचे अुपासक होते. त्यांनाच लोकांनीं गणपतीचा अवतार बनविलें. आजकाल आपल्या या महाराष्ट्रांत कलेच्या आणि अुत्सवाच्या नांवानें कित्येक वेळां गणपतीच्या अशा कांहीं छाकटचा आणि औचित्यशून्य मूर्ती बनवितात कीं हिंदुधर्माचे त्याचे कट्टे विरोधीसुद्धां याहून अधिक विटंबना करूं शकणार नाहींत. अशा मूर्ती पाहून भक्तिभाव कसा काय जागृत होणार किंवा पुष्ट होणार ?

मूर्तिविधानाच्या ग्रंथांत लिहिलें आहे कीं पूजेंतील मुख्य देवांच्या मूर्ती शास्त्रोक्त ' ध्यानां ' त वर्णिल्याप्रमाणेंच प्रसन्न-गंभीर बनविल्या पाहिजेत. क्षुद्र देवांच्या आणि यक्ष किन्नरांच्या मूर्तींच्या बाबतींत वाटेल ती मोकळीक आहे.

हिंदुधर्माच्या धार्मिक समजुतींमध्यें असा कांहीं घोटाळा माजला आहे कीं त्यांत अेकदां शिरल्यानंतर पुनः बाहेर निघणें सोपें नाहीं. जुन्या धर्मकारांनीं आणि समाज-व्यवस्थापकांनीं समाजांत अुच्च वेदांती विचार बाळगणाऱ्या पंडितांपासून थेट भूत–प्रेत पिशाचादि काल्पनिक आणि भयानक शक्तींची अुपासना करणाऱ्या प्राकृत पूजेपर्यंत सर्वांना सूत्रबद्ध करण्याचा प्रयत्न केला. हा प्रयत्न करतांना त्यांनीं जाणून बुजून धूर्ततेचा अुपयोग केला असें म्हणणें हें अैतिहासिकदृष्ट्या असत्यच वाटतें. अगदीं वेगळ्या अशा दोन वस्तू अेकाच वेळीं अेकदम खऱ्या म्हणून मानाव्या लागतात तेव्हां माणसाचें कल्पनासमृद्ध मन या ना त्या रीतानें त्यांचा समन्वय करण्याचाच प्रयत्न करतें, त्यापैकीं अेक कल्पना खरी आणि दुसरी खोटी असें म्हणणें धार्ष्ट्याचेंच होअील. परमसत्य कोण जाणे मनुष्यबुद्धीपासून किती दूर आहे. हिमालया-पुढें अुभे राहून घोंड्यानें खड्याला 'तुझ्यापेक्षां मी हिमालयाशीं अधिक मिळता आहे ' असें म्हणावें, अशा सारखीच आपली स्थिती आहे. अेक कल्पना जंगली आहे म्हणावें, दुसरी सुधारलेली आहे म्हणावें, आणि कालांतरानें अनुभव यावा कीं दोन्ही सारख्याच भ्रामक होत्या; अशा स्थितींत लोकांच्या कल्पनांवर टीका करीत बसण्या-पेक्षां जीवनांत सदाचार , अनासक्ति आणि निर्भयपणा आणण्याचा प्रयत्न केला तर लोक आपोआप कल्पनेचें काव्य अनुभवीत असतांनासुद्धां तिच्याखालीं दडपून जाणार नाहींत. जेथें जेथें संशय आणि भ्रामक कल्पना मनुष्याला दुराचाराकडे घेअून जातात तेथें तेथें लोकांना जागृत करीत गेलें तर बाकीचें काम आपोआप सिद्ध होअील.

दुसऱ्या बाजूनें, भौतिकशास्त्रांच्या सिद्धांतांशीं आणि पद्धतीशीं लोकांना परिचित करण्याची घाअी केली पाहिजे. भौतिकज्ञान आणि आध्यात्मिक ज्ञान परस्पर विरोधी नसून पोषक आहे. दोहोंतून खरी धार्मिकता जागृत झालीच पाहिजे. दोहोंची अुपासना मानवकल्याणाच्या दृष्टीनेंच केली पाहिजे. आणि खरें म्हणजे ज्ञानदात्या, विघ्नहर्त्या अशा खऱ्या गणपतीची हीच खरी अुपासना आहे.

१४–१०–३४

# गणेशचतुर्थी

भाद्रपद शु० ४ १ दिवस.

ज्ञानसाधनाचा दिवस. या दिवशीं कोणत्याहि नव्या शास्त्राचा अभ्यास सुरू करतां येईल. निरनिराळ्या शास्त्रांची रूपरेखा देणारीं व्याख्यानें या दिवशीं ठेवावीं. मोदकांचें भोजन या दिवशीं रूढीप्रमाणें आहेच. रामनवमी, जन्माष्टमी आणि गणेश-चतुर्थी या तीन दिवशीं मूर्तिपूजेचे सामाजिक अुत्सव पुष्कळ ठिकाणीं रूढ आहेत. त्यांच्या योगानें समाज अेकत्र येतो. याचा लाभ घेअून धर्मसंस्करणाच्या अनेक प्रश्नांवर चर्चा झाली तर बरे. या कामासाठीं गणेशचतुर्थी हा विशेष अनुकूल दिवस आहे. विद्यार्थ्यांनीं शाडूचे गणपती बनवावे, दुसऱ्याहि विविध प्रकारच्या मूर्ती बनवाव्या आणि त्या साऱ्या दिवाणखान्यांत मांडून ठेवाव्या. वेगवेगळ्या प्रकारचीं पानें गोळा करून तीं लावून आरास करावी.

पर्युषणाविषयींहि विवेचन झालें पाहिजे.

मानसशास्त्रावरील विद्यार्थ्यांना समजतील असे निबंध आज वाचतां येतील.

## ॠषिपंचमी

भाद्रपद शु० ५ — १ दिवस.

रूढीप्रमाणें हा स्त्रियांचा सण होऊन बसला आहे आणि ताहि पोकन स्त्रियांचा खरें म्हटलें तर ॠषींचें पूजन प्रत्येकानें करण्यासारखें आहे. ॠषींमध्यें स्त्रियाहि आहेत आणि पुरुषहि आहेत. त्यांचीं चरित्रें पुराण–अितिहासांतून शोधून काढून त्यांवर विचार झाला तर धर्मजागृति होअील.

जनावरांकडून स्वार्थामुळें आपण श्रम करून घेतों. पण ते श्रम घेण्याचा आपल्याला हक्क नाहीं. जितक्या प्रमाणांत आपण ढोरांकडून सेवा काढतो तितक्या प्रमाणांत आपण दोषी आहोंत. हें लक्षांत राहावें अेवढ्यासाठीं ॠषिपंचमीच्या दिवशीं ढोरांच्या मेहेनतीशिवाय जे खाद्यपदार्थ तयार होऊं शकतात आणि मिळविनां येतात तेवढ्यांवरच या दिवशीं निभावून घेतलें पाहिजे. प्रौढ विद्यार्थ्यांनीं या दिवशीं वेगवेगळ्या ॠषींचे भिन्न भिन्न धर्मसिद्धांत प्राचीन ग्रंथांमधून वेचून काढून समजावून द्यावेत. आजपर्यंत हें काम कोणीच केलेलें नसल्यामुळें तें किती मोठें आणि महत्त्वाचें आहे हें लक्षांतहि येणार नाहीं. केल्यानें समजेल.

अन्यधर्मी संतांच्या आणि ॠषींच्या चरित्राचा अभ्यासहि आजपासून आस्थापूर्वक व्हावा.

## पर्युषण

भाद्रपद शु० ५

पर्युषणाची समाप्तीसुद्धां याच दिवशीं होते. म्हणून कल्पसूत्रांमधून विशिष्ट भाग पसंत करून विद्यार्थ्यांना समजावून देण्यांत यावा. पशु, पक्षी, कीट, पतंग, वनस्पती या सर्वांत सारखाच जीव आहे, सर्वांच्या बाबतींत आपला व्यवहार विचारपूर्वक व्हावा, हा सिद्धांत आज विशेषरूपानें समजावून देतां येअील. स्व–परभाव दूर करणें यांतच धर्मरहस्य आहे हेंहि समजावून द्यावें.

गरीब विद्यार्थ्यांची पुस्तकांची नड भागविण्यासाठीं आज फंड गोळा करता येअील.

# चरखा द्वादशी अथवा गांधी जयंती : : २४

## ( भाद्रपद व. १२ अथवा २ आक्टोबर )

### १

चरखा द्वादशी हा आतां बहुजनसमाजाचा मण झाला आहे. स्वराज्य मिळायचें असेल तेव्हां मिळो. दादाभाअीपासून थेट लोकमान्य, दास आणि लजपतरायापर्यंतच्या देशसेवकांनीं आतांपर्यंत अितकी कांहीं तपश्चर्या केली आहे कीं आतां स्वराज्य न मिळालें तरच आश्चर्य. जर आपण गंभीर चुका केल्या नाहींत, फलसिद्धीच्या वेळींच कांहीं वेडेंवाकडें केलें नाहीं, आणि आपापल्या वांटयाला येणारें राष्ट्रकार्य चिकाटीनें आणि वेळेवर करायला चुकलों नाहीं, तर स्वराज्य घरच्या गाअीप्रमाणें आपोआप चालत आलें पाहिजे. पण हें स्वराज्य लोकांचेंच होअील कीं नाहीं, लोकांना तें संपूर्णपणें आशीर्वादरूप होअील कीं नाहीं, हा मोठा प्रश्न आहे. शेतकरी जेवढें धान्य जगाला अर्पण करतो तेवढ्याचे पुरते पैसे त्याच्या पदरांत पडत नाहींत. मधले लोकच त्यांतील मोठा भाग खाअून टाकतात. आपल्याला मिळणाऱ्या स्वराज्याची जर अशीच स्थिति झाली तर ती राष्ट्रीय आपत्तीच म्हणायची. तसें न व्हावें, अेका हातीं मिळविलेलें दुसऱ्या हातीं आपण गमावूं नये, स्वराज्याचा अर्थ आपसांतील यादवी असा होअूं नये, अेवढ्यासाठीं गांधीजींनीं चरखा-धर्म सुरू केला आणि खादीचा अेवढा आग्रह धरला आहे.

सहारा वाळवंटाविषयीं असें सांगतात कीं कांहीं कांहीं वेळेला तेथें आकाशांतून पावसाची प्रचंड सर येते, पण वाळवंटांतील रेतीचा अितका कांहीं वाफारा असतो कीं पाअूस जमिनीपर्यंत पोचण्याच्या अगोदर त्याची वाफ होअून आकाशांत अुडून जातें. आपण जर खादीची दीक्षा घेतली नाहीं तर आपल्या स्वराज्याचेंसुद्धां गरीबांच्या दृष्टीनें असेंच होअील.

कित्येकजण म्हणतात कीं बाहेरून खादी घालून काय होणार आहे ? आंतून हृदयपरिवर्तन होअील तेव्हां खरें. गोष्ट खरी. पण बाह्य आचरणाचा हृदयावर परिणाम होत नाहीं असें कोणीं सांगितलें ? अष्टौप्रहर शरीराशीं संबंध बाळगणारी खादी आपला मूक पाठ दिल्यावांचून राहाणार नाहीं. क्रियेची शक्ति शब्दाच्या शक्तीपेक्षां केव्हांहि जास्त असतेच.

चरखाद्वादशीचें हें माहात्म्य आहे. चरखाद्वादशी म्हणजे आमप्रजेबरोबर हृदयाचें ऐक्य. चरखाद्वादशी म्हणजे स्वराज्यनिष्ठा. चरखाद्वादशी म्हणजे निर्वैर स्थितीची साधना. चरखाद्वादशी म्हणजे राष्ट्रीय संघटन.

• चरखाद्वादशीदिवशीं हरिजनांशीं असलेलें आपलें अनुसंधान आपण अनुभवलें पाहिजे, सफाईचें जें काम हरिजन करतात तें या दिवशीं जातीनें करून कांहीं लोकांनीं या बाबतींत दिशासूचन केलें आहे. जीं जीं ठिकाणें आपण वापरतो तीं तीं सर्व स्वतः स्वच्छ ठेवून आपण सामाजिक स्वच्छतेचा धडा घेतला पाहिजे आणि चालत आलेल्या रूढींत सुधारणा केली पाहिजे. दरवर्षी अशा रीतीनें आपण पुढें पुढें जाऊं तर सबंध राष्ट्राला शेकडों वर्षांपासून मिळालें नाहीं असें शिक्षण विनाखर्चे आणि अल्प प्रयत्नानें मिळेल.

पण चरखाद्वादशीचें मुख्य काम हें तिच्या नांवांतच सूचित झालें आहे अिंग्लंडचा प्राण जसा त्याच्या जहाजांवर अवलंबून आहे तसा आपला प्राण चरख्यावर अवलंबून आहे. हा चरखा चालला तर आपलें भाग्य चालेल. चरखा थांबला तर आपलें भाग्यहि थांबेल. चरखाद्वादशीदिवशीं सर्वांनीं चरखा फिरवावा हें तर आवश्यकच आहे; पण तद्व्यतिरिक्त नवे चरखे चालू करावे, ज्यांना कांतता येत नाहीं त्यांना कातायला शिकवावे, ज्यांना पेळू करतां येत नाहींत त्यांना त्या शास्त्राची दीक्षा द्यावी, हें चरखाद्वादशीचें मुख्य काम आहे. चरखा चालविण्याला जे आतुर आहेत पण चरखा विकत घेण्याची ज्यांना ऐपत नाहीं अशा लोकांना चरखा देण्यासाठीं धनिकांनीं कांहीं पैसा राष्ट्रीय संस्थांकडे ठेवून द्यावा. चरखा चालावा म्हणून चरख्याला प्रधानपद देणाऱ्या संस्थाहि सुरू केल्या पाहिजेत.

चरख्याचें महत्त्व जाणत असतांना आणि खादी वापरीत असतांना सुद्धां कितीतरी लोकांनीं परदेशी कापडाचा मोह अजून सोडलेला नाहीं. अशा रीतीनें साठवून ठेवलेलें पाप जाळून टाकण्याचें कामहि या दिवशीं प्रसन्न मनानें करावें. चरखाद्वादशीचेंदिवशीं परदेशी कापडाच्या जितक्या होळ्या करतां येतील तितके गरीबांचे आशीर्वाद मिळणार आहेत. चरखाद्वादशीदिवशीं आजीवन शुद्ध खादीच वापरण्याचा संकल्प देशांतील बंधुभगिनींनीं जर केला तर देशाची केवढी बरे प्रगति होईल ! आणि यांत आत्मोन्नति तर आहेच.

सण म्हटला म्हणजे आजारी पडण्याइतके पुरणपोळीचें किंवा इतर गोड गोड पक्वान्नांचें जेवण करायचें आणि परस्परांना आग्रह करायचा

हा विचार आपण सोडून दिला पाहिजे. विचार करून पाहतां दिसून येईल कीं यांत सुख नाहीं, सामर्थ्यवृद्धि नाहीं, कीं प्रसन्नताहि नाहीं. ही असंस्कारी चाल आपण काढून टाकली पाहिजे. खादाडपणाचा प्रचार तो कसला करायचा? त्यापेक्षा आरोग्य आणि पुष्टि वाढेल, काम करण्याचा अुत्साह वाढेल, आपल्या शरीरावर आणि मनावर योग्य ताबा राहील अशा प्रकारचा आणि अशा प्रमाणांत आहार घेण्याची सुरुवात या दिवशीं करायला पाहिजे.

चरखाद्वादशी म्हणजे स्वदेशीचा प्रचार. त्या दिवशीं खेळांत स्वदेशीव्रत कसोशीनें आणलें पाहिजे. देशी संगीत, देशी चित्रकाम, देशी भाषा यांच्या पुनरुद्धारासाठीं त्या दिवशीं कितीतरी नवेनवे कार्यक्रम ठेवतां येतील. चरखाद्वादशी हा राष्ट्रीय अैक्याचा दिवस आहे. त्या दिवशीं कोणाचाहि बहिष्कार असूं नये. सगळ्या जातींच्या, सगळ्या धर्मांच्या आणि सगळ्या पंथांच्या स्त्रीपुरुषांनीं, मुलांनीं आणि वृद्धांनीं अेकत्र सामाजिक जीवनाचा अनुभव घ्यावा. चरखाद्वादशी हा आत्मशुद्धीचा सण आहे. जीवनांत घर करून बसलेली व्यसनें काढून टाकण्याचा प्रयत्न त्या दिवशीं विशेषेंकरून व्हावा. ज्याची सुरुवात अेरवीं होत नाहीं तें करण्याची शक्ति या दिवसाच्या माहात्म्यामुळें माणसांत कदाचित् येअीलहि. चरखाद्वादशी हा दीनजनांचीं दुःखें निवारण करण्याचा सण आहे. त्या दिवशीं पारतंत्र्याचा शेवट कसा करावा याचें अुग्र चिंतन झालें पाहिजे.

१२-९-२९

## २ खादीचा सन्देश

हा आहे खादीचा संदेश.

शेती, खादी, ग्रामोद्योग व गोपालन या बाबतींत आमचीं घरें व गांवें स्वावलंबी बनलीं. आम्ही त्यामध्यें गरजेपेक्षां जास्त परस्परावलंबन आणलें नाहीं आणि आवश्यक तें परस्परावलंबन व सहकार्य टाळलेंहि नाहीं, तर नैसर्गिक रीत्या अशा प्रकारचा समाज स्वावलंबी, स्वयंपूर्ण व स्वतंत्र झाल्यावांचून राहाणार नाहीं. अशा समाजांत परस्परांतील स्पर्धा कमींत कमी राहील, त्यामुळें त्या समाजांत परस्परविषयींची सहानभूति जास्तींत जास्त राहील व वाढेल. अशा समाजालाच आपण अहिंसक समाज म्हणतों.

मनुष्यसमाजाच्या अगदीं बाल्यावस्थेंत कदाचित् अशा समाजाची स्थापना होणें शक्य झालें नसतें. पण आपल्या निरोगी तारुण्याच्या काळांत मात्र मानव-समाजाला नैसर्गिकपणें अहिंसक बनलेंच पाहिजे. ज्ञान, विज्ञान आणि कला-कौशल्याच्या विकासाबरोबर जर समाज जागृत व तेजस्वी राहिला, तर त्याला अहिंसा हाच मनुष्याच्या जीवनाचा धर्म आहे, असें आपोआपच कळून चुकेल, पण जोंवर हें ज्ञान भोळेपणाचें आहे तोंवर तें सुरक्षित नाहीं. जीवनाचा कडू-गोड अनुभव मिळाल्यानंतरच मनुष्याला भरतीओहोटीची बरोबर कल्पना येते. आणि ही कल्पना आल्यानंतर त्याच्या मनांत जी अहिंसा राहिली असेल तीच दीर्घ काळपर्यंत टिकेल. गेल्या पांचदहा हजार वर्षांच्या अनुभवानंतरहि जर मानवसमाज अहिंसेच्या दिशेकडून प्रगत झाला नाहीं तर तो नष्ट झाल्यावांचून राहाणार नाहीं यांत कांहीमात्र शंका नाहीं.

अहिंसा ही कांहीं अशी वृत्ति नव्हे कीं जी कोऱ्या धर्मोपदेशानें आपोआप अंतःकरणांत ठसेल. अहिंसेच्या स्थापनेकरितां मनुष्याला अेक विशिष्ट प्रकारचें निरोगी जीवन घाल-विण्याची कला शिकली पाहिजे, अेक विशिष्ट प्रकारची समाजरचना पक्की केली पाहिजे. आणि त्याकरितां मनुष्याला अेक विशिष्ट प्रकारची जीवनदृष्टि आत्मसात केली पाहिजे.

जगांत आज ज्या प्रकारचीं सरकारें अस्तित्वांत आहेत तीं अहिंसक समाजांत सामिल होअूं शकत नाहींत. या सर्व सरकारांचें जीवनदर्शन नास्तिकतापूर्ण असतें. त्यांचा अंतिम विश्वास मनुष्यामधील अुच्च वृत्तींवर नसून दंड, जबरदस्ती, अिनाम आणि प्रतिष्ठा यांच्या मार्फत प्रकट होणाऱ्या भय, लोभ व अहंकार या तीन हलक्या वृत्तींवर असतो. अशा सरकारांना मान तुकवावी लागते ही मनुष्याला एक शरमेची गोष्ट आहे. पण करणार काय ? एकदां जीवन, आदर्श आणि वृत्ति कृत्रिम बनविली आणि सामाजिक जीवन रोगी केलें म्हणजे मग मनुष्य नकली सरकारें स्थापन नाहीं करणार तर काय करील ? जाअील कुठें ?

खरजुल्या माणसाला आपलें अंग खाजविण्यांत अतिशय सुख मिळतें. पण म्हणून खरूज हा रोग नसून जीवनाची ती एक सिद्धि आहे असें कोणी म्हणणार नाहीं. याचप्रमाणें, आजच्या संस्कृतीमुळें माणसाच्या कांहीं वासना पूर्ण होतात म्हणून कांहीं ही संस्कृति रोगी नव्हे असें सिद्ध होत नाहीं.

जो मनुष्य वासनांनीं घेरलेला आहे तो केवळ भरीव युक्तिवादानें कांहीं कोणतीहि गोष्ट कबूल करीत नाहीं. अेडवर्ड कार्पेन्टर सारख्यांनीं आजकालच्या संस्कृतीचा रोग कसा अुत्पन्न होतो व त्याला नाहीसे करण्याचे मार्ग किंवा अिलाज काय आहेत या विषयावर अेक सुंदर पुस्तक लिहिलें आहे. पण तें वाचून कांहीं समाज आपल्या जीवनाची चाल बदलण्याला तयार झाला नाहीं. अेकामागून अेक ज्या दोन विश्वव्यापी लढाया झाल्या त्यामुळें मनुष्यजात आज आपल्या विनाशाच्या कांठावर येअून ठेपली आहे. अशा वेळीं ज्या हिंदुस्थानच्या रक्तांत आत्मपरायण-संस्कृतीचा वारसा सुप्तावस्थेंत कां असेना पण अस्तित्वांत आहे तो हिंदुस्थान स्वतः विनाशापासून सुरक्षित राहून साऱ्या जगाला विनाशापासून वांचवूं शकेल या आशेनें आपण आपलें जीवन स्वावलंबी आणि स्वयंपूर्ण बनविण्याच्या प्रयत्नाला लागलेलों आहों.

आपण जेव्हां आपलें जीवन स्वच्छ–शुद्ध बनवूं तेव्हांच आपल्याला मनुष्याच्या प्रतिष्ठेला शोभा देणारी संस्कारी व खऱ्या अर्थानें सुधारलेली सत्ता अस्तित्वांत आणतां येअील.

जर आपण नेहमीं फौज, पोलीस, कोर्टकचेऱ्या आणि आपसांतील मारामारी यांच्या मार्फतच अन्यायाला तोंड देत राहूं तर या प्रकारचे सरकार चालविण्याकरितां आपल्याला त्याची किंमतहि चुकती करावी लागेल, आणि ती किंमत तेव्हांच चुकती होअील जेव्हां आपण हिंसाप्रधान, भोगैश्वरपरायण व द्रोहमूलक समाजाला, म्हणजेच जो समाज मारामारी, भोग-विलास आणि लूटमार यावर जगूं अिच्छितो तशा समाजालाच, वाव देअूं.

भावीकाळच्या समग्रसमाजशास्त्राचा मूलमंत्र, जीवन घालवावयाचें ते स्वावलंबनानें आणि टिकवावयाचें तें सत्याग्रहाच्या बळावर, हाच राहील.

सत्याग्रहांत अन्याय करणाऱ्या मनुष्याला आणि त्याच्या अन्यायालाच केवळ नव्हे तर अन्यायी मनुष्याच्या अन्यायी वृत्तीलाच विरोध मुख्यत्वें असतो. या रीतीनें प्रत्येक सत्याग्रहाबरोबर समाजाच्या हलक्या वा हीन वृत्ती कमी कमी हो जातात आणि राज्यव्यवस्थेचा लोप होत जातो. म्हणजे, राज्यव्यवस्थेमधील व्यवस्थेचा भाग कायम राहतो, पण राज्यसत्तेचा भाग नाहींसा होतो. मनुष्य समाजानें जर अितकी प्रगति केली नाहीं तर तो टिकूं शकणार नाहीं. जगांविज्ञानाचा (सायन्सचा) अितका प्रसार झाला, माल नेण्याआणण्याच्या अितक्या

सोयी अुत्पन्न झाल्या, साऱ्या जगावर आर्थिक व्यवस्थेचें जाळें पसरलें, तरीसुद्धां आज जगांतील जवळजवळ सर्व देश धान्य व कपडा यांना मोताद झाले आहेत. ज्या संस्कृतीमुळें ही बिकट परिस्थिति निर्माण झाली, ती संस्कृति सुधारणेंच अवश्य आहे. ही सुधारणा स्वावलंबन, स्वयंपूर्णता व सत्याग्रह यांच्या साह्यानेंच होअील आणि खादी या सर्वांचें प्रतीक आहे.

हें समजून जेव्हां आपण खादीचा स्वीकार करूं तेव्हांच आम्हांला, म्हणजे आमच्यांतील प्रत्येकाला जीवनाची शांति प्राप्त होअील.

('हरिजन' १५ डिसेंबर १९४६ वरून)

# चरखाद्वादशीचा कार्यक्रम

श्रीशंकराचार्यांनी ठरविलें कीं कोणत्याहि देवतेची पूजा तिला पंचायतनांत बसवूनच केली पाहिजे. महात्माजी म्हणतात कीं राष्ट्रनिर्मितीच्या रचनात्मक कार्यक्रमामध्यें खादी आणि चर्खा हे सूर्याच्या स्थानीं आहेत. अितर सर्व ग्रामोद्योग आणि रचनात्मक चळवळी या सूर्याभोवतीं फिरणारी ग्रहमाला आहे. खादीला आणि तिच्यां प्रभावळीतील अितर सर्व कार्यक्रमांना जीवनामध्यें पेरण्याचें काम वर्धा-शिक्षण-योजनेचें आहे. म्हणून चर्खाद्वादशीच्या दिवशी केवळ चर्खा चालविण्याचा किंवा घरोघर जाअून खादी विकण्याचा कार्यक्रम असतां कामा नये. आतां चर्खाद्वादशीच्या सुमुहूर्तावर पायाच्या शिक्षणाच्या शाळा स्थापन करण्याचा आणि चालत असणाऱ्या शाळांना विशेष मदत करून त्यांना प्रोत्साहन देण्याचा कार्यक्रम आंखला पाहिजे. घरी आराम करीत असतांना मध्यें चर्खा ठेवून त्याच्या आसपास अितर सर्व अुद्योगांची आणि रचनात्मक प्रवृत्तींचीं प्रतीकें पूजेला ठेवावींत, आणि जमलेल्या लोकांना व्यापक चर्खा पुराण समजावून सांगावें.

चर्खाद्वादशीच्या पूर्वींचे बारा दिवस गांवांतून शक्य तितकी मदत घेअून अव्यंग तकल्या तयार करवाव्यात आणि स्थानिक प्रयत्नानें तयार केलेल्या अशा तकल्यांचे द्वादशीदिवशीं प्रदर्शन करावें.

वर्धाशाळेंतील अनुबंधबोधक भित्तिचित्रांचेंहि प्रदर्शन करावें.

चर्खाद्वादशीदिवशीं हरिजनसेवकसंघासाठी धनसंग्रह करण्याचा परिपाठ आहे. तो बरीच वर्षे कायम ठेवावा लागेल.

ता. २५-२-४७

## ( आश्विन शु. १ ते १० )

महिषासुर हा साम्राज्यवादी होता. सूर्य, अिंद्र, अग्नि, पवन, चंद्र, यम, वरुण अि० सर्व देवांचा अधिकार आणि खातीं तो स्वतःच चालवीत असे. स्वर्गांतील देवांना त्यानें भूलोकची प्रजा बनविलें होतें. कोणालाहि स्वस्थानीं सुरक्षितता वाटत नव्हती. देव परमात्म्याकडे गेले. परमात्म्यानें सृष्टीची जी व्यवस्था केली होती ती महिषासुरानें किती बिघडून टाकली आहे हें सर्व त्यांनीं त्याला कथन केलें. हें सर्व अैकून विष्णु, ब्रह्मा, शंकर वगैरे सर्व देवांच्या शरीरांतून पुण्यप्रकोप अुसळला आणि त्याची अेक दैवी शक्तिमूर्ति निर्माण झाली. सर्व देवांनीं या सर्व देवमयी शक्तीला आपापल्या आयुधांच्या शक्तीनें मंडित केलें आणि मग ही दैवी शक्ति आणि महिषासुराची आसुरी शक्ति यांमध्यें भीषण युद्ध सुरू झालें. किती वर्षें तें चाललें कोणाला माहीत ! पण आश्विन महिन्याच्या शुक्ल प्रतिपदेपासून दशमीपर्यंत हें युद्ध चाललें असें समजतात आणि त्याप्रमाणें दैवी शक्तीच्या विजया-नवरात्राचा अुत्सव आपण साजरा करीत असतो.

दैवी शक्ति ही परमा विद्या आहे, ब्रह्मविद्या आहे, आत्मतत्त्व, विद्यातत्त्व आणि शिवतत्त्वाचें शुद्ध स्वरूप आहे. ही शक्ति शठंप्रति शुभंकरी आहे; ' अहितेषु साध्वी ' आहे; वैर्‍यांच्याविषयींसुद्धां ती दया प्रगट करते. दुष्ट लोकांचा वाअीट स्वभाव शांत करणें हेंच या दैवी शक्तीचें शील आहे. ' दुर्वृत्तवृत्तशमनं तव देवि शीलम् । '

असुरांना ही शक्ति समजली नाहीं. भक्त जेव्हां दैवी शक्तीचा जयजयकार करूं लागले तेव्हां असुर गोंधळून ' अरे हें काय ? हें काय ? ' असा ओरडा करूं लागले. शेवटीं असुरांचा राजा स्वतःच लढूं लागला. त्यानें अनेक प्रकारची नीति चालवून पाहिली, अनेक रूपें धारण केलीं, पण शेवटीं 'निःशेषदेवगणशक्तिसमूहमूर्ती '-चाच विजय झाला. वायु अनुकूल वाहूं लागला, पावसानें भूमी सुजला सुफला केली, दिशा प्रसन्न झाल्या आणि भक्तगण देवीचें मंगल गाअूं लागले. देवीनें भक्तांना आश्वासन दिलें की अशाच रीतीनें पुनः जेव्हां जेव्हां आसुरी लोकांच्यामुळें त्रास पसरेल तेव्हां मी स्वतः अवतार धारण करून दुष्टतेचा नाश करीन.

हा महिषासुर प्रत्येक माणसाच्या हृदयांत आपलें साम्राज्य स्थापन करण्याचा अट्टाहास करीत असतो आणि त्या त्या वेळीं दैवी शक्तीला त्याचीं सर्व स्वरूपें ओळखून त्याचा समूळ नाश करावा लागतो. प्रत्येकाच्या हृदयांत हें युद्ध किती वर्षें चाललेलें असतें हें प्रत्येकाला आपलें अंतःकरण शोधून समजून घेतां येतें. नवरात्राच्या दिवसांत हृदयांत नंदादीप तेवत ठेवून आपण त्या दैवी शक्तीची आराधना केली पाहिजे; कारण जेव्हां ही दैवी शक्ति प्रसन्न होते तेव्हां तीच आपल्याला मोक्ष देते.

**सैषा प्रसन्ना वरदा नृणां भवति मुक्तये ।**

२८-९-२२

## शारदेचें अुद्बोधन : : २६

कोणत्या नवमीला सुरांनीं शारदेचें अुद्बोधन केलें हें आपल्याला माहीत नाहीं. पण तो अत्यंत शुभ, सुभग आणि कल्याणकारी मुहूर्त असला पाहिजे. समृद्धिदायी वर्षा झाल्यानंतर जी शांति, जी निर्मळता, जी प्रसन्नता दृग्गोचर होते त्यांतच देवांना शारदेचें दर्शन झालें. पृथ्वीनें हिरवा रंग अजून सोडलेला नाहीं, परिपक्व धान्य सुवर्णवर्ण खुलवीत आहे, अशा प्रसंगीं देवांनीं शारदेचें ध्यान केलें. सज्जनहृदयासारख्या अच्छोदकांत विहार करणारीं प्रसन्न कमळें आणि आकाशांत अनंत काव्याचे फवारे सोडणारा रसस्वामी चंद्र हे दोन्ही जेव्हां परस्परांचें ध्यान धरीत होते तेव्हां देवांनीं शारदेचें आवाहन केलें. शारदा आली आणि पृथ्वीच्या वदनकमलावर सुहास्य पसरलें. शारदा आली आणि वनश्रीचा गौरव विकसला. शारदा आली आणि घरोघर समृद्धि वाढली. शारदा आली आणि वीणेचा झणत्कार सुरू झाला; संगीत आणि नृत्य सर्वत्र पसरलें.

शारदेचें स्वरूप कसें आहे ? बाला ? मुग्धा ? प्रौढा ? कीं पुरंध्री ? शारदा मंजुलहासिनी बाला नाहीं, मनमोहिनी मुग्धा नाहीं, विलासचतुरा प्रौढा नाहीं. ती नित्ययौवना पण स्तन्यदायिनी माता आहे. ती आपल्याबरोबर खेळते, हंसते पण ती आपली सखी नाहीं; ती माता आहे. आपण तिच्याबरोबर बालसहज लडिवाळपणा करावा, पण आपण आअीपुढें अुभे आहोंत हें विसरून जाअूं नये. माता म्हणजे पवित्रता, वत्सलता, कारुण्य आणि विश्रब्धता. माता म्हणजे अमृतनिधान. ' न मातुः परदैवतम् ' हें वचन अेखाद्या अुपदेशप्रिय स्मृतिकारानें काढलेलें नाहीं, तो कोणा मातुःपुत्र धन्य मुलानें काढलेला हृदयाचा अुद्गार आहे.

चराचर सृष्टीचें अैक्य अनुभवणारे आपण आर्यसंतान अेकाच शब्दांत अनेक अर्थ पहातों. शारदा म्हणजे सरोवरांत विराजणाऱ्या कमळांची शोभा. शारदा म्हणजे शरत्-पूर्णिमा आणि दिवाळीची कान्ति. शारदा म्हणजे यौवनसहज व्रीडा. शारदा म्हणजे कृपिलक्ष्मी, शारदा म्हणजे साहित्य-सरिता, शारदा म्हणजे ब्रह्मविद्या, चिच्छक्ति. शारदा म्हणजे विश्वसमाधि. अशी ही आपली माता आहे, आपण शारदेचीं लेकरें आहोंत. केवढी धन्यता ! केवढी स्पृहणीय पदवी ! केवढा अधिकार ! आणि त्याचबरोबर केवढी मोठी दीक्षा !

शारदेच्या स्तन्याचा ज्या ओठांना स्पर्श झाला ते ओठ अपवित्र वाणी

अुच्चारणार नाहींत, निर्बलतेचे शब्द काढणार नाहींत, द्वेष अुद्गारणार नाहींत, पापाला शृंगारणार नाहींत, पौरुषाचा वध करणार नाहींत, आणि मुग्ध जनांना फसविणार नाहींत.

शारदेच्या मंदिरांत सर्वोच्च कला असेल, कलेच्या नांवानें विचरणारी विलासिता असणार नाहीं. शारदेच्या भवनांत प्रेमाचें वातावरण असेल, केवळ सौंदर्याचें मोहन असणार नाहीं. शारदेच्या अुपवनांत प्राणाचें स्फुरण असेल, विरहाचे वा निराशेचे निःश्वास असणार नाहींत. शारदेच्या लताकुंजांत विश्वप्रेमाचें संगीत असेल, अेकमेकांच्या अनुनयाचे वेडपट कलकूजित असणार नाहीं. शारदेच्या विहारांत स्वतंत्रतेचीं धीरोदात्त पावलें असतील, अुद्देशविहीन आणि स्खलनशील पदक्रम असणार नाहींत. शारदेच्या पीठांत ब्रह्मसाचा प्रवाह असेल, विषयरसाचा अुन्माद असणार नाहीं.

माते शारदे ! हृदयांत अखंड तुझें स्मरण राहील असा आशीर्वाद आम्हांला दे, आम्ही अधिकारी होअूं तेव्हां तुझें दर्शन आम्हांला घडीव. आमचें ध्यान जर अविचल राहिलें, आमची भक्ति अेकाग्र आणि अुत्कट झाली तर आम्हांला तुझी दीक्षा दे, आणि तुझ्या सेवेला पात्र झाल्यानंतर तुझ्या सेवेचीच अेकमात्र गोडी आमच्यांत राहील अवढी भिक्षा आम्हांला घाल. तुला कोटिशः नमन असो.

या देवी सर्व भूतेषु शरद्धारूपेण संस्थिता ।
नमस्तस्यै नमस्तस्यै नमस्तस्यै नमो नमः ॥

आक्टोबर १९२४.

# सरस्वतिपूजन

**आश्विन शु० ८, ९ — २ दिवस**

अष्टमी आणि नवमी हे दोन दिवस हा अुत्सव चालावा. अेक दिवस पुस्तकालयांतील ग्रंथ साफसुफ करून व्यवस्थित लावून ठेवणें, संस्थेचीं तशींच आपलीं खाजगी पुस्तकें ढिलीं झालीं असलीं तर तीं बांधणें, अशासारख्या कामांत घालवावा. शारदामंदिर ( पुस्तकालय ) व्यवस्थित रीतीनें लावल्यानंतर तें शृंगारावें, आणि तेथें शारदामातेची पूजा म्हणून संगीताची अेक बैठक करावी.

दुसरा दिवस फक्त चित्रकलेसाठीं ठेवलेला असावा. या दिवशीं कागदांच्या किंवा दुसऱ्या पदार्थांच्या निरनिराळ्या वस्तू तयार कराव्या, पाटावर रांगोळ्या काढाव्या. शक्य तर धार्मिक किंवा अितर उपयोगी पुस्तकांचें दान करावें.

( आश्विन शु. १० )

## १ सीमोल्लंघनपर्व

आग्रा येथें मोगल काळच्या ज्या अिमारती आहेत त्यांच्यांत विशेषता ही आहे कीं त्यांचा तळचा मजला लाल दगडाचा आणि वरच पांढऱ्या दगडाचा असतो. लाल दगडाचें काम जहांगीरच्या वेळचें आणि पांढऱ्या दगडाचें शाहजहानच्या वेळचें. प्रत्येक अिमारतींत असा कालानुक्रमाचा अितिहास वर्णभेदानें मूर्तिमंत दिसून येतो. कोणत्याहि जुन्या मोठ्या शहरांत जुनी वस्ती आणि नवी वस्ती जवळजवळ असलेली दिसून येते; किंवा वस्तीचे थरावर थर जमलेलेहि दृष्टीस पडतात. भाषांतील म्हणींसुद्धां भिन्नभिन्न काळांचा अितिहास सामावलेला असतो. आपण घरांत जमिनीवर ज्या लाद्या घालतो त्या सबंध अेक दगड असल्यासारख्या दिसतात, पण त्यांतसुद्धां प्रत्येक थरांत कितीअेक वर्षांचें अंतर असतें. नदीच्या कांठीं दरवर्षी चिकणमातीचा जो थर अेकावर अेक सांचतो त्याचाच शेवटीं पृथ्वीच्या भट्टींत अेक दगड बनतो.

दसऱ्याचा सण हासुद्धां अेकच सण असूनहि भिन्नकालीन भिन्नभिन्न अशा थरांचा बनलेला आहे. दसऱ्याच्या सणाशीं असंख्य युगांतील असंख्य प्रकारच्या आर्य पुरुषार्थांचा विजय जोडला गेला आहे.

माणसामाणसांमधील लढाअी जितकी महत्त्वाची आहे तितकीच किंवा त्याहून जास्त महत्त्वाची लढाअी मनुष्य आणि निसर्ग यांच्यामधील आहे. मनुष्यप्राण्याचा निसर्गावरील मोठ्यांत मोठा विजय म्हणजे शेती. नांगरलेल्या जमिनींत नअू प्रकारचें धान्य पेरून, कृत्रिम जलाचें सिंचन करून त्यांतून आपल्या निर्वाहापुरतें आणि पुढच्या संग्रहापुरतें धान्य ज्या दिवशीं मनुष्य मिळवूं शकला तो दिवस मनुष्याला महान् विजयाचा होता. कारण त्यानंतरच स्थिरतामूलक संस्कृति जन्माला

आली. त्या दिवसाचें स्मरण निरंतर ताजें ठेवणें हें कृषिप्रधान आर्यलोकांचें प्रथम कर्तव्य होतें.

विसावें शतक हें भौतिक आणि यांत्रिक शोधांचें शतक समजण्यांत येतें, आणि तें यथायोग्य आहे. पण मनुष्यप्राण्याच्या अस्तित्वासाठीं आणि संस्कृतीसाठीं जे महान् शोध कारणरूप झाले आहेत ते सर्व शोध आद्ययुगांतच झाले आहेत. जमीन कसण्याची कला, सूत कातण्याची कला, अग्नि पेटविण्याची कला, आणि मातीमधून पक्का घडा घडविण्याची कला–या चार कला मानवीसंस्कृतीच्या आधारस्तंभरूप आहेत. या चारी कलांचा अुपयोग करून विजयादशमीच्या दिवशीं आपण कृषिमहोत्सव निर्माण केला आहे.

लहानपणच्या माझ्या आठवणींत राहिलेला पहिला नवरात्राचा अुत्सव अजून मला स्मरतो. प्रतिपदेच्या दिवशीं शहराबाहेर जाअून शेतांमधून सर्वांत चांगली स्वच्छ काळीभोर माती माझे बंधु घेअून आले. मी स्वतः नअू धान्यांची यादी घेअून त्यांतलीं घरांत जीं मिळालीं नाहींत तीं माझ्या आजोबांच्या येथून घेअून आलों. माझ्या आजीनें लहानशा धनुष्यानें रू पिंजून त्याची १६ अंगुळांची अेक वात तयार केली. माझ्या आअीनें सूत कांतून (चरख्यावर नव्हे, तांब्यावर) त्या सुताच्या अेक हजार लहान लहान वाती बनविल्या. बाजारांतून नारळ आणि पंच-रत्न मी घेअून आलों. पंचरत्नांत सोनें, मोती, हिरा, प्रवाळ आणि पाच किंवा माणिक हीं होतीं. या पंचरत्नाचे तुकडे फारच लहान होते. माझ्या भाचीनें बागेंतून फुलें आणि तऱ्हतऱ्हेचीं पानें गोळा केलीं. वडिलांनीं स्नान करून देवघरांत गाअीच्या शेणानें सारविलेल्या जमिनीवर ती काळी माती पसरून तिचा सुंदर चौरस आकार बनविला. हें आमचें शेत. त्याच्या मधोमध अेक तांब्या ठेवून दिला. या तांब्यांत पाणी भरलेलें होतें. आंत अेक सबंध सुपारी, दक्षिणा, पंचरत्न अित्यादि वस्तू टाकल्या होत्या. वर आंब्याच्या झाडाची अेक लहानशी पांच पानांची डहाळी ठेवून तिच्यावर अेक नारळ ठेवला होता. सुंदर घाटाच्या तांब्यांतून बाहेर पडणारीं आंब्याचीं हिरवींगार पांच पानें आणि त्यांच्यावर शिखरासारखा दिसणारा नारळाचा आकार पाहून आम्ही खुष खुष झालों. पूजेची तयारी झाली म्हणतांना शेतांत नअू धान्यें पेरण्यांत आलीं. त्यांच्यावर पाणी शिंपडण्यांत आलें. मध्यें ठेवलेल्या घटाची चंदन,

केशर आणि कुंकू यांनीं पूजा करण्यांत आली. या घटावर अेक पुष्पमाळा चढवि ण्यांत आली. यथाविधि सांग षोडशोपचार पूजा झाली. ९६ अंगुळांच्या वातीचा दिवा लावण्यांत आला. मग आरती झाली. आणि घरांत सवेजण म्हणूं लागले कीं आज आमच्या येथें नवरात्राची घटस्थापना झाली आहे. तो नंदादीप नअू दिवस-पर्यंत अखंड तेवत ठेवायचा होता. मध्येंच विझला तर महा अशुभ. दुसऱ्या दिवशीं पूजेंत अेकाअैवजीं दोन माळा घालण्यांत आल्या. तिसऱ्या दिवशीं तीन, अशा माळा वाढत गेल्या. वर माळा वाढल्या आणि खालच्या शेतांतून अंकुर बाहेर फुटले. कित्येक अंकुर तर आपल्या दळांची छत्री करूनच बाहेर पडले होते. आम्हांला रोज पक्वान्न मिळे, पण वडिल मात्र अेकच वेळ जेवीत आणि सबंध दिवस सोवळें नेसून नंदादीप संभाळीत. वात खुंटूं नये, तेल तुटूं नये आणि दिवा विझूं नये यासाठीं काळजी घ्यावी लागे. रात्रींसुद्धां दोन चार वेळां अुठून तेल घालणें, वर सांचलेली काजळी पुष्कळ काळजीपूर्वक झाडून टाकणें वगैरे कामें त्यांना करावीं लागत.

नअू धान्यांचे अंकुर पुरते फुटून बाहेर पडले त्या वेळची शेताची शोभा अवर्णनीय होती. कित्येक धान्यें लवकर अुगवलीं, कित्येक अुशीरां. लवकरचीं कोणतीं आणि उशीराचीं कोणतीं हें मी बरोबर लक्षांत ठेवी. सारे अंकुर पांढरे होते, कारण नवरात्राचें हें ' शेत ' घरांत होतें, आणि अुन्हाशिवाय त्यांना हिरवा रंग कसा येणार ? मग वडिल शेतावर हळदीचें पाणी शिंपडूं लागले. मी विचारलें, "हळदीचं पाणी कां शिंपडायचं ? " " हें धान्य अुगवलं आहे ना तें सोन्यासारखं दिसावं म्हणून. "

सातव्या दिवशीं सरस्वतीचें आवाहन झालें. घरांत जेवढ्या म्हणून धार्मिक आणि संस्कृत पोथ्या होत्या त्या साऱ्या अेका रंगीत पाटावर ठेवून आम्ही त्यांची पूजा केली. आम्हांला शिकण्याची सुटी मिळाली. याला अनध्याय म्हणतात. सरस्वतीचें आवाहन, पूजन आणि विसर्जन अेवढें तीन दिवसांत झालें. नवव्या दिवशीं खंडपूजा झाली. खंडपूजा म्हणजे शस्त्रास्त्रांची पूजा. या दिवशीं हत्तीघोड्यांसारख्या युद्धोपयोगी पशूंचीसुद्धां पूजा करण्यांत येतें. अशा रीतीनें, 'नवरात्र संपलें,' आणि दहाव्या दिवशीं, ' दसरा अुजाडला.' दसऱ्याच्या दिवशीं होम, बलिदान आणि सीमोल्लंघन हे मुख्य विधी होते. विद्यारंभाचाहि तो दिवस होता.

विजयादशमीच्या सणांत चातुर्वर्ण्य अेकत्र झालेलें दिसतें. ब्राह्मणांचे सरस्वतीपूजन आणि विद्यारंभ; क्षत्रियांचें शस्त्रपूजन, अश्वपूजन आणि सीमोल्लंघन; वैश्यांची शेती; हे तीन्ही या सणांत अेकत्र होतात. आणि जेथें अितकी मोठी प्रवृत्ति चालली असेल तेथें शूद्रांची परिचर्या समाविष्ट असणारच. खेड्यांतले लोक नवरात्रांतील धान्याचे सोन्यासारखे तुरे तोडून पागोट्यांत खोचून देतात आणि सुंदर पोषाख करून वाजत गाजत सीमोल्लंघन करायला निघतात तेव्हां जणूं काय साऱ्या देशाचें पौरुषच पराक्रम दाखविण्यासाठीं बाहेर पडलें असावें असें दृश्य दिसतें.

दसऱ्याचा अुत्सव हा जसा कृषिप्रधान आहे तसा तो क्षात्रमहोत्सवहि आहे. भाडोत्री शिपायांना कोंबड्यांप्रमाणें झुंजविण्याची पद्धति नव्हती त्याकाळीं क्षात्रतेज आणि राजतेज खेडूतांमध्येंच पोसलें जाअी. खेडूत म्हणजे क्षेत्रपति–क्षत्रिय. वर्षभर भूमिमातेची जो सेवा करतो तोच प्रसंग पडला तर, तिचें रक्षण करायलाहि बाहेर पडतो. नदी, नाले, डोंगर, टेकड्या यांच्यांशीं ज्याचा रात्रंदिवस संबंध असतो, घोडा, बैल यांसारख्या जनावरांना जो तयार करूं शकतो, अनेक मजुरांना जो अुपजीविका देअूं शकतो आणि सगळ्या समाजाला जो खाअूं घालतो त्याच्यामध्यें सेनापतीचे आणि राजत्वाचे सर्व गुण आले तर त्यांत आश्चर्य तें काय? राजा म्हणजेच खेडूत आणि खेडूत म्हणजेच राजा.

अशी स्थिति असल्यामुळें कृषीचा सण हा क्षात्र सण झाला यांत अैतिहासिक औचित्य पूर्णपणें आहे. क्षत्रियांचें मुख्य कर्तव्य म्हणजे स्वदेशरक्षणच आहे. पण पुष्कळ वेळां शत्रूनें आपल्या देशांत घुसून देशाचें वाटोळें करण्यापूर्वीच त्याचा दुष्ट हेतु समजून स्वतःच सीमोल्लंघन करून–स्वतःची शींव म्हणजे सरहद्द ओलांडून शत्रूच्याच देशांत लढाअी घेअून जाणें हें शहाणपणाचें आणि वीरोचित असतें.

थोडा विचार करतां आढळून येअील कीं या सीमोल्लंघनामागें साम्राज्यवृत्ति आहे. आपली सरहद्द ओलांडून दुसरा देश जिंकणें, तेथील धनधान्य लुटून आणणें यांत आत्मरक्षणापेक्षां महत्त्वाकांक्षा अधिक आहे. अशा रीतीनें लुटून आणलेलें सोनें पराक्रमी पुरुष स्वतःजवळच ठेवतील तर वर्तमानयुगांतील क्षत्रप्रकोप- (Militarism) शीं विट्प्रकोप (Industrialism) मिसळण्याची भयंकर स्थिति

ओढवेल. प्रभुत्व आणि धनित्व अेकत्र झालें कीं तेथें सैतानाला निराळें आमंत्रण करण्याची जरूर राहात नाहीं. अेवढ्यासाठींच दसऱ्या दिवशीं लुटून आणलेलें सोनें सर्व स्वकीयांत वांटून टाकणें हा त्या दिवसाचा महत्त्वाचा धार्मिक विधि ठरविलेला आहे. X

सुवर्ण वांटण्याच्या या रिवाजाचा संबंध रघुवंशांतील रघुराजाशीं जोडलेला आहे.

रघुराजानें विश्वजित् यज्ञ केला. समुद्रवलयांकित पृथ्वी जिंकल्यानंतर सर्वस्व दान करून टाकणें याचें नांव विश्वजित् यज्ञ. असा विश्वजित् यज्ञ रघुराजानें समाप्त केला आणि नंतर त्याच्याकडे वरतंतु ॠषीचा शिष्य विद्वान् तेजस्वी कौत्स येअून पोचला. कौत्सानें गुरूजवळून चौदाहि विद्या ग्रहण केल्या होत्या. त्याची दक्षिणा म्हणून चौदा कोटी सुवर्णमुद्रा गुरूला देण्याची त्याची धारणा होती. पण सर्वस्वाचें दान केल्यानंतर राहिलेल्या मातीच्या भांड्यानेंच राजाला आतिथ्य करतांना पाहून कौत्सानें राजाजवळ कांहींहि मागण्याचा विचार सोडून दिला. राजाला आशीर्वाद देअून तो जाअूं लागला. रघूनें आग्रहपूर्वक त्याला ठेवून घेतलें आणि दुसऱ्या दिवशीं स्वर्गावर स्वारी करून अिंद्र आणि कुबेर यांच्याकडून धन आणवि-

X'क्षत्रप्रकोप' आणि, 'विट्प्रकोप' या दोन नवीन संज्ञांची सार्थकता मला सिद्ध केली पाहिजे. चातुर्वर्ण्याचें समतोलन वा सामंजस्य ही तर समाजशरीराची स्वाभाविक स्थिति आहे. समाजासाठीं या चारी वर्णांची आवश्यकता सर्वमान्य झालेली आहे. व्यक्तीच्या शरीरांत वात, पित्त आणि कफ हे तीन धातू जसे प्रमाणशीर असतील तरच शरीर निरोगी राहातें तसें समाजशरीरांत चातुर्वर्ण्य प्रमाणशीर असलें तरच समाजशरीर निरोगी राहील. शरीरांत पित्ताचें प्राबल्य झालें तर त्याला पित्तप्रकोप म्हणतात. पित्तप्रकोपानें सगळें शरीर विघडून जातें. त्याचप्रमाणें वातप्रकोप आणि कफप्रकोप झाला असतां होतें. समाजशरीरांत क्षात्रवर्गाचा अतिरेक झाला किंवा प्राबल्य माजलें तर त्या स्थितीला क्षत्रप्रकोप म्हणणें हेंच योग्य आहे. याचप्रमाणें विट्प्रकोप किंवा वैश्यप्रकोपाविषयीं समजावें. शरीराचा नाश व्हायची वेळ आली कीं तीन्ही धातूंचा प्रकोप होतो. याला त्रिदोष म्हणतात. युरोपांत आज क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र या तीन्ही वर्णांचा अेकाचवेळी प्रकोप झालेला स्पष्ट दिसत आहे आणि तेथील ब्राह्मण या तीन्ही वर्गांचे किंकर बनले आहेत!

ण्याची व्यवस्था केली. रघुराजा हा चक्रवर्ति होता म्हणून अिंद्र आणि कुबेर हेहि त्याचे मांडलिक होते. ब्राह्मणाला दान देण्यासाठीं त्यांच्याकडून खंडणी घेण्यांत संकोच कसला? रघुराजाच्या स्वारीची गोष्ट अैकतांच देव भ्याले. त्यांनीं अेका शमीच्या झाडावर सुवर्णमुद्रांची वृष्टि केली. रघुराजाला सकाळीं अुठतांच दिसलें कीं पाहिजे होतें तेवढें सोनें आलें. कौत्साला त्यानें तो ढीग देअून टाकला. कौत्स चौदा कोटींहून अधिक घेअीना. आणि राजा दान म्हणून दिलेलें बाकीचें धन परत ठेवून घेअीना. शेवटीं नगरवासी लोकांच्याकडून त्यानें तें धन लुटविलें. तो दिवस आश्विन शुक्ल दशमीचा होता, म्हणूनच आजहि लोक दसऱ्याच्या दिवशीं शमीचें पूजन करून त्याचीं पानें सोनें समजून लुटतात आणि अेकमेकाला देतात. कित्येक लोक शमीखालची माती सुवर्ण समजून घेअून जातात.

शमीचें पूजन हें प्राचीन आहे. शमीच्या झाडांत अृषींचें तपस्तेज आहे असें मानतात. प्राचीनकाळीं शमीचे तुकडे अेकमेकांवर घांसून अग्नि अुत्पन्न करीत असत. शमीच्या समिधा आहुतीच्या वेळीं अुपयोगी पडतात. पांडव जेव्हां अज्ञात-वासांत राहायला गेले तेव्हां त्यांनी आपलीं हत्यारें अेका शमीच्या झाडावर लपवून ठेवलीं होतीं आणि तेथें कोणी जाअूं नये म्हणून अेक हाडाचा सांपळा झाडाच्या खोडाला बांधून ठेवला होता!

रामचंद्रानीं रावणावर स्वारी केली ती विजयादशमीच्या मुहूर्तावर. आर्यांनीं–हिंदु लोकांनीं पुष्कळ वेळां विजयादशमीच्या मुहूर्तावरच स्वाऱ्या करून विजय मिळविला आहे. म्हणून विजयादशमी हा राष्ट्रीय विजयाचा मुहूर्त किंवा सण झाला आहे. मराठे व रजपूत याच मुहूर्तावर स्वराज्याची सीमा वाढविण्यासाठीं शत्रूच्या मुलखावर स्वारी करीत. शस्त्रास्त्रें सज्ज करून, हत्ती घोड्यांची स्वारी काढून सारा लवाजमा मिरवीत शहराबाहेर नेण्याची चाल आजसुद्धां आहे. तेथें शमीचें त्याचप्रमाणें अपराजिता देवीचें पूजन हा सीमोल्लंघनाचा मुख्य भाग असतो. ×

---

× महिषासुर नांवाच्या अेका प्रबळ दैत्यानें प्रलय मांडला होता. त्याच्याशीं जगदंबेनें नअू दिवस युद्ध करून विजयादशमीच्या दिवशीं त्याचा नाश केला अशी पुराणांत कथा आहे. म्हणूनच अपराजितेची पूजा करण्याची आणि महिषाचा म्हणजे रेड्याचा बळी देण्याची चाल पडली आहे.

शमीप्रमाणें अश्मंतक वृक्षांतहि शत्रूचा नाश करण्याचा गुण आहे असें समजतात. अश्मंतक म्हणजे आपट्याचें झाड. शमी न मिळाला तर या झाडाचें पूजन करतात. आपट्याच्या पानांचा आकार सोन्याच्या नाण्यासारखा गोल असतो आणि जोड कार्डासारखीं त्याचीं पानें जोडलेलीं असतात त्यामुळें तीं विशेष सुंदर दिसतात.

दसऱ्याच्या दिवसापर्यंत पावसाळा जवळ जवळ संपलेला असतो. शिवाजीचे मावळे शिपाअी दसऱ्यापर्यंत शेतीच्या चिंतेंतून मुक्त होत असत. शेतींत कांहीं करायचें अुरत नसे. अेकच कापणी करायची राहात असे. पण ती काय, घरच्या बायकामुलांना आणि म्हाताऱ्या माणसांनांहि सहज करतां येअी; तेव्हां सैन्य जमवून स्वराज्याची सीमा वाढविण्यासाठीं अगदीं जवळचा मुहूर्त दसऱ्याचाच होता; म्हणून महाराष्ट्रांत दसऱ्याचा सण अत्यंत लोकप्रिय होता आणि आहे.

विजयादशमीच्या अेका सणावर अनेक संस्कार, अनेक संस्करणें आणि तऱ्हतऱ्हेच्या समजुतींचे थर जमले आहेत असें आपण पाहिलें. कृषिमहोत्सव क्षात्र-महोत्सव झाला. सीमोल्लंघनाचा परिणाम दिग्विजयापर्यंत गेला. स्वसंरक्षणाबरोबरच सामाजिक प्रेमाचा आणि धनाचा विभाग करण्याची वृत्ति दसऱ्याशीं जोडली गेली. पण अेक अैतिहासिक घटना दसऱ्याशीं जोडण्याचें आपण विसरून गेलों आहों. आजच्या काळीं तीच विशेष महत्त्वाची आहे. दिग्विजयापेक्षां धर्मजय श्रेष्ठ आहे, बाह्य शत्रूला मारण्यापेक्षां हृदयस्थ षड्रिपूंना मारण्यांतच मोठा पुरुषार्थ आहे, नअू धान्यांची कापणी करण्यापेक्षां पुण्याची कापणी अधिक काळ टिकते, असा, अुपदेश सगळ्या जगाला देणाऱ्या मारजित् लोकजित् भगवान् बुद्धाचा जन्म विजया-दशमीच्या शुभमुहूर्तावरच झाला होता. पंचांगाप्रमाणें विजयादशमीच्या दिवशीं बुद्ध भगवानांचा जन्म झाला आणि वैशाखी पूर्णिमेला बुद्ध भगवानांना शांतिदायी अशा चार आर्य तत्त्वांचा आणि अष्टांगिक मार्गाचा बोध झाला हें आपण विसरूनच गेलों आहों. विष्णूचा चालू अवतार हा बुद्ध अवतार आहे. म्हणून विजया-दशमीचा सण हा भगवान् बुद्धांच्या मार विजयाचें स्मरण करून आपण साजरा केला पाहिजे.

आक्टोबर १९२२

## २ हा काय दसरा म्हणायचा ?

### शं नो अस्तु द्विपदे, शं चतुष्पदे ।—वेदवचन

[ द्विपदांचें कल्याण होवो, चतुष्पदांचें कल्याण होवो. ]

दोन पायांच्या आणि चार पायांच्या आपल्या मुलांना भूमिमातेनें सांगितलें, ' माझें गवत-धान्य तुमच्यासाठींच आहे. तेंच माझें दूध. जो पिअील तो पुष्ट होअील. '

दोन पायांचीं माणसें म्हणजे थोरले भाअू. चार पायांचीं जनावरें तीं धाकटीं भावंडें. मोठे धाकट्यांचा संभाळ करीत; धाकटे मोठ्यांच्या आज्ञेंत वागत. दोघांनींहि मेहेनत केली, आणि जिकडे तिकडे मलयजशीतला आणि सुजला पृथ्वी सुफला सस्यश्यामला झाली. सर्वत्र आनंद पसरला.

माणूस म्हणाला, ' चला, आपण वांटणी करून अुत्सव करूं या. ' पशू म्हणाले, ' होय, खरेंच, अुत्सव केलाच पाहिजे ! '

माणसानें धान्य घेतलें आणि पशु गवत चरूं लागले. अुत्सव सुरू झाला. पण जिह्वालौल्यानें धर्मबुद्धिभ्रष्ट झालेल्या माणसाच्या मनांत अेकदम कांहींतरी आलें. माणसानें पशूला ओढलें आणि त्याच्या मानेवर सुरी चालवीत म्हटलें, ' अुत्सवाचा हा अेक आवश्यक भाग आहे !! '

पृथ्वी कांपूं लागली, आकाश रडूं लागलें; दिशा गरजल्या ' हा काय अुत्सव म्हणायचा ? '

---

# दसरा

## आश्विन शु. १० — १ दिवस

वीरत्वाचा हा सण आहे. कुस्ती, गजग्राह (रस्सीखेच), दांडपट्टा वगैरे मर्दानी खेळ खेळण्याची चाल चालू ठेवण्यासारखी आहे. दसऱ्याच्या दिवशीं शहराबाहेर जाऊन तेथें सामाजिक अुत्सव केला पाहिजे. आपल्या कमाअींतून वांचवितां येतील तेवढे पैसे वांचवून दसऱ्याच्या प्रसंगीं ते चांगल्या कामाप्रीत्यर्थ दान करावे.

वर्षभरांत अेखादें महत्कृत्य करण्याचा संकल्प दसऱ्याच्या दिवशीं करावा. हा सीमोल्लंघनाचा दिवस आहे. त्या दिवशीं अेखादें पाअूल पुढें पडलें पाहिजे.

दसऱ्याच्या दिवशीं फक्त वाद्यांची बैठक ठेवावी. विद्यार्थी कवाअीत शिकले असतील तर तिचेंहि प्रदर्शन या दिवशीं करण्यासारखें आहे.

दसऱ्याची सुरुवात मातृपूजेंतून झाली आहे हें विसरतां कामा नये. देवीपूजेचें रहस्य या दिवशीं समजावून द्यावें.

------

## सार्वभौम धर्म : : २८

( आश्विन शु० १५ )

अुन्हाळ्यांतील असह्य तापानंतर जेव्हां वृष्टि होते तेव्हां सर्वत्र चिखलच चिखल होतो. शेवटीं सृष्टि जेव्हां तृप्त होते तेव्हांच हा चिखल दडपून किंवा सुकवून टाकून जमीन आणि जलाशय अनाविल ( स्वच्छ ) करण्याकडे तिचे लक्ष जातें.

महान् आपत्तीशीं झुंजतांना माणसाला धर्माधर्माचा फारसा विचार राहात नाहीं. हें पाहूनच शहाण्या माणसांनीं जुनी शिकवण दिली आहे कीं कोणत्याहि धर्माचा आसरा घेअून नड भागवावी आणि आपत्तींतून बचावल्यानंतर ' समर्थो धर्ममाचरेत्.'

स्वतंत्र, स्वायत्त झाल्यानंतर सुचणाऱ्या शांतीचा, समृद्धीचा आणि निर्मळ प्रसन्नतेचा जो सार्वभौम धर्म तोच शरद् होय.

हाच धर्म ज्यानें आपला निरंतरचा निरपवाद धर्म केला तोच धर्मराट् झाला. अुन्हाळ्यांतून आणि पावसाळ्यांतून सुरक्षितपणें जे बाहेर पडले आणि शरदाची प्रसन्नता पावले तेच जगले, तेच जिंकते झाले.

म्हणूनच अृषींनीं प्रार्थना केली आहे.

अजिताः स्याम शरदः शतम् ।

१९३५

---

## शरत्–पूर्णिमा

### आश्विन शु. १५ १ दिवस

ब्रह्मांड पुराणांत म्हटलें आहे कीं, शरत्पूर्णिमेच्या दिवशीं शहरांतील रस्ते स्वच्छ करून सुगंधी जलानें संमार्जित करावे, ठिकठिकाणीं फुलें पसरून द्यावीं, आणि छत्रें लावावीं. शरत्पूर्णिमा हा निसर्गाचें काव्य अनुभवण्याचा दिवस आहे. या

दिवशीं लक्ष्मी सर्वत्र फिरते. लक्ष्मी म्हणजे धनदौलत नव्हे; लक्ष्मी म्हणजे निसर्गाची शोभा, तारकांमध्यें विराजणाऱ्या चंद्राची शोभा आणि त्याच्या चांदण्याचा हृदयावर होणारा विलक्षण परिणाम. शरत्पूर्णिमा हा कलेचा दिवस आहे. या दिवशीं सुंदर प्रदर्शनें मांडावींत, नाना काव्यें रचावींत.

नवें पीक आलें असेल त्याचे पोहे तयार करून नारळाचें खोबरें मिसळून खावें. नारळ म्हणजे निसर्गाचें दूध; तें नाहीं मिळालें तर गोमातेचें दूध तर आहेच.

समाजसेवकांनीं नळराजा आणि युधिष्ठिर यांच्या गोष्टी लोकांना सांगून द्यूतक्रीडेचा या दिवशीं निषेध करावा. लहानथोर सर्वांनीं मिळून चांदण्यांत आट्या-पाट्या खेळाव्या. स्त्रियांनीं आणि मुलींनीं फेर धरावा. वृद्धांनीं आपल्या आयुष्यां-तील बोधरसिक प्रसंगांचें वर्णन करावें.

शक्य तर रात्रीं दोन वाजतां अुठून मध्यरात्रींच्या नीरव शांतींत ताऱ्यांचें दिव्य संगीत अैकावें. पावसाळ्यांतील मेघाच्छादित आकाशानंतर ही पहिलीवहिली निरभ्र, निर्मळ पूर्णिमा आहे. आणि ज्योतिःशास्त्रज्ञांच्या म्हणण्याप्रमाणें या दिवशीं चंद्र पृथ्वीच्या जास्तींत जास्त जवळ येतो.

वैदिक कर्मकांडावरील ज्यांचा विश्वास अुडून गेला आहे, त्यांनींहि वैदिक ब्राह्मणांना बोलावून त्यांच्याकडून मंत्रजागर करवावा. वेदमंत्रांचें शुद्ध, सुस्वर अुच्चारण आजकाल अैकायलाहि मिळत नाहीं. जुन्या संस्कृतीचा हा अवशेष खचित टिकविण्यासारखा आहे. या पूर्णिमेला गायनाची बैठक तर झालीच पाहिजे.

---

तरुण पिढी अल्पायुषी कां होत आहे या जिव्हाळ्याच्या प्रश्नाची चर्चा अेका काळीं महाराष्ट्रांत डॉ. भांडारकर आणि न्या. रानडे यांनीं मोठ्या आस्थेनें केली होती.

त्या काळाला पुष्कळ वर्षें लोटलीं. देशाची परिस्थिति बदलली. सामाजिक राहणींत प्रचंड क्रांति झाली आहे. बालविवाहावर खापर फोडण्याचे दिवस आतां राहिले नाहींत. ब्रिटिशांचें राज्यहि अस्ताला गेलें. तरीहि तरुण पिढीचें अकालीवार्धक्य आणि अल्पायुषित्व अजून दूर झालें नाहीं. बालसंगोपनशास्त्रांत पुष्कळच प्रगति झाली आहे. आहाराचें शास्त्रीय पृथक्करण करून चौरस आहार कोणता हेंहि ठरविण्यांत येत आहे. प्रत्येक श्रमिकाला जीवनवेतन मिळालेंच पाहिजे असा आग्रह राष्ट्रहितचिंतकांनीं धरला आहे. लहानमोठ्या म्युनिसिपालिटयांमार्फत गोशाळांची स्थापना करून राष्ट्रांतील अर्भकांना गाअीचें दूध मुबलक मिळावें अशा सूचना होअूं लागल्या आहेत. पडद्यांत राहिल्यामुळें स्त्रियांना पंडुरोग आणि क्षयरोग कसा होतो याचाहि अूहापोह त्या त्या समाजाच्या पुढाऱ्यांपर्यंत पोचूं लागला आहे. शरीराला ज्याप्रमाणें फुप्फुसें आवश्यक त्याप्रमाणें प्रत्येक शहराला क्रीडांगणें आणि सहलीचीं मैदानें आवश्यक आहेत हें नगरपित्यांना पटूं लागलें आहे. खेळ खेळणें हा शाळेंतील विद्यार्थ्यांचा अनाडपणा नसून राष्ट्र-संघटनेचें तें अेक आवश्यक अंग आहे असें शिक्षणशास्त्र आतां कबूल करूं लागलें आहे. तळणीचे किंवा गरम मसाल्याचे चमचमीत पदार्थ खाणें किंवा गोडीच्या लोभानें शिळी, कुजकट मिठाअी खाणें हें किती चुकीचें आहे हें आतां सामान्य जनतेलाहि हळूंहळूं समजूं लागलें आहे. म्युनिसिपालिटयांदेखील गृहरचनेवर देखरेख ठेवून आणि आहाराचें नियंत्रण करून जनतेचें आरोग्य सुधारण्याचा प्रयत्न करीत असतात.

व्यक्तींची चिंता व्यक्तीला जेव्हां असह्य होते तेव्हां ती समाजानें वाहिली पाहिजे हा सिद्धांत झपाट्यानें रूढ होअूं लागला आहे आणि म्हणून गोरगरिबांना

आणि मजूर-कारागिरांना निश्चितपणें जगतां यावें यासाठीं निरनिराळ्या योजना सरकाराच्या मार्फत अंमलांत आणण्याचें घाटूं लागलें आहे. आणि तें साध्य व्हावें म्हणून समाजसत्ता स्थापन झाली पाहिजे असेंहि आतां राष्ट्रनेत्यांना वाटूं लागलें आहे.

अितक्या विविध दिशांनीं प्रयत्न होअूं लागल्यानंतर आपल्या समाजांतील अकालिक मरणप्रमाण कमी झालेंच पाहिजे. पण दीर्घायुष्याला बाधक अशीं नवीन नवीन तत्त्वेंहि येअूं लागलीं आहेत. नाटकें, सिनेमा आणि जागरणें, विलासाचे निरनिराळे प्रकार आणि द्वेष, मत्सर व चढाओढ त्यामुळें उत्पन्न होणारीं महायुद्धें-यांचें प्रमाण अितकें कांहीं वाढलें आहे कीं मनुष्यजातच निःशेष होते कीं काय अशी शंका जगांतील जाणत्या लोकांना येअूं लागली आहे.

तेव्हां भांडारकर आणि रानडे यांनीं अुठविलेला प्रश्न आतां फारच मोठ्या पायावर, व्यापक दृष्टीनें आमूलाग्र संशोधन करून धसाला लावला पाहिजे. पुराणांनी ठरवून टाकलें होतें कीं कलियुगांत मनुष्याची अुंचीहि कमी होणार आणि आयुष्यहि कमी होणार. जगाचा अनुभव याच्या अुलट आहे. ज्या समाजांतील राहाणी व्यवस्थित आणि निश्चित आहे त्या समाजांतील संततीची अुंची या कलिकाळांतहि पिढी-दरपिढी वाढतच चालली आहे. आणि घटत गेलेलें आयुष्यमान आतां हळूंहळूं वाढूं लागलें आहे. मनुष्याचें आयुष्य दैवाधीन नसून प्रयत्नाधीन आहे हें आतां पूर्णपणें सिद्ध झालें आहे. म्हणून या सर्व गोष्टींचा अुहापोह धर्मशास्त्राप्रमाणें नव्हे तर जीवनशास्त्राप्रमाणें करून त्याचे सिद्धांत धर्मशास्त्राला अर्पण करण्याचे दिवस आले आहेत.

ता. २५-२-४७

## कार्यक्रम

वरील विवेचनांतच वैयक्तिक आणि सामुदायिक कार्यक्रम सहजासहजी येअून जातो.

# दिवाळी : ३०

## ( आश्विन व. १४ आणि अमावास्या )

### १ बळींचें राज्य.

बळिराजानें दानाचें व्रत घेतलें होतें. मागणारा जें कांहीं मागेल तें बळिराजा त्याला देअी. बळिराज्यांत जीवहिंसा, सुरापान, अगम्यागमन, चोरी आणि विश्वासघात या पंचमहापापांचें नांवहि अैकूं येत नव्हतें. सर्वत्र दया, दान आणि अुत्सव चालत होते. बळीनें शेवटीं वामनमूर्ति श्रीकृष्णाला सर्वस्व अर्पण केलें. बळीच्या या दानशौर्याचें स्मारक म्हणून श्रीविष्णूंनीं बळीच्या नांवानें तीन अहोरात्रींचा सण ठरविला. तीच आपली दिवाळी. बळीच्या राज्यांत आळस, मलिनता, रोग आणि दारिद्र्य यांचा अभाव होता. बळीच्या राज्यांत किंवा लोकांच्या हृदयांत अंधकार नव्हता. सर्वजण प्रेमानें राहात असत. द्वेषाला, मत्सराला किंवा असूयेला कांहीं कारणच नव्हतें. बळींचें राज्य अितकें कांहीं लोककल्याणकारी होतें कीं प्रत्यक्ष श्रीविष्णु त्याचे द्वारपाळ होअून राहिले होते. म्हणूनच, बळिराजाच्या स्मारकाप्रीत्यर्थ या सणापूर्वी लोकांनीं चिखल, दलदल आणि घाण काढून टाकावी, जेथें जेथें अंधार असेल तेथें तेथें दीपावलीची शोभा करावी, लोकांचे प्राण हरण करणाऱ्या यमराजाचें तर्पण करावें, पूर्वजांचें स्मरण करावें, मिष्टान्न भक्षण करावें, आणि सुगंधी धूप, दीप, पुष्पपत्रांनीं सुंदरता अेके ठिकाणीं आणावी असें ठरविण्यांत आलें आहे. या दिवसांत संध्याकाळचीं शोभा अितकी कांहीं मनोहारी असते कीं यक्ष, गंधर्व, किन्नर, औषधि, पिशाच, मंत्र आणि मणि हे सारेच अुत्सवाचा नाच करीत असतात. बळिराजाचें स्मरण करून लोक चित्रविचित्र रंगांच्या रांगोळ्या काढतात, पांढरे शुभ्र तांदूळ लावून तऱ्हतऱ्हेचीं सुंदर चित्रें बनवितात, गाअी बैल वगैरे गृह्य पशूंना शृंगारून त्यांची मिरवणूक काढतात, श्रेष्ठ आणि कनिष्ठ सगळे अेक होअून यष्टिकाकर्षणाचा खेळ खेळतात. यष्टिकाकर्षण हा युरोपीयन लोकांचा दोर खेंचण्याच्या ' टग् ऑफ् वॉर ' सारखा अेक खेळ आहे. यालाच आपण ' गजग्राह ' असें नवें

नांव दिलें आहे. पूर्वीच्या काळीं राजे लोक दीपावलीच्या दिवशीं आपल्या राजधानींतील सर्व मुलांना सार्वजनिक आमंत्रण देत असत आणि त्यांचे खेळ करवीत असत.

सुगंधी द्रव्याचें मर्दन करून आंघोळ करणें आणि नानातऱ्हेचे दिवे रांगेनें लावणें व मित्रांबरोबर मिष्टान्नाचें भोजन करणें हा दिवाळीचा मुख्य भाग आहे. बळिराज्यांत प्रवेश करावयाचा असेल तर द्वेष, मत्सर, असूया, अपमान वगैरे सर्व विसरून जाऊन सर्वांशीं अेकरूप होऊन जावयाचें आणि अशा रीतीनें निष्पाप होऊन नव्या वर्षांत प्रवेश करावयाचा हा आपला प्राचीन रिवाज आहे.

याच दिवशीं सत्यभामेनें श्रीकृष्णाच्या मदतीनें नरकासुराचा नाश केला होता आणि सोळा हजार राजकन्यांना मुक्त केलें होतें.

दीपावलीच्या अुत्सवांत स्त्रियांची अुपेक्षा केलेली नाहीं. स्त्री–पुरुषांमधील सर्व संबंधांत भावाबहिणीचा संबंध शुद्ध सात्विक प्रेमाच्या आणि समानतेच्या अुल्लासाचा असतो. पतिपत्नींचा संबंध अथवा आओमुलांचा संबंध अितका व्यापक आणि अितका सात्विक अुल्लासयुक्त असत नाहीं.

धनत्रयोदशीपासून भाअूबीजेपर्यंतच्या पांची दिवसांशीं यमराजाचें नांव जोडलेलें आहे. त्याचा काय बरें अुद्देश असेल ?

अिंद्रप्रस्थाचा राजा हंस मृगया करीत फिरत होता. त्याचें हैम नांवाच्या अेका लहानशा राजानें आतिथ्य केलें. त्याच दिवशीं हैमाच्या येथें पुत्रोत्सव होता. राजा आनंदोत्सव करतो आहे अितक्यांत भवितव्यतेनें येअून सांगितलें कीं विवाहानंतर चौथ्याच दिवशीं हा पुत्र सर्पदंशानें मरेल. हंसराजानें या पुत्राला वांचविण्याचा निश्चय केला, यमुनेच्या अेका डोहांत अेक सुरक्षित घर बांधलें आणि तेथें हैम राजाला राहाण्यासाठीं बोलावलें. सोळा वर्षांनंतर राजपुत्राचा विवाह झाला. चौथ्याच दिवशीं अशा दुर्गम स्थानीं सुद्धां अेक सर्प प्रगट झाला आणि राजपुत्र मेला. आनंदाची घटिका शोकानें भरून गेली. क्रूर यमदूतांनासुद्धां या करुण प्रसंगीं दया आली आणि त्यांनीं यमराजाजवळ मागून घेतलें कीं दीपावलीच्या पांच दिवसांत जे दीपोत्सव करतील त्यांच्यावर असा कठीण प्रसंग न यावा'.

ही झाली धनत्रयोदशीची कथा. नरकचतुर्दशीदिवशीं तर यमराजाचें आणि भीष्माचें तर्पण मुद्दाम सांगितलें आहे. दिवाळी हा अमावास्येचा दिवस. त्यादिवशीं यमलोकवासी पितरांचें पूजन आणि पार्वण श्राद्ध करावेंच लागतें. पाडव्याच्या दिवशीं यमराजासंबंधींची कांहीं कथा सांगितलेली नाहीं, पण असें समजायला हरकत नाहीं कीं यमराजसुद्धां त्यादिवशीं नवें वहीखातें अुघडत असतील. भाअूबीजेच्या दिवशीं यमराज आपली बहिण जी यमुना तिच्या घरीं जेवायला जातात. दीपावलीच्या स्वच्छंदाबरोबरच यमराजाचें स्मरण करून देण्यांत अुत्सवकारांचा अुद्देश कांहींहि असला तरी त्याचा परिणाम फार चांगला होत असला पाहिजे यांत शंका नाहीं. ज्यानें अुत्सवांतहि संयम राखला तोच यमराजाच्या पाशांतून मुक्त राहूं शकेल.

नवेंबर १९२२

## २ दिवाळी

दिवाणखान्यांत अेखादी सुंदर वस्तु ठेवण्याची चाल प्रत्येक घरांत असते. बाहेरचा कोणीहि मनुष्य आला म्हणजे त्याची नजर तिच्याकडे जाते आणि त्याच्या तोंडून अुद्गार निघतो, ‘ अहाहा, किती सुंदर वस्तु ! कुठून बरं आणली ही तुम्ही ? ’ पण अजबघरांत ( म्युझियममध्यें ) तर जिकडे पहावें तिकडे सुंदरच सुंदर वस्तू असतात ; बघून माणूस खुष खुष होअून जातो ; पण त्याचबरोबर तो तितकाच गोंधळूनहि जातो ! यांतलें काय पहावें नि काय पाहूं नये असें त्याला होतें !

आपली दिवाळी ही सणांचें असेंच अेक अजबघर आहे किंवा सर्व सणांचें तें स्नेहसंमेलन आहे म्हटलें तरी चालेल. दिवाळीचा सण पांच दिवसांचा मानला गेला आहे. पण खरें पहातां थेट नवरात्रापासून त्याची सुरुवात होते आणि भाअूबीजेच्या भेटींत त्याचा आनंद कळसाला पोचतो.

शास्त्रांत प्रत्येक सणाचें माहात्म्य आणि कथा दिलेली असते. दिवाळीविषयीं अितक्या कांहीं कथा आहेत कीं ‘ दिवाळी माहात्म्य ’ लिहूं म्हटलें तर अेक मोठें

पुराणच होईल. धनत्रयोदशीची कथा वेगळी, नरकचतुर्दशीची वेगळी, अमावास्येची तर अेक खास कथा आहे. त्यानंतर नव्या वर्षाचा प्रारंभ होतो आणि बीजेच्या दिवशीं भाअू वहिणीच्या घरचा पाहुणा बनतो. दिवाळी हा गृहस्थाश्रमी सण आहे, जनतेचा सण आहे. नारळी पूर्णिमेच्या दिवशीं धर्म आणि शास्त्र प्रधान असतें; दसऱ्याच्या दिवशीं युद्ध आणि शस्त्र प्रधान होतें; दिवाळीच्या दिवशीं लक्ष्मी आणि धन प्रधानपद घेतें; आणि होळी म्हणजे खेळाचा आणि रंगरागाचा सण. जसे माणसांत चार वर्ण तसे सणांतहि असे चार वर्ण पडले आहेत!

पूर्वीच्या काळीं नारळी पूर्णिमेच्या दिवशीं आपले लोक जलपर्यटनाला निघत आणि समुद्रापलिकडच्या देशांच्या प्रवासाला जात. दसऱ्याच्या दिवशीं राजे आणि योद्धे आपल्या सरहद्दीची शीव ओलांडून शत्रूवर चढाअी करायला निघत. आणि दिवाळीच्या दिवशीं राजे आणि व्यापारी दोघे स्वदेशीं येअून कौटुंबिक सुखाचा लाभ घेत.

पुराणांत कथा आहे कीं नरकासुर नांवाचा अेक पराक्रमी राजा प्राग्ज्योतिष प्रांतांत राज्य करीत होता. प्राग्ज्योतिष म्हणजे आजचा भूतानच्या दक्षिणेकडील मुलुख. नरकासुर दुसऱ्या राजांशीं लढत असे तें घटकाभर सहन करतां येअील, पण त्या दुष्टानें स्त्रियांनाहि पीडा द्यायला सुरुवात केली. त्याच्या कैदखान्यांत सोळा हजार राजकन्या होत्या. श्रीकृष्णांनीं विचार केला कीं ही स्थिति आपली नामुष्की करणारी आहे. नरकासुराचा नाश केल्यावांचून आतां गत्यंतर नाहीं. सत्यभामा म्हणाली, 'स्त्रियांचा अुद्धार करण्याकरितां तुम्ही चालला, मग मी कां घरा राहूं? नरकासुराशीं मीच लढेन. तुम्ही मदत म्हणून राहा हवे तर.'

श्रीकृष्णांनी कबूल केलें. त्या दिवशीं रथांत सत्यभामा पुढें बसली होती; श्रीकृष्ण मागें मदत म्हणून होते. चतुर्दशीदिवशीं नरकासुराचा नाश झाला, देश स्वच्छ झाला, लोकांनीं आनंदोत्सव केला. नरकासुराचा भयंकर जुलूम नाहींसा झाला हें दर्शविण्यासाठीं लोकांनीं रात्रीं दीपोत्सव केला आणि अमावास्येच्या रात्रींसुद्धां पूर्णिमेची शोभा आणली.

पण हा नरकासुर अेक वेळा मारला म्हणजे मेला असें होत नाहीं. त्याला दरवर्षी मारावें लागतें. पावसाळ्यांत सर्वत्र चिखल होतो, त्यांत पानें गळून पडतात.

शेण वगैरे पडतें, आळ्या होतात आणि गांवाच्या आसपास अशा रीतीनें नरक तयार होतो. पावसाळ्यानंतर भाद्रपदांत ऊन्ह तावतें त्यामुळें त्या नरकाची दुर्गंधी हवेमध्यें पसरते आणि पुष्कळ लोक आजारी पडतात. म्हणून बहाद्दर स्वयंसेवकांच्या आरोग्यसेनेनें फावडी कुदळी घेऊन या नरकाशीं लढण्यासाठीं जावें, गांवच्या आसपासच्या नरकाचा नाश करावा आणि घरांत येऊन अंगाला तेल चोळून स्नान करावें. गोशाळा तर स्वच्छ केलेलीच असावी. तेथील मच्छर नाहींसे करण्यासाठीं रात्रीं तेथेंहि दिवा लावावा आणि धूर करावा आणि प्रसन्न मनानें मिष्ट पक्वान्नाचें भोजन करावें.

× × × ×

दिवाळीनंतर नवें वर्ष सुरू होतें आणि नवें धान्य घरीं येतें. वेदकाळापासून आजतागायत हिंदु घरांतून हा नवान्नाचा विधि श्रद्धापूर्वक पाळण्यांत येतो. आपल्या महाराष्ट्रांत या दिवशीं जेवण्यापूर्वीं अेका कडू फळाचा रस चाखण्याची चाल आहे. तिचा अुद्देश कडू मेहनत केल्यावांचून मिष्टान्न मिळत नाहीं हें दर्शविण्याचा असेल. भगवद्गीतेंतहि म्हटलें आहे कीं आरंभीं विषासारखें आणि अंतीं अमृतासारखें असेल तेंच सात्त्विक सुख. गोव्यांत दिवाळीच्या दिवशीं पोह्याचें मिष्टान्न करतात आणि जितके म्हणून अिष्टमित्र असतील त्या सर्वांना त्या दिवशीं बोलावतात; म्हणजे प्रत्येकानें प्रत्येक अिष्टमित्राच्या घरीं गेलेंच पाहिजे. प्रत्येकाच्या येथें फळाहार असतो. त्यांतून अेक तुकडा चाखून माणसानें दुसऱ्याच्या घरीं जावें. व्यवहारांत कडूपणा आला असो, वैर–झगडे झालेले असोत, कांहींहि झालेलें असो, दिवाळीच्या दिवशीं सर्व कांहीं मनांतून काढून टाकून पुनः मैत्रीप्रेमाचे संबंध जोडले पाहिजेत. व्यापारी दिवाळीच्या वेळेला जसे अेकूण देणेंघेणें संपवून घेऊन नव्या वहींत बाकी ओढीत नाहींत, तसें प्रत्येकजण वर्षारंभीं हृदयांत कसलेंहि वैर-द्वेष शिल्लक ठेवीत नाहींत. ज्या दिवशीं गांवांतून नरक निघून जाअील, हृदयांतून पाप निघून जाअील, रात्रीमधून अंधार निघून जाअील आणि डोक्यावरील कर्ज दूर होअील त्या दिवसापेक्षा अधिक पवित्र दिवस कोणता असूं शकेल ?

ता. ३०-११-२१

# ३ मरणाचा उत्सव

ज्याच्याविषयीं सोळा आणे खात्री आहे, ज्याविषयीं यत्किंचित्‌हि शंका नाहीं, अशी वस्तु आयुष्यांत कोणती आहे? अेकच. आणि ती म्हणजे मरण.

राजा असो, रंक असो, म्हातारी कुब्जा असो, कीं लावण्यवती अिंदुमती असो, वाघ असो नाहींतर गाय असो, ससाणा असो नाहींतर कबुतर असो, मृत्यूची भेट प्रत्येकाला ठेवलेलीच आहे. आतां प्रश्न असा आहे कीं या निश्चित अतिथीचें स्वागत कोणत्या पद्धतीनें करावें?

आपण जसें त्याला ओळखीत असूं तसेंच त्याचें स्वागत करणार. मरणाचें स्वरूप फणसासारखें आहे. वर पहावें तर सगळे कांटेच; आंतला स्वाद कोणाला माहींत? मरण म्हणजे घटकाभर विश्रांति; मरण म्हणजे दोन अंकांमधला पडदा; मरण म्हणजे वाणीच्या अस्खलित प्रवाहांत येणारीं विरामचिन्हें. अिंग्रज कवी बीजेच्या चंद्राचें स्वागत करतांना 'बालचंद्राच्या बाहूंत कवटाळलेला वृद्ध चंद्र,' असें त्याचें वर्णन करतात. अमवास्येपर्यंत जुना चंद्र सुकून जातो, क्षीण होतो; आतां त्याला आपल्या पायांनीं चालतां कसें येणार? म्हणून त्याच्या पोटीं अवतरलेला बालचंद्र आपले बारीक हात पसरून त्या म्हाताऱ्या काळ्या चंद्राला अुचलून दुसऱ्या दिवशीं पश्चिमेच्या रंगभूमीवर घेअून येतो आणि सगळ्या जगानें टाळ्या वाजवून केलेलें स्वागत स्वीकारतो. यालाच मुसल्मान लोक 'अीद का चांद' म्हणून सत्कारतात. मरण हें पुनर्जन्माकरितांच आहे. प्रत्येक नवी पिढी जुन्या पिढीचें तेज घेअून जवानीच्या आवेशांत पुढें सरसावत असते; आणि जुनी पिढी म्हातारपणाचें परावलंबन अनुभवीत लुप्त होअून जाते.

म्हातारा वठलेला हिंवाळा प्रफुल्ल नववसंताला आपलें बोट धरायला लावून घेअून येतो हें कसें विसरतां येअील? हिंवाळ्याच्या कडाक्याच्या थंडींतच वसंताचा प्रसव आहे हें विसरून कसें चालेल?

दिवाळीच्या दिवशीं वसंताच्या अपेक्षेनें, वसंताच्या मार्गप्रतीक्षेनें जर आपण दीपोत्सव करूं शकतों, मिष्टान्नभोजन करूं शकतों, आनंदाचा–मांगल्याचा

अनुभव घेअू शकतों तर मरणाचा आपल्याला आनंद कां होअू नये? मरणाचीं रडगाणीं रडूं नका, मरणाचें स्वागत करा, मरणांतच नवयौवन देण्याची, नवजीवन देण्याची शक्ति आहे, दुसऱ्यांत ही शक्ति नाहीं, हें दिवाळी आपल्याला शिकविते.

दिवाळीचा सण हा मरणाचा अुत्सव आहे; मरणाचें अभिनंदन आहे; मरणावरील श्रद्धा आहे. निराशेंतून अुत्पन्न होणाऱ्या आशेचें स्वागत आहे.

रुद्र तोच शिव; मरणाचें दुसरें रूप म्हणजे जीवन.

यमानें आपल्या बहिणीच्या घरीं जावें: मरणानें नित्यनूतनतेच्या घरांत अुत्सव करावा हें कोणाला आवडणार नाहीं?

मरण हा अग्नि नाहीं, तर तेजस्वी रत्नमणि आहे.

ऑक्टोबर. १९२५

## ४ धाकट्या भावाशिवायची दिवाळी.

दिवाळीच्या दिवशीं घरचे सर्व कुटुंबीजन गोळा होतात.

दूर देशीं गेलेले लोकहि शक्य तर दिवाळीच्या वेळेला परत घरीं यायला आतुर असतात. दिवाळी म्हणजे मिष्टान्नाचा दिवस. त्या दिवशीं सारे अिष्टजन जमले नाहींत तर मिष्टान्न मिष्ट कसें लागेल? भाअू रुसून गेला असला तर त्या दिवशीं त्याची समजूत काढून त्याला आपण घरीं आणतों. आपण भावाशीं वाअीट वागलें असलें तर त्याची माफी मागून प्रेमाच्या दोरीनें त्याला बांधून ओढून आणतों. दिवाळीच्या दिवशीं अेकहि भाअू दूर राहूं नये अशी आपली मोठ्यांत मोठी अिच्छा असते.

आपण अेका भावाला—आणि तेंहि सर्वांत लहान भावाला—केव्हांचा दूर ठेवला आहे, जाणूनबुजून दूर ठेवला आहे, त्याचा तिरस्कार करून त्याला दूर ठेवला आहे, तरी तो रुसलेला नाहीं. बिचारा कांहींसा निराश झाला आहे, कांहींसा आशायुक्त डोळ्यांनीं घराकडे पहात आहे. अजून तो आपला हिस्सा मागत नाहीं. हक्क सांगत नाहीं. तुम्ही ठेवाल त्या स्थितींत राहायला तो तयार आहे; फक्त त्याला घराच्या आंत स्थान पाहिजे आहे. भाअू म्हणून आम्हीं त्याला बोलवावें

याचाच तो भुकेला आहे. त्याच्यावांचून आपली दिवाळी साजरी कशी होणार ! त्याच्या शिवाय मिष्टान्नांत गोडी कोठून येणार ! दिवाळीच्या दिवशी आपण अन्नकूट जरी केला तरी अीश्वर त्याच्या अुंच शिखराकडे पहात नाहीं; तो धाकट्या भावाच्या प्रेमभुकेल्या डोळ्यांमधून आपणांकडे पहात असतो. धाकट्या भावाला जोंपर्यंत आपण 'भाअू' म्हणून प्रेमानें आंत बोलावीत नाहीं तोंपर्यंत अीश्वराला 'त्वमेव माता च पिता त्वमेव' असें म्हणण्याचा आपल्याला काय अधिकार ?
ऑक्टोबर १९२५.

# नरकचतुर्दशी

## आश्विन व० १४ — १ दिवस

या दिवशीं अुकिरडे काढून त्यांतील खत शेतांत टाकावें, किंवा खड्ड्यांत पुरून ठेवावें, सर्वत्र आणि विशेषतः खेड्यांतून, गांवांतील सर्व तरुणांनीं आणि सशक्त लोकांनीं प्रथम ठरविलेल्या योजनेप्रमाणें गांवाची सामुदायिक सफाअी करावी. जागा, सार्वजनिक असो किंवा खासगी असो, कोठेंहि घाण राहातां कामा नये. खासगी जागेंत मालकाच्या सहकार्यानें साफसफाअी सहज करतां येअील. जर सफाअी न झाली तर सण तहकूब करण्याची तयारी असली पाहिजे. सफाअीनंतर तेलानें मालिश करून गरम पाण्यानें अंग धुवावें. प्रथमपासून तयारी करून चुन्यानें रंगविलेल्या घरावर चुना–हळदीच्या किंवा दुसऱ्या रंगाच्या बारीक रेषा काढाव्या. भिंती चित्रें काढून सजवाव्या.

नरकासुराची कथा वाचावी.

# दिवाळी

**अमावास्या** **१ दिवस**

हा सण अितका कांहीं जागृत सण आहे कीं त्यासंबंधीं नवीन कांहीं सूचना करण्याची आवश्यकता नाहीं. मुलांनीं घरीं जाअून आअीबापांना भेटावें. अिष्ट-मित्रांनीं अेकमेकांना भेटून दिलसफाअी करावी. आवडती वस्तु अेकमेकाला भेट म्हणून पाठवावी.

प्रत्येकानें रात्रीं निजण्यापूर्वी सगळ्या वर्षाच्या संकल्पांमधून किती संकल्प पार पडले हें तपासावें. नव्या वर्षी जीवनांत नवीन काय आणतां येण्यासारखें आहे, जुन्यांपैकीं काय सोडून देण्यासारखें आहे अित्यादि सर्व गोष्टींचा विचार करून निजावें.

दिवाळी म्हणजे दीपावली, दीपोत्सवी. या दिवशीं दिव्यांचा अुत्सव केलाच पाहिजे.

---

कार्तिक शुद्ध १ ( बलिप्रतिपदा ) १ दिवस

हा दिवस मुख्यत्वें मित्रांना भेटण्याचा तसाच गुरुजनांना भेटून त्यांचा आशीर्वाद घेण्याचा दिवस आहे. नव्या वर्षाचा नवा संकल्प आणि सबंध वर्षाची कांहींतरी निश्चित योजनाहि या दिवशीं करावी. ज्यांना विचार करतां येतो त्यांनीं अेकदोन तास शांतपणें अेकांतांत बसून प्रार्थनापूर्वक नव्या वर्षाचा संकल्प आणि तो पार पाडण्यासाठीं सविस्तर कार्यक्रम मनांत बसवावा आणि ज्यांच्यापुढें असा संकल्प उघड सांगणें अिष्ट आहे त्यांना तो सांगून आपल्याजवळ अवश्य टिपून ठेवावा.

---

# कुठे आहे भाऊबीज? : : ३२

## ( कार्तिक शु. २, यमद्वितीया )

हिंदु समाजांत स्त्रियांची स्थिति जशी असावी तशी नाहीं. अितकीं वर्षे चर्चा चालली आहे, पुष्कळ कुटुंबांत फेरफार झाला आहे, लोकमतांतहि पुष्कळ बदल झाला आहे, तरीहि स्त्रियांची स्थिति अजून संतोषकारक झाली आहे असें म्हणतां येणार नाहीं. परिस्थितीच्या दडपणानें नाअिलाज झाल्यावांचून जीवनांत कसलाहि फेरफार करायचा नाहीं अशा प्रकारची मुमूर्षु जडता समाज जोंवर सोडणार नाहीं तोंवर अशीच स्थिति राहाणार.

ही स्थिति म्हणजे काय? ही स्थिति म्हणजे स्वभावाचें पारतंत्र्य, हृदयाची दुर्बलता, आणि सामाजिक उन्नतीच्या श्रेष्ठ तत्त्वांविषयीं नास्तिकता. चालू परिस्थितीनें व्याकुळलेलें मन प्रसन्नता मिळविण्यासाठीं हिंदु आदर्शांतील वैभवकाळाचीं चित्रे दृष्टीपुढें अुभीं करण्याला धडपडत असतें, आणि या व्यापारांत आतांपर्यंत आपल्याला निराश होण्याची पाळी आलेली नाहीं. मदालसा, मैनावती, सुमित्रा, विदुला किंवा जिजाबाअी यांसारख्या आदर्श माता आपल्याअिकडे आहेत. आदर्श पत्नीच्या बाबतींत तर हिंदुस्थान जगांतील अितर सर्व देशांच्या नेहमीं आघाडीवर राहील. सीता–सावित्रीपासून त्यांची नामावलि सुरू करणें सोपें आहे, पण या नामावलीला शेवट कुठे आहे?

आदर्श मातांचीं आणि आदर्श पत्नींचीं अुदाहरणें आपल्याकडे ढिगावारी आहेत; पण आदर्श ब्रह्मचारिणीविषयीं मात्र तसें म्हणतां येणार नाहीं. प्राचीन युगांत नारीला अुपवीत दिलें जात असें अशीं थोडीशीं वचनें आणि सुलभा, गार्गी, शबरी आणि मैत्रेयी अितकींच लोकविश्रुत अुदाहरणें आहेत. वेदवती, धृतव्रता, वडवा, शुतावती अित्यादि नांवें नांवेंच राहिलीं आहेत. मोक्ष हाच परम पुरुषार्थ मानणाऱ्या ब्रह्मचारिणी स्त्रियांचीं अितकीं कमी उदाहरणें असावींत ही स्थिति खचित शोभास्पद नाहीं.

स्त्रियांचें सामाजिक स्वातंत्र्य जेथें मान्य केलें जात नाहीं तेथें त्यांच्या पारलौकिक स्वातंत्र्याविषयीं म्हणजेच मोक्षाविषयीं कोणाला अुत्साह वाटणार ? हिंदु, ख्रिस्ती, बौद्ध आणि मुसलमानी धर्मांत परमलोकप्राप्तीच्या बाबतींत स्त्रियांच्या शक्तीविषयीं थोडीफार शंकाच प्रदर्शित केली आहे. आर्य आनंदानें बुद्ध भगवानाला जेव्हां सरळ प्रश्नच टाकला तेव्हां बुद्धभगवानांनीं शेवटीं कबूल केलें कीं, ‘ निर्वाण मिळविणें हें स्त्रियांच्या बाबतींत अशक्य नाहीं.’ या प्रसंगासंबंधीं कुमारस्वामीसारखे आधुनिक संस्कारी पुरुषसुद्धां आपल्याला विचारतात कीं ‘ प्रापंचिक वृत्ति पुरुषापेक्षां स्त्रियांमध्यें अधिक आहे ही गोष्ट खरी नाहीं का ? ’ बंकिमचंद्रहि आपल्या ‘ आनंदमठ ’ कादंबरींत, मोक्षधर्माशीं स्त्रियांचें हाडवैर आहे, असें अस्पष्टपणें सुचवितात.

अशा प्रकारची समजूत जेथें आहे तेथें आदर्श ब्रह्मचारिणी कमीच असणार तर काय? आणि मोक्षप्राप्तीची अिच्छाच जेथें मंद असेल तेथें ब्रह्मचर्यासारखी कठिण दीक्षा घेणें कोणाला सुचणार ? ( यदिच्छन्तो ब्रह्मचर्यं चरन्ति )

‘ तेऽपि यान्ति परां गतिम् ’ असें सांगून गोपीजनवल्लभ श्रीकृष्णानें शूद्रांबरोबर स्त्रियांनाहि आश्वासन दिलें; पण भगवन्तांनीं अेखादी आदर्श ब्रह्मचारिणी तयार केली असेल तर त्याचा अुल्लेख पुराणकारांनीं कुठें केलेला नाहीं.

वीरमाता, वीरांगना, वीरकन्या असे बहाद्दुरीचे आदर्श आपल्याअिकडे भरपूर नसले, तरी पुष्कळ आहेत. तेजस्वितेच्या बाबतींत अेकटी द्रौपदी आणि झांशीची लक्ष्मीबाअी आपल्यापुढें असल्या तरीहि आपल्या समाजाचें मुख अुज्ज्वल करण्यासाठीं त्या पुरेशा आहेत.

आदर्शांच्या प्रकारांत अेक अुणीव मात्र आपणांला अतिशय बोचल्यावांचून राहाणार नाहीं. गृहस्थाश्रम आणि संन्यास, मोठमोठे संघ आणि अविभक्त कुटुंबें, कशाचेंहि वर्णन वाचा आणि वाटेल ते आदर्श निरीक्षण करा. आपल्याअिकडे आदर्श भाअूबहिणींचीं चित्रें नाहींतच म्हटलें तरी चालेल. श्रीभगवन्तांनीं सुभद्रेपेक्षांसुद्धां द्रौपदीचें बंधुत्व अधिक संभाळलें हा अेक अुज्ज्वल दृष्टांत सोडून दिला तर शिल्लक काय राहातें ? महेन्द्र आणि संघमित्रा यांना आदर्श मिशनरी म्हणतां येअील. पण त्यांनीं कांहीं आदर्श बंधुभगिनीचें अुदाहरण घालून दिलें आहे असें म्हणतां येणार नाहीं; आदर्श बंधुभगिनीचा विचार करतांना हृदय अुचंबळून सोडणाऱ्या

प्रेमानें कांहीं यांचें स्मरण होत नाहीं. आद्य आणि आर्ष कवी वाल्मिकीलासुद्धां मानवी जीवनाचे सगळे संबंध सुचले, पण अेक भाअूबहिणीचा आदर्श रेखाटण्याचें कांहीं त्याला सुचलें नाहीं. त्या बिचाऱ्या शान्तेचासुद्धां त्याला अुपयोग करून घेतां आला नाहीं; पौराणिक आणि अैतिहासिक साहित्यांत बंधुभगिनीचा आदर्श रूढ झालेला कुठेंहि पहाण्यांत येत नाहीं, अितकेंच नव्हे तर कल्पित साहित्यांतसुद्धां आपल्या कवींनीं भाअूबहिणीचा अुज्ज्वल आदर्श रेखाटण्यांत आपल्या प्रतिभेचा अुत्कर्ष कुठेंहि दाखविलेला नाहीं. सम्राट श्रीहर्ष आपली बहीण राज्यश्री हिला सोडविण्याकरितां जंगलाकडे धांवला आहे हा प्रेमळ प्रसंग अन्य देशांतील कवींच्या हातीं आला असता तर त्याच्यावर त्यांनीं किती अमर काव्यें लिहिलीं असतीं कोण जाणे ?

आपल्या कवींनीं हा अक्षम्य प्रमाद कां बरें केला ? जिला भाअू नाहीं अशा कन्येबरोबर लग्नसुद्धां करूं नये अितक्यापर्यंत सांगणाऱ्या आपल्या शास्त्रकारांनींसुद्धां भावाबहिणीच्या संबंधांवर आपली धर्मबुद्धि रिती केली नाहीं. याचें काय कारण ? बालविवाह ? मुलगी आठ दहा वर्षांची होण्यापूर्वींच लग्न होअून सासरीं जातें, मग भावाबहिणीच्या संबंधांच्या विकासाला अवकाश कुठून राहाणार ? पण आपल्या अिकडे पूर्वींपासून कांहीं बालविवाह होत नव्हता. वेदामध्यें यमयमी या प्रख्यात जोडीचा काव्यमय अुल्लेख आहे. यम मृत्यु पावला तेव्हां यमीचे अश्रू कांहीं केल्या थांबेचनात. सगळ्या देवांनीं यमीला शांत करण्याचा प्रयत्न केला, पण तिचें सांत्वन होअीना. शेवटीं देवांनीं रात्र निर्माण केली. रात्र झाली आणि भावाच्या मरणाचें दुःख यमी थोडेसें विसरली. या रात्रीनंतरच आज आणि काल असा भेद सुरू झाला. त्यापूर्वी नेहमीं आजच होता.

वेदांनीं यमयमीच्या बंधुभगिनी—प्रेमाचें वर्णन तर सुरेख केलें, पण त्यांनीं या रूपकाचा अगदी चुथडा केला आहे. याच कारणानें मला वाटतें आपल्या कवींचा जो अेकदां विरस झाला त्यानंतर त्यांना भाअूबहिणीचा काव्यमय आणि आध्यात्मिक संबंध रेखाटण्याला अुत्साहच मुळीं राहिला नसावा. कच आणि देवयानी यांच्या संबंधांतसुद्धां काम असेंच बिघडून गेलें आहे, त्यामुळें कवी भावाबहिणीच्या पवित्र संबंधाविषयीं नास्तिक बनले असावेत ! युगानुयुगें भारतवासी

दरवर्षी भाऊबीजेचा सण साजरा करीत आले आहेत; तरी अेकाहि कवीला भाऊ-बहिणीच्या संबंधाला प्राधान्य देऊन महाकाव्य लिहायचें सुचलें नाहीं.

निराश झालेलें मन जेव्हां आपली हताश दृष्टि लोकसाहित्याकडे टाकते तेव्हां ती दृष्टि आनंदाश्चर्यानें ओली होते. भावाबहिणीचा संबंध अनादि आहे, हृदयसहज आहे. सार्वभौम आहे. लोकहृदय तो कसा विसरणार ? लोकगीतांत आणि लोककथांमध्यें जिकडे पहावें तिकडे भावाबहिणीच्या मधुर संबंधाच्या आठवणी विखुरल्या आहेत. भविष्याचा सामाजिक आदर्श घडविणारे आजचे कवीजन हो ! या न नांगरलेल्या क्षेत्राकडे दृष्टि टाका, आणि स्त्रीपुरुषांमधील हा अेकमेव निर्विकारी, निष्काम आणि समान संबंध रेखाटण्यांत आपलें शक्ति-सर्वस्व खर्च करा.

# भाऊबीज

## कार्तिक शुद्ध २ ( यमद्वितीया ) १ दिवस

सर्व सणांत या सणाचें काव्य कांहीं वेगळेंच आहे. ज्या शाळेंत मुलांच्या-बरोबर मुलींनाहि स्थान आहे, तेथें तर हा दिवस विशेषप्रकारें साजरा करतां येअील. त्या दिवशींचा नास्ता ( न्याहारी ) अथवा सगळें भोजन मुलींनीच तयार करावें आणि सर्व मुलांना वाढावें. मुलांनीं स्वतः तयार केलेली अशी कोणतीहि उपयोगी वस्तु भगिनींना द्यावी हाहि रिवाज चांगला आहे. स्वतः कांतलेल्या सुताच्या खादीचा तुकडा, अेखादें पुस्तक, दौत किंवा अशीच कांहींतरी दुसरी वस्तुहि देतां येअील.

भाऊबीजेच्या दिवशीं प्रत्येक विद्यार्थ्यानें घरीं आपल्या बहिणीला पत्र मात्र अवश्य लिहावें. अशा पत्रांच्या नकला गोळा करून त्या खाजगी रीतीनें वाचल्या तर त्याला कांहीं हरकत नाहीं. मात्र हें कृत्रिम होतां कामाचें नाहीं. कृष्ण आणि द्रौपदी ही गोष्ट अेखाद्यानें लिहून आणावी किंवा त्यावर कविता रचावी.

संस्थेमध्यें सर्व विद्यार्थी सर्वच विद्यार्थिनींचे भाऊ आहेत. त्यांत अमुकच बहिणीला किंवा भावांना विशेष पसंती द्यायची असे असूं नये.

----

## महाअेकादशी :: ३३

कार्तिक शु. ११ अर्धा दिवस

या दिवशीं देवशयन आणि प्रबोधन यांचें रहस्य अेखाद्या शिक्षकानें सांगावें. चातुर्मास्याचें उद्यापन करावें. तुळशीच्या गोष्टीविषयीं थोडेसें विवेचन व्हावें. महाअेकादशीदिवशीं सगळ्यांनीं चार वाजतां स्नान करून सामुदाअिक प्रार्थना करावी. कार्तिक-स्नानाचें माहात्म्य विशेष सांगितलें आहे. प्रार्थनेंत गीतेचा पंधरावा अध्याय म्हणावा. झाडांचीं आळीं साफ करून झाडांना पाणी देण्याकडे या दिवशीं थोडा वेळ सर्वांनीं घालवावा, हा या दिवसाचा महायज्ञ. महाअेकादशीचा फलाहार हा आहेच. शक्यतर दशमीच्या संध्याकाळीं कांहीं खाअूं नये. महाअेकादशी दिवशीं संगीतयुक्त भजनाला विशेष वेळ दिला पाहिजे.

अेकादशी दोन येतील तर संस्थांमध्यें दुसरी पसंत करावी. वैष्णवधर्मांत भक्ति, चारित्र्याची शुद्धि आणि माणसांमधील समानता या तीन्हींवर विशेष जोर कसा दिला आहे तें समजावून द्यावें.

———

# स्वातंत्र्याचा आद्यप्रणेता : : ३४

## ( कार्तिक व. १३ )

महाराष्ट्रामध्यें संतमताचा प्रचार करणारा पहिलाच पुरुष अनेक रीतींनीं अद्वितीय व्हावा हा कांहीं सामान्य योगायोग नव्हे. सनातन धर्मानें रूढिधर्माचें रूप धारण केलें, जिकडे तिकडे अुच्चनीच भाव बोकाळला, आणि लोकांनीं ज्ञानाची आणि सदाचाराची अुपासना सोडून कर्मठपणांतच जीवनाची कृतार्थता मानली, अशा वेळीं ज्ञानेश्वराचा प्रादुर्भाव झाला. वर वर्णिलेली दुरवस्था वाढावयाचीच होती, तिची शीग चढली नव्हती. परंतु नैतिक सृष्टीची रचनाच अशी आहे कीं पापाच्या प्रारंभा-बरोबरच त्याच्या परिमार्जनाचा संभव होत असतो, आणि हीं दोन्हीं तत्त्वें वाढीस लागून यथाकाळीं पापाचें पारिपत्य होतें, आणि धर्माची संस्थापना होते. ज्ञानेश्वर-कालीं ज्या संतमताचा अंकुर फुटला त्याचीं फळें महाराष्ट्राला रामदास आणि तुकाराम यांच्या काळीं चाखावयास मिळालीं.

ज्ञानेश्वर- संन्याशाचा मुलगा - धर्मपरायण असूनहि धर्म-बहिष्कृत आणि धर्मबहिष्कृत असूनहि धर्मविद् आणि धर्मकृत् झाला. समाजाची शासनसत्ता आणि रूढिधर्माची मर्यादा त्यांना मान्य असूनहि समाजानें त्याना जवळ केलें नाहीं आणि ज्या स्वातंत्र्याची अिच्छा सुधारकांना अहर्निश असते तें स्वातंत्र्य समाजानें त्यांच्या-वर लादलें. ज्ञानेश्वर प्रायश्चित्त घेण्यास तयार होते; त्यांना. अुपनयन-विधि हवा होता; ब्राह्मण्याचें निदर्शक असें यज्ञोपवीत, त्यांना आपल्या खांद्यावर हवें होतें; त्यांनीं जसा आपल्या नम्रतेचा आपल्या समाजाला परिचय करून दिला त्याच-प्रमाणें रेड्याकरवीं वेद बोलवून आपल्या सामर्थ्याचाहि परिचय दिला. लोकांत म्हण आहे कीं ' चमत्कारावांचून नमस्कार नाहीं. ' ज्ञानेश्वरांनीं चमत्कार करून दाख-विले, रूढीग्रस्त समाजानें त्यांना नमस्कार घातला पण जानवें घातलें नाहीं. अशा रीतीनें निवृत्तिनाथ, ज्ञानदेव, सोपानदेव आणि मुक्ताबाअी हीं चार भावंडें शास्त्रधर्म आणि रूढिधर्म यांच्या कैचींतून आपोआपच मुक्त राहिलीं. जें स्वातंत्र्य मीराबाअीला प्राणदंड देअून विकत घ्यावें लागलें तें मुक्ताबाअीवर ' नको नको ' म्हणत असतां

लादलें गेलें. म्हणूनच ती स्वातंत्र्योपासक झाली, विजेसारखी चमकली, आणि चेंगट-पणानें जीवनाला चिकटून राहाणाऱ्या रूढीप्रतिनिधी चांगदेवाच्या गुरुस्थानीं जाऊन पोचली. चांगदेवानें अुच्चपणाचा अभिमान सोडला तेव्हांच त्याचा अुद्धार झाला; आणि विसोबा खेचर ? तो तर भगवद्भक्त नामदेवाचा ज्ञानी गुरु, त्यालाहि या ज्ञानी भावंडांकडूनच दीक्षा मिळाली होती.

ज्ञानेश्वराचे वडील तेहि शास्त्रमर्यादा पाळणारे, पत्नीची अनुमति मिळविल्यावांचून कांहीं त्यांनीं संन्यास घेतला नव्हता. त्यांना संन्यासदीक्षा देणारे त्याचे गुरु हेही रूढीधर्म पाळणारे; सुवासिनी बघून त्यांनीं तिला आशीर्वाद दिला, यांत रूढीचेंच पालन केलें. पण रूढी स्वभावतःच आंधळी असते. तिचें राज्य केवढें कां मोठें असेना, सुव्यवस्थित नसावयाचेंच. ज्ञानेश्वरांच्या सबंध चरित्रांत जेवढे म्हणून प्रसंग आहेत ते सर्व रूढीनिष्ठांना रूढीं पाळणें कसें अशक्य झालें हें दाखविणारेच आहेत.

अशा या ज्ञानेश्वरांनीं गीतेवर टीका केली तेथें देखील भाष्यकार श्रीशंकराचार्यांना वाट पुसत जाअूनसुद्धां त्यांना आपलें स्वतंत्र दर्शन व्यक्त करावें लागलें; आणि जणू काय रसेश्वराच्या त्या ग्रंथांत स्वातंत्र्य पूर्णपणें व्यक्त झालें नाहीं म्हणून निवृत्तिनाथांनीं त्यांचेकडून 'अनुभवामृत' लिहून घेतलें.

असा हा महाराष्ट्राचा आद्य संतपुरुष राजनिष्ठ आणि धर्मनिष्ठ असूनहि स्वातंत्र्याचा पुरस्कर्ता आणि प्रणेता झाला, आणि त्यानें महाराष्ट्राला जी नवी प्रेरणा दिली ती रूढीचे खडक फोडीत फोडीत महाराष्ट्राला सजीवन करीत आली आहे.

ज्ञानदेव जसे ज्ञानेश्वर होते तसे रसेश्वरहि होते. 'ज्ञानेश्वरी' ही विचारी परंपरापरायण लोकांच्या हातीं सांपडल्यामुळें लोकांनीं तिचा पूर्ण आणि खराखुरा अुपयोग केलाच नाहीं. ज्ञानेश्वरीला तिचे खरे वाचक यापुढेंच मिळणार आहेत.

१६–१२–३९

----

# ज्ञानेश्वर—पुण्यतिथि

**कार्तिक व. १३** **१ दिवस.**

संस्कृतमध्यें ज्याप्रमाणें अनुष्टुभ् त्याप्रमाणें मराठींत ओवी. कोणताहि रस घ्या आणि कसलीहि भव्य कथावस्तु घ्या, अनुष्टुभ् आणि ओवी यांपैकीं एकहि वृत्त अपुरें पडणार नाहीं. महाराष्ट्रीयव असल्यानें मीं अगदीं लहानपणापासून आओच्या मांडीवर डोकें ठेवून ओव्या ऐकल्या आहेत. आणि हरिदास–पुराणिकांच्या तोंडून' 'ओवी ज्ञानेशाची ' हा आर्याखंडहि अैकला आहे; पण ओवीचें संपूर्ण दर्शन झालें हिमालयाच्या पायथ्याशीं गंगातटाकीं हृषीकेश येथें. ओवीचा सागरगंभीर प्रवाह वाहूं लागला म्हणजे पैजेनें हवा तो रस आळवूं शकतो याचा साक्षात्कार त्या पवित्र स्थानीं ज्ञानेश्वरी माअुलीनें करून दिला आणि तेव्हांपासून निश्चय झाला कीं जर ज्ञानेश्वरमहाराजांचा अुत्सव साजरा करावयाचा तर तो ओव्यांचे भक्तियुक्त पारायण करूनच करावयाचा. महाराष्ट्रांत एकेकाळीं ज्ञानदेवांचे अभंग प्रत्येक महाराष्ट्रीयाच्या नित्यपाठाची वस्तु होती. ज्ञानेश्वरांनीं लहानलहान कितीतरी प्रकरणें लिहिलीं होतीं आणि महाराष्ट्रांतील वृद्ध स्त्रिया आलेत्यानेंच तीं म्हणत असत. तीं सर्व प्रकरणें मागच्या पिढीबरोबर लुप्त झालीं. आतां जीं म्हणून हातीं लागतील तीं केवळ मुद्रित करून संतोष न मानतां कंठीं धारण करण्याची प्रथा पुनः सुरू केली पाहिजे.

ज्ञानेश्वरांच्या अुत्सवाच्या दिवशीं चारी वर्णांच्या लोकांना अुत्सवाला बोलावून त्यांना ज्ञानेश्वरांचे चरित्र अैकविलें पाहिजे, आणि सर्वांनीं मिळून शपथा घेतल्या पाहिजेत कीं आम्ही आमच्या जीवनांत कोणत्याहि प्रकारचा अुच्चनीच भाव बाळगणार नाहीं. शबरी, मीरा, मुक्ताबाई, सुलभा वगैरे कन्यांचें चरित्रकीर्तनहि या दिवशींच करावें. ज्ञानेश्वरीपाठ सबंध न करतां त्यांतून निवडक वेचांचें पठण व्हावें.

---

# युद्धगीतेची जयंती :: ३५

## ( मार्गशीर्ष श. ११ )

धर्मयुद्धाची अखंड प्रेरणा देणाऱ्या भगवद्गीतेची आज जयंती आहे. गीता हा ग्रंथ नाहीं, ती राष्ट्रमाता आहे. तिचा संदेश भारताच्या द्वारां साऱ्या दुनियेसाठीं आहे. गीता जेव्हां प्रथम गायिली गेली तेव्हां वर्षाची सुरुवात मार्गशीर्ष महिन्यापासून होत असे. मार्गशीर्षाला वैदिक लोक ' अग्रहायण ' म्हणत असत; आजहि गुजरातेंतील व अुत्तर हिंदुस्थानाच्या खेड्यांतील लोक त्याला ' अगहण ' म्हणतात. गीतेंत भगवान् म्हणतात कीं महिन्यांमध्यें श्रेष्ठ महिना जो मार्गशीर्ष तो मी आहे. आणि या महिन्यांतहि मोक्षदा अेकादशीच्या दिवशीं गीतामातेचें स्मरण होणें स्वाभाविक आहे. गीतेचें स्मरण झालें कीं गीतेनें हृदयांत जन्म घेतला म्हणायचा. तिथेंच तिचें मंदिर बांधण्यासाठीं आपण गीताजयंती साजरी करतों. गीतामातेसाठीं दगडामातीचें घर कसलें बांधायचें ? गीतेची स्थापना हृदयमंदिरांतच करावी. गीतेची पूजा तांदूळ, पानें किंवा फुलें यांनीं होणार नाहीं. गीतेला सगळें जीवन अर्पण केलें तरच तिला संतोष होअील.

गीता सांगते, सुखदुःखाच्या योगानें सहज दडपून जाण्याअितके पोचट होअूं नका, जयपराजयाचीसुद्धां तुम्हांला क्षिति नसावी. जे निश्चयी आहेत, आग्रही आहेत, हट्टी आहेत ते शेवटीं मनांत असलेलें प्राप्त करून घेतातच; म्हणून निर्मळ व्हा, वीर व्हा; दूरच्या यात्रेला निघालेल्या लोकांना वाटेंत थंडीहि सहन करावी लागते अन् अुन्हहि सहन करावें लागतें; वाटेंत दिवसहि अुगवेल आणि रात्रहि पडेल. यात्रा तर चालविलीच पाहिजे. समग्र समाजाची अशी जीवनयात्रा व्यक्तिगत स्वार्थासाठीं नसावी, आकुंचित स्वार्थासाठीं नसावी. या यात्रेला निघालेल्या लोकांनीं ' सर्वभूतहितेरताः ' असलें पाहिजे. त्यांच्या मनांत कोणाविषयीं द्वेषभाव तर असतांच कामा नये. गीताधर्मी लोक केवळ अीश्वरालाच अोळखतात. सर्व प्राणी अीश्वराचींच लेकरें असल्यामुळें ते कोणाचा द्वेष करीत नाहींत. त्यांची झोंबी केवळ

पाप, अनाचार आणि अत्याचार यांच्याशींच अखंड चालणार. कामरूपी, वासनारूपी दुरासद अशा शत्रूला असहकाराच्या शस्त्रानें छेदून ते अविचल पद प्राप्त करून घेणार. या युद्धाची दीक्षा जे घेतात त्यांच्यासाठीं गीताजयंती आहे. धर्मयुद्धाला पाठ फिरवूं नये. पाठ फिरविल्यानें स्वधर्म आणि कीर्ति या दोहोंचा नाश होतो आणि पदरांत केवळ पाप आणि फजीतीच येऊन पडते. धर्मयुद्धांत गमाविणें असतच नाहीं. जिंकलें तरी धर्माचाच विजय आहे, हरलों तरी धर्माचाच विजय आहे !

गीता म्हणते, आपण मूठभर आहोंत अशी चिंता कधींहि करूं नये.. आपण आपलें हृदय अुन्नत करावें, आपण श्रेष्ठ व्हावें. लोक आपोआप आपल्या मागें येतात. श्रेष्ठ माणसांनीं जिकडे प्रयाण केलें त्यांच्यामागें लोक यायचेंच. आपण आळशी झालों, आपण थांबलो तर प्रजेचा नाश केल्याचें पाप आपल्या माथी आहे.

धर्मवीराचें शिक्षण कसें असावें हेंहि गीतेनें आपल्याला सांगितलें आहे. धर्मवीर अिंद्रियांच्या लोभांत फसणार नाहीं, सुखदुःखांत वाहात जाणार नाहीं, लाभहानींमुळें लुब्ध होणार नाहीं कीं दडपून जाणार नाहीं. तो वीर आहे. क्षुद्र कामांत तो आपलें जीवन अुधळणार नाहीं. तो अीश्वराचा सैनिक आहे. धर्माची ग्लानि जेव्हां त्याला दिसते, अधर्माचें अभ्युत्थान जेव्हां तो पहातो, तेव्हां भगवान् स्वतः येणार आहेत असा विश्वास ठेवून भगवन्ताचा धर्मसंस्थापनेचा संदेश अैकण्यासाठीं तो सज्ज रहातो; ज्यांचीं कृत्यें दुष्ट आहेत त्यांच्या बाजूला तो राहात नाहीं. साधूंच्या रक्षणासाठीं तो नेहमीं कटिबद्ध राहातो. कर्म करायचें म्हणजे कष्ट आहेत या विचारानें किंवा भीतीनें तो कर्माचा त्याग करीत नाहीं. थंडी अून्ह न म्हणतां, लाभहानीचा विचार न करतां, मनांत कसलाहि मत्सर न येअूं देतां. यदृच्छेनें जें मिळेल तेवढ्यांत संतोष मानून तो लढतच राहातो. मोठा यज्ञ आरंभिल्यानंतर तो जें कांहीं करतो तें यज्ञासाठींच. यज्ञ करून जें अुरेल तेवढेंच खाण्याचा आपला अधिकार आहे हें जाणूनच तें तो घेअील. महाप्रबळ शत्रूला छेदण्यापूर्वी तो आपल्या हृदयांत असलेल्या दुर्बलतेचा आणि संशयवृत्तीचा अुच्छेद करतो. संशयवृत्ति गेली, अविश्वास गेला म्हणजे सहजश्रद्धेच्या योगानें तो वज्रकाय होतो. अीश्वराचें कार्य करतांना संशय कसला, चिंता कसली ? धर्मवीर म्हणतो, मी कांहीं करीतच नाहीं. तो जशी प्रेरणा देतो तसें मी करतों. आणि यांत मरण आलें तरी काय झालें ? अेका

जन्मानंतर दुसरा जन्म यायचाच आहे. या जन्मीं चांगलें काम केलें असेल आणि वीराचें मरण मिळविलें असेल तर नवा जन्म आजच्याहून वाओीट तर खात्रीनें मिळणार नाहीं. चांगलाच मिळेल. औीश्वराचें स्मरण कायम ठेवून लढावयाचें आहे. औीश्वराचें ध्यान कायम असेल तर अंतीं औीश्वराकडेच जातां येओील.

गीता म्हणते कीं, लोकांचें जीवन–मरण, कल्याणअकल्याण काळपुरुष परमात्म्याच्या हातीं आहे. त्याला जसें करायचे असेल तसें होओील. आपण त्याच्या हातांतील निमित्तमात्र बाहुलीं आहोंत. भूतमात्राचें कल्याण मनांत बाळगून कसलाहि रागद्वेष मनांत न ठेवतां आपण प्रभूचें वचन पाळावें. निर्वैर राहिलो तरच प्रभूजवळ पोंचूं. आपण त्याचें ध्यान धरावें. तो आपला अुद्धार करील.

तमाम दुनियेची सत्ता आणि सुखें आपल्याच हातीं राहावीं अशा आग्रहानें प्रवृत्ति करणारे राक्षस कितीतरी असतात. मौजमजा हें त्यांचें ध्येय असतें. त्यासाठीं न्यायअन्यायाचा कसलाहि विचार न करतां तें जगांतील धन खेचून्यानें ओढतात. 'पहा, अितकें आज मला मिळालें, हे माझे मनोरथ आतां तृप्त होतील, अितकें धन माझ्याजवळ आहेच, अितकें मिळेल, अितक्या शत्रूंना मीं मारलें, दुसरेहि मी मारीन, मी जगाचा स्वामी आहे, मलाच भोग भोगतां येतात; सुखसामर्थ्य हें माझेंच आहे, माझी जात सर्वांत श्रेष्ठ, माझ्यासारखा कोणी नाहीं, जगाचें कल्याण मीच करीन, मी जगाचा पुढारी आहे,'–अशा तऱ्हेचे ते मनांत मनोरे रचीत असतात. असल्या प्रकारचे मनोरथ बाळगणारे, दंभानें जगाला फसविणारे दीनांच्या देहांत वास करणाऱ्या औीश्वराचा अपमान करणारे लोक कितीक पडले आहेत.

सैतान या जगाला पचवून बसला आहे! त्याच्या जागीं औीश्वराचें राज्य स्थापन केलें कीं झालें आपलें काम. या अनित्य आणि दुःखपूर्ण जगांत सुख भोगायला कोण बसला आहे? औीश्वराची ही सेवा लाभली आहे म्हणूनच जीवनांत गोडी भरली आहे.

२०–१२–३१

# गीताजयंती

मार्गशीष शु० ११ अर्धा दिवस

हा नवा उत्पन्न केलेला सण आहे. ' मासानां मार्गशीर्षोऽहम् ' या वचनावरून हा दिवस नक्की करण्यांत आला आहे. अत्यंत प्राचीन काळीं मार्गशीर्ष महिन्यापासून वर्षारंभ होत असे. या दिवशीं सबंध गीतापाठ झाला पाहिजे. लो० टिळकांची ' अग्रहायणा ' संबंधींची कल्पना आणि ज्योतिःशास्त्रांतील अयनचलन या दिवशीं समजाऊन देतां येईल. गीतेच्या संदेशाचें विवेचन आणि श्रीकृष्णाच्या विभूतींविषयींहि चर्चा व्हावी.

---

## दत्तजयन्ती ः ः ३६

### मार्गशीर्ष शु० १५ १ दिवस

हा दिवस थोडासा पायीं प्रवास करण्यांत जर घालविला तर तें अिष्ट आहे. मार्गशीर्ष महिन्यांत फारसे सण नाहींत. पूर्णिमेच्या दिवशीं सकाळीं अेका गांवांत स्नान करावें, दुसऱ्या गांवांत जाअून जेवावें, आणि तिसऱ्या गांवांत रात्रीचा मुक्काम करावा, असा कार्यक्रम अवधूताप्रमाणें ठेवता येअील.

खिस्ती धर्म ही अेक प्रकारची गुरुपूजा आहे. म्हणून आज ' Imitation of Christ ' ( ख्रिस्ताचें अनुसरण ) हें पुस्तकहि वाचावें.

शीख लोक हे अेकप्रकारें गुरुअुपासकच म्हणायचे. त्यांनीं शुद्ध भक्ति आणि सदाचार यांचें मोठें धार्मिक साहित्य आपल्याला दिलें आहे. यांतूनहि आज पारायण करावें; अुदा० जपजी, सुखमनी. यांखेरीज शीख गुरूंनी जो सात्विक बलिदानाचा लोकोत्तर आदर्श साध्य करून दाखविला त्याविषयींच्या गोष्टीहि विद्यार्थ्यांना सांगतां येतील. गुरुपूर्णिमा आणि दत्तजयन्ति या दोन सणांमध्यें शीखसंप्रदाय आणि गुरुभक्ति यांविषयीं पुष्कळ सांगतां येअील.

---

## ( पौषमास )

पौषमासीं महाराष्ट्रांत एकजण दुसऱ्याला भेटला कीं संक्रान्तीचा तिळगुळ अेकमेकाला द्यायचाच. अेकमेकाला तिळगुळ देऊन, तिळगुळ घ्या आणि गोड बोला असें आम्ही म्हणतों; कारण तिळांत स्नेह आहे आणि गुळांत गोडी आहे. सर्वांशीं प्रेम आणि गोडी राहावी या संकल्पाची ही निशाणी आहे. वेदामध्यें अेक मन्त्र आहेः

मित्रस्य मा चक्षुषा सर्वाणि भूतानि समीक्षन्ताम्।
मित्रस्याहं चक्षुषा सर्वाणि भूतानि समीक्षे।
मित्रस्य चक्षुषा समीक्षामहे ।

[ सर्व प्राणी माझ्याकडे मित्राच्या डोळ्यांनीं–स्नेहभावाने–पाहोत; मी सर्व प्राणिमात्रांना स्नेहभावानें पाहातों; आपण सर्वजण स्नेहभावानें पाहूं या. ]

या वैदिक मन्त्राचेंच महाराष्ट्रांतील भाविक लोकांनीं असें गमतीचें आणि मिष्ट रूपान्तर केलें आहे.

× × × ×

जशी माणसांची माणसांवर छाप पडते तशीच निसर्गाचीहि माणसांवर छाप पडत असते-त्यांच्या शरीरावरच नव्हे तर मनावर, त्यांच्या राहणीकरणीवर, त्यांच्या आदर्शावर, त्यांच्या सामाजिक जीवनावर.

अेखाद्या श्रेष्ठ अथवा पूज्य विभूतीचा जसा आपल्या जीवनावर परिणाम होतो तसाच परिणाम नैसर्गिक घटनांचाहि होतो. कोणा आप्तेष्टांच्या मरणानें जसे आपण हतोत्साह होतो तद्वत् सूर्याचें खग्रास ग्रहण पाहूनाहि आपण विमनस्क होत असतों. महायुद्ध आणि दुष्काळ या दोहोंचाहि आपल्यावर सारखाच परिणाम होतो. पुत्रोत्सव आणि वसंतोत्सव यांत सारखेपणा नाहीं असें कोण म्हणेल? श्रीकृष्णानें कंसावर, रामानें रावणावर, बुद्धानें मारावर विजय मिळविल्याला आज

हजारों वर्षें लोटलीं तरी त्या विजयाचा दिवस जेव्हां पुनःपुनः येतो तेव्हां त्या विजयाचा संदेश आपल्याला पुनःपुनः मिळतो. अुन्हानें थंडीवर मिळविलेला विजय प्रभावांत कांहीं याहून कमी प्रतीचा नसतो. दरवर्षी ही गोष्ट होत असली तरी तेवढ्यानें कांहीं ती कमी परिणामकारक ठरते असें नाहीं. सूर्योदय रोज होतो, तरी सर्व देशांत आणि सर्व भाषांतील कवींना आणि रसिकांना सूर्योदयाची शोभा आणि त्याची अुपमा अुत्साहदायकच वाटते.

मकरसंक्रान्ति ही दिवसाचा रात्रीवरील विजय, अुन्हाचा थंडीवरील विजय, प्रवृत्तीचा निद्रेवरील विजय सुचविते. आषाढ महिन्यापासून दीर्घतमा रात्रीचा विजय होत होता, दिवसेंदिवस प्रवृत्ति कमी होत होती, सर्वत्र अेकप्रकारची ग्लानि पसरली होती, सूर्याचे किरण कमी होत होते. दीपोत्सव करून आपण कसावसा नव्या वर्षाचा अुत्सव साजरा केला; पण थंडीची कठोरता मात्र वाढतच गेली. महात्मा सविता जणूं दक्षिणेकडे बंदिवासांतच पडला असावा. तो केव्हां बरें सुटेल ?

आपत्तीलाहि अंत असतोच. सूर्याचें दक्षिणेकडील संक्रमण पुरें झालें आणि अुत्तरायणाला सुरुवात झाली. सवित्याचे किरण जास्ती जास्ती पसरूं लागले, दिवसाची पळें वाढूं लागलीं, रात्रीची कमी व्हायला लागलीं, रात्रीच्या साम्राज्याचा क्षय सुरू झाला अशीं चिन्हें स्पष्ट दिसूं लागलीं, आणि महात्मा सविता दक्षिण दिशेच्या बंधनांतून आतां जरूर मुक्त होणार अशी खात्री व्हायला लागली. झालें, हा भावी मुक्तीचा आनंद म्हणजेच मकरसंक्रमण.

हें मकरसंक्रमण आपण कसें साजरें करावें ? गंगा नदीच्या तीरीं जाअून पहा. तिकडे असंख्य भाविक लोक गंगेच्या पटावर झोपड्यः बांधून कितीतरी दिवसांपासून तेथेंच पडलेले आहेत, गंगा-यमुनांचा हिंदुधर्माच्या सरस्वतीशीं जेथें संगम होतो तेथें हजारो लोक प्रयागस्नानासाठीं येत असलेले मी आत्तांच पाहून आलों आहे. सूर्योदयापूर्वी अुठून नामस्मरण करीत आणि भीष्ममाता गंगेचा किंवा धर्मभगिनी यमुनेचा जयजयकार करीत ते स्नानाला जातात. यमुनेंत स्नान करणारा काय यमाला भिअील? गंगेत स्नान करणाऱ्याची दृढता काय भीष्मासारखी होणार नाहीं. प्रयागाचें स्नान म्हणजे निर्भयतेची आणि दृढतेची दीक्षाच आहे.

मकरसंक्रमण हा जसा विजयाचा अुत्सव आहे तसाच स्नेहाच्या आणि गोडीच्या वृद्धीचाहि अुत्सव आहे. तसाच भुकेनें आणि थंडीनें क्षीण झालेल्या लोकांनी लांडग्यासारखे अेकमेकाबरोबर लढावें यांत नवल नाहीं; पण प्रकाशाच्या आणि समृद्धीच्या वेळीं तें सर्व विसरून गेलें पाहिजे. म्हणूनच हिंदुस्तानांतील अनेक प्रांतांत अुत्तरायणाच्या सुरुवातीला तीळ आणि गूळ अेकमेकांना देण्याचा रिवाज आहे. हिवाळ्यांत तो अेक पौष्टिक खुराक आहे, अेवढ्याचकरितां नव्हे, तर स्नेह-माधुर्याची वृद्धि सुचविण्याकरितां (तिळांत स्नेह–संकृतांत 'स्नेह' म्हणजे तेल-आणि गुळांत माधुर्य आहे.) सर्व धान्यांत तिळाची अुत्पत्ति सर्वांत जास्त असते. म्हणूनच त्याची-प्रेमाची देवघेव कल्याणकारक मानली आहे.

मकरसंक्रांतीच्या दिवशीं अेकमेकाला तिळगूळ देअून अेकमेकाच्या जुन्या अपराधांची क्षमा मागण्याची प्रथा जर मनापासून स्वीकारण्यांत आली तर समाजांत अैक्य आणि अुत्साह अवश्य वाढेल आणि वाढत्या सूर्याप्रमाणें देशाचें सौभाग्यहि वाढेल.

अुत्तरायणाचा हा संदेश अुन्नतिकारक आहे. स्वराज्याच्या दिवसांत तो आपण विसरून जातां कामा नये.

अुत्तरायणानंतर वसन्तपंचमी, त्यानंतर रथसप्तमी करून शेवटीं भोगविलासांना जाळून टाकून संयमधर्म स्वीकारण्यासाठीं होलिकोत्सव करायचा असतो. ॠतुचक्राच्या परिवर्तनांतहि धर्म वास्तव्य करतो. निसर्गाशीं ज्याचा सहकार तुटलेला नाहीं त्यालाच तो प्राप्त करून घेतां येतो.

१८-१-२३

---

# मकरसंक्रान्ति

**पौष मास** **१ दिवस.**

मकरसंक्रमणाचा दिवस कोणता हा झगडा यानंतर सुरू व्हायचा आहे. सायन पंचांगवाले डिसेंबरच्या २३ तारखेलाच चिकटून राहातील; आणि सामान्य पंचांगें आपली जानेवारीच्या १३–१४ तारखेपर्यंत वाट पहातील.

मकरसंक्रांतीचा दिवस आपली पंचांगाची पद्धति समजून घ्यायला आणि समजावून द्यायला अनुकूल आहे. या दिवशीं तिळगुळाचा प्रचार करण्याजोगा आहे. सबंध पौष महिनाभर जरी तीळ खाल्ले तरी बरेंच आहे. अुतरत्या हिंवाळ्यांत स्निग्ध अन्न पौष्टिक असतें. पण मुख्य प्रवृत्ति पतंग अुडविण्याची असावी; मात्र त्याचा दोरा स्वदेशी असला पाहिजे. मुलें जर बाजारांतून आयते तयार पंतग घेअून येतील तर हा सण ठेवण्यांत कांहीं अर्थ नाहीं. पतंग घरांतच तयार व्हावेत आणि अेकत्र मिळून अुडवावेत. पतंग बनविण्याचें अेक विशिष्ट शास्त्र आहे.

अितिहासाच्या आणि समाजशास्त्राच्या रसिक अध्यापकानें या दिवशीं जीवनसंक्रमणावर किंवा राष्ट्रीय संक्रमणावर व्याख्यान दिलें तर तें अैकण्यासाठीं तयार राहिलें पाहिजे.

---

## वसंत : : ३८

### ( माघ शुद्ध ५ )

वसंतपंचमी म्हणजे ॠतुराजाचें आगमन.

माघ शुक्ल पंचमीला आपण वसंतपंचमी म्हणतों. पण प्रत्येक मनुष्याची याच दिवशीं वसंतपंचमी असते असें नाहीं. थंड्या रक्ताच्या माणसाला वसंतपंचमी अितक्या लवकर येत नाहीं.

वसंतपंचमी हें निसर्गाचें यौवन आहे. ज्याची राहाणी निसर्गाहून भिन्न झालेली नाहीं, निसर्गाच्या रंगानें जो रंगतो, तो वसंताचें आगमन, न सांगतां अनुभवतो. नदीच्या क्षीण प्रवाहांत अेकाअेकी घोडापूर आलेला जसा आपण पहातों. तसा वसंत येतांनाहि आपल्याला बरोबर दिसतो. मात्र सर्वांच्या हृदयांत अेकाच वेळीं तो प्रवेश करीत नाहीं.

वसंत जेव्हां येतो तेव्हां यौवनाचा अुन्माद बरोबर घेअून येतो. यौवनांत सुंदरता असते, पण नेहमीं क्षेम असतेंच असें नाहीं. यौवनांत शारीरिक आणि मानसिक स्वास्थ्य संभाळणें फारच कठीण असते, तीच स्थिति वसंताचीहि आहे. तारुण्याप्रमाणें वसंत हाहि लहरी आणि चंचल असतो. घटकेंत थंडी तर घटकेंत अून्ह; घटकेंत कंटाळा तर घटकेंत अुल्लास. गेलेली शक्ति हिंवाळ्यात परत मिळवितां येते, पण हिंवाळ्यांत मिळवलेली शक्ति वसंतांत संभाळणें ही कांहीं सोपी गोष्ट नाहीं. वसंतांत संयम पाळला गेला तर वर्षभर आरोग्य संभाळतां येअील. वसंतॠतूंत प्राणीमात्रावर आकर्षक कान्ति येते, पण ती तितकीच धोक्याची असते.

वसंताच्या अुल्लासांत संयमाची भाषा शोभत नाहीं, सहनहि होत नाहीं. पण त्याचवेळीं त्याची अत्यंत जरूर असते. क्षीण झालेल्या माणसानें पथ्य पाळलें तर त्यांत आश्चर्य तें काय ? त्यांत लाभ तरी कसला ? कसेंबसें जगणें यांत काय स्वारस्य ? जतन केलेला वसंत हाच जीवनाचा ' लाहो ' आहे.

वसंत हा अुधळ्या असतो. यांतहि निसर्गाचें तारुण्यच प्रकट होतें. फुलें आणि फळें कितीक येतात आणि कितीक कोमेजूनहि जातात. जणूं काय निसर्ग हिंवाळ्यांतील कंजुषपणाचा मूडच घेत असावा. वसंतांतील समृद्धि ही कांहीं शाश्वत समृद्धि नव्हे. दिसतें तितकें टिकत नाहीं.

राष्ट्राचा वसंतहि पुष्कळ वेळां अुधळ्या असतो. कितीक फुलें आणि फळें मोठी आशा दाखवितात. पण परिपक्व होण्यापूर्वींच करपून गळून पडतात. शरदृतूपर्यंत टिकतात तींच खरीं. राष्ट्राच्या वसंतकाळीं संयमाची वाणी अप्रिय असते, पण तीच पथ्यकर असते.

अुत्सवांत विनय, समृद्धीमध्यें मनःस्थैर्य, यौवनांत संयम हेंच सफळ जीवनाचें रहस्य आहे. फुलांच्या सुगंधाची फळांच्या रसामध्यें परिणति होणें यांतच त्याचें सार्थक आहे.

वसंतपंचमीचा अुत्सव शास्त्रकारांनीं निर्माण केलेला नाहीं, धर्माचार्यांनी मान्य केलेला नाहीं. कवींनी आणि गायकांनी, तरुणांनी आणि रसिकांनी तो बसविला आहे, कोकिळानें त्याला आमंत्रित केलें आहे आणि फुलांनी त्याचें स्वागत केलें आहे. वसंत म्हणजे पक्ष्यांचें गाणें, आम्रमंजरीचा सुगंध, शुभ्र अभ्रांची विविधता आणि पवनाची चंचलता. पवन हा तर नेहमींच चंचल, पण वसंतअृतूंत त्याची विशेषभावानें क्रीडा चालते. जिकडे जाअील तिकडे भरवेगानें जाअील, जिकडे वाहील तिकडे भरवेगानें वाहील, जेव्हां गाअील तेव्हां भर आवेशानें गाअील, नाहीं तर घटकेंत पडूनहि राहील.

वसंतापासून संगीताचें नवीन सत्र सुरू होतें. गायक हे अष्टौप्रहर वसंताचे आलाप घेअूं शकतात. ते पूर्वरात्र पहायचे नाहींत कीं अुत्तर रात्र पहायचे नाहींत.

संयम, औचित्य आणि रस या तिहींचा संयोग होतो तेव्हांच संगीताचा प्रवाह सुरू होतो. जीवनांतहि अेकटा संयम स्मशानवत् होअील; अेकटे औचित्य दंभरूप होअील; आणि अेकटा रस क्षणजीवि विलासितेंतच खपेल. तिन्हींचा संयोग हेंच जीवन आहे. वसंतअृतूंत निसर्ग आपल्याला रसाचा पूर देतो. अशावेळीं संयम आणि औचित्य ही आपली पुंजी असली पाहिजे.

फेब्रु. १९२३.

# वसंत–पंचमी

माघ शु. ५ १ दिवस

हा निसर्गाचा सण आहे. शास्त्रांत त्याला स्थान नाहीं. खरें पाहातां आपल्याला आपल्या मनाला येअील तो दिवस वसंतोत्सवाकरितां नक्की करतां येअील. या दिवशीं सकाळच्या वेळीं सुंदर सफाअी करून नंतर सबंध दिवसांत संगीताचे दोन जलसे ठेवणें हेंच अुचित वाटतें. ' सफाअी ' मध्यें कपडे धुणें, अंथरुण, सामान-सुमान वगैरे अुन्हांत ठेवणें, घर आंतून बाहेरून साफ करणें, आणि आसपास सर्वत्र स्वच्छ व्यवस्था ठेवणें यांचा समावेश होतो. गाण्याची मैफल अेक सकाळीं नअू दहा वाजतां किंवा दोनप्रहरीं दोन वाजतां आणि दुसरी संध्याकाळीं प्रार्थनेनंतर, अशी ठेवली तर भिन्न भिन्न वेळचे राग चांगल्या प्रकारें गातां येतील आणि अेकसारखा ताण पडणार नाहीं. आणि भरपूर अुत्साह असेल तर अेक जलसा आणि अेक नाटक असेंहि ठेवतां येअील. आपल्या अुत्सवामुळें दिवसाच्या मुख्य कार्यक्रमांत शक्य तर फेर पडूं देतां नये.

# मंगलमूर्ति भीष्म :: ३९

( माघ शु. ८ )

आज भीष्माष्टमीचा पवित्र दिवस आहे. भारतीय युद्धानंतर बाणांची शय्या करून अुत्तरायणाची वाट पहाणाऱ्या आणि दरम्यानच्या काळांत मानवजातीला धर्माची प्रतिष्ठा संभाळील अशा राजनीतीचा अुपदेश करणाऱ्या अखंड ब्रह्मचारी भीष्माचार्यांचा हा पुण्यदिवस आहे.

महाभारताच्या मंगलमूर्ती तीन : भीष्म, कृष्ण आणि व्यास. या त्रिमूर्तींतहि प्रधान स्थान भीष्मांचेंच. कृष्णाचें विभूतिमत्व दिव्य असल्यामुळें त्याला भव्य नाहीं म्हणतां येणार. व्यास अेखाद्या वानप्रस्थाप्रमाणें दूरदूरच राहातात. समस्त महाभारतावर आपली मंगल छाया पसरविणारे अेकटे धर्मात्मा भीष्म हेच होत. ते सागरासारखे गंभीर, हिमालयासारखे अुत्तुंग – प्रचंड आणि अनंत आकाशाअितके शांत, निर्मळ आहेत.

भीष्म हे कृष्णाच्या अुत्तम भक्तांपैकीं अेक आहेत.

प्रह्लाद–नारद–पराशर–पुण्डरीक–
व्यासाम्बरीष–शुक–शौनक–भीष्म–दाल्भ्यान् ।
रुक्मांगदार्जुन-वसिष्ठ-बिभीषणादीन्
पुण्यान् इमान् परमभागवतान् स्मरामि॥

अशा रीतीनें ज्या ज्या परमभागवतांचें रोज सकाळीं अुठून आपण स्मरण करतो त्यांच्यामध्येंहि भीष्मांचें स्थान वेगळेंच आहे. अितर भागवत भगवंताच्या आधीन राहून त्याच्या प्रेरणेला अनुरूप असें वर्तन ठेवतात. भीष्मांच्या नशीबीं आपल्या परमप्रभूला अखंड विरोध करणेंच आलें. आणि तसें असूनहि त्यांची विरोधभक्ति मात्र नव्हती.

भीष्म आणि कृष्ण यांचा राष्ट्रपुरुष म्हणून विचार करतांनाहि त्यांचा आत्यंतिक स्वभावभेद स्पष्ट दिसून येतो. दोघेहि धर्मनिष्ठ, धर्मआपरायणपि

धर्मकार; परंतु दोघांचें जीवनतत्त्वज्ञान अगदीं भिन्न. भीष्मांचें जीवनतत्त्व बहुवंशीं प्रभु रामचंद्रांच्या जीवनतत्त्वासारखें आहे. दोघेहि मर्यादापुरुषोत्तम, स्वतःला धर्मपरतंत्र मानणारे आणि धर्म पालनासाठीं कसलाहि त्याग शीतलवृत्तीनें करणारे. मनुष्यजातीला अुदाहरण घालून देणारे हे दोघेच. यांच्या दुसऱ्या बाजूला कृष्ण जसा प्रतिष्ठाभंजक तसाच मर्यादाभंजक, धर्ममार्गांतील प्रत्येक नियमाला अपवाद कसा असूं शकतो, हें दाखविण्यासाठींच जणूं त्यांनें अवतार धारण केला होता. बंकिमचंद्रांनी कृष्णाचें अेक चरित्र लिहिलें आहे. चरित्र नव्हे, कृष्णावर घेतलेल्या आक्षेपांचें अेक मोठें खंडनच आहे तें. न्यायनिपुण लोक आपलें बुद्धिसर्वस्व खर्च करून श्रीकृष्णाची बाजू न सांवरतील तर त्याच्या अेकाहि कृत्याची योग्यता ध्यानीं यायची नाहीं. हालानें पिचत पडलेल्या वासराला मरणाच्या स्वाधीन करून जसें गांधीजींनी अहिंसाधर्माचें पालन केलें, असेंच कांहींतरी करून प्रत्येक खेपेला श्रीकृष्णांनी धर्मपालन केलें असावें असा भास होतो. धर्माच्या सिद्धांताच्या मुळाशीं जाअून त्याच्या तत्त्वार्थ-पालनासाठीं शब्दार्थाला विरोध कसा करावा याचाच श्रीकृष्णानें अभ्यास केला असला पाहिजे.

देवव्रतानें (भीष्माचार्यांनीं) भरज्वानींत अेक भीष्मप्रतिज्ञा करून राज्याचा आणि स्त्रीचा त्याग केला. या अेका प्रतिज्ञापालनासाठीं त्यांनी चोहोंबाजूंनी आपली हानि होअूं दिली. प्रतिज्ञापालनाचें प्रयोजन संपलें तरीसुद्धां त्यांनी ती प्रतिज्ञा सोडली नाहीं. आणि त्याचें नशीब तरी किती विचित्र. त्यांनी राज्याचा स्वीकार केला नाहीं तरी पण त्याचा सारा भार मात्र त्यांनाच वाहावा लागला. भावाभावांमध्यें झगडा होअूं नये म्हणून त्यांनी लग्न टाळलें परंतु त्यांना कितीतरी वियोग आणि कितीतरी लग्नें लावावीं लागलीं. फार काय सांगावें? स्वयंवरांत भाग घेअून त्यांनीं यौवनसंपन्न मुलींनाहि जिंकून आणलें? आणि भावाभावांमधील जो झगडा टाळण्यासाठीं त्यांनीं अखंड ब्रह्मचर्य स्वीकारलें त्याच झगड्यापायीं आपल्या अिच्छेविरुद्ध असत्पक्षाच्या बाजूनें लढून आणि लाखो लोकांचा संहार करून त्यांना स्वतःचे प्राण अर्पण करावे लागले! भीष्म–प्रतिज्ञा हीं जशी जगताला आदर्शभूत आहे तसें त्यांचें ब्रह्मचर्यहि तितकेंच अलौकिक आहे. या ब्रह्मचर्याच्या बळावर ते परमज्ञानी, परमसमर्थ आणि धर्मज्ञ झालें अितकेंच नव्हे तर अिच्छामरणीहि झाले. परंतु त्यांच्या या प्रतिज्ञेचा कौरवकुळाला किंवा आर्यसंस्कृतीला काय लाभ झाला? कांहीं नाहीं तरी निदान आपण सत्याप्रीत्यर्थ युद्ध करीत आहों अेवढें तरी समाधान

त्यांना मिळायला पाहिजे होतें. राज्यावरील हक्क सोडून ते राजाचे सेवक झाले. आपली सर्व अिमानदारी त्यांनी सिंहासनाला अर्पण केली; जें मी घेतों तें या गादीचें अन्न आहे, गादीची जी आज्ञा होअील ती शिरसावंद्य मानली पाहिजे, अशी सनदशीर वृत्ति त्यांनी धारण केली. खरोखर भीष्मांसारखा तंत्रवादी (Constitutionalist) दुसरा कोणी झाला नसेल. परंतु, तंत्रालाच देव समजून वागल्यानें त्यांनीं राष्ट्रहिताचा मात्र सत्यानाश केला.

× × × ×

महाभारतांतील धर्मधुरंधर दोन: श्रीकृष्ण आणि भीष्म. श्रीकृष्णाचा अुपदेश भगवद्गीतेंत सामावला आहे. भीष्मांचा अुपदेश अेकत्र केलेला मिळत नाहीं. त्यांचा प्रसिद्ध राजधर्म शांतिपर्वांत आहे. पण भीष्मांनी आपल्या शिकवणीचें सार देह सोडण्याच्या वेळीं तीन ओळींतच दिलें आहे. महाभारतानें भीष्माचार्यांचें अिच्छामरणी असें वर्णन केलें आहे. राजा युधिष्ठिराला जेवढें सांगायचें होतें तें सर्व भीष्मांनी सांगून टाकलें. त्या नंतर भगवान् श्रीकृष्णाकडे वळून देह सोडण्याची भगवंताकडून अनुज्ञा मागितली. पितृभक्त आणि निष्पाप भीष्मांना श्रीकृष्णानें अनुज्ञा दिली. सारे पांडव पितामहांच्या आसपास गोळा झाले. त्यावेळी त्यांना आणि त्यांच्या द्वारा सर्व भारतवासीयांना भीष्माचार्यांनी खालील वचनें सांगितलीं:

प्राणानुत्स्रष्टुमिच्छामि तत्रानुज्ञातुमर्हसि ।
सत्येषु यतितव्यं वः सत्यं हि परमं बलम् ॥
आनृशंस्यपरैर्भाव्यं सदैव नियतात्मभिः ।
ब्रह्मण्यैर्धर्मशीलैश्च तपोनित्यैश्च भारताः ॥

"सत्याकरितां निरंतर प्रयत्न करा. सत्य हेंच परमबल आहे. सदोदित स्वतःच्या मनावर, हृदयावर ताबा ठेवून दयाभाव अंगीं बाणवून घ्या. दुष्ट वृत्तीला वश होअूं नका. प्रजेला शिक्षण देणाऱ्या वर्गाचें नेहमीं पोषणक रीत राहा. धर्माच्या प्रेरणेप्रमाणें चाला; आणि आपली सगळी शक्ति कमावीत राहा."

आजसुद्धां भारतवासीयांना दुसरा अुपदेश काय असणार?

———

# भीष्माष्टमी

माघ शु. ८ १ समय

हा जुना सण जवळजवळ विसरला गेला होता. कित्येक ठिकाणीं त्याचें पुनरुज्जीवन होऊं लागलें आहे. आपल्याइकडेहि तसा प्रयत्न झाला पाहिजे. भीष्म ब्रह्मचारी, दृढव्रत, भगवद्भक्त आणि नीतिज्ञ होते. महाभारतामधून भीष्मांच्या चरित्राचें सार काढून हा गंगाप्रसाद विद्यार्थ्यांना द्यावा—विशेषेंकरून कर्ण आणि भीष्म यांचा संवाद अवश्य द्यावा. हा दिवस शुद्ध सात्त्विक आहार घेऊन प्रार्थनापूर्वक ब्रह्मचर्याचें व्रत घेण्याचा आहे. हा सण जर समाजांत मूळ धरील तर त्यांत आणखी पुष्कळ भर घालतां येण्यासारखी आहे. आदर्श ब्रह्मचाऱ्यांची नामावली तयार करून त्यांचीं चरित्रे या दिवशीं सांगावीं. उदाहरणार्थ रामकृष्ण परमहंस आणि शारदादेवी, ईशु, शुकदेव, योगवासिष्ठांतील चुडाला, हनुमान, वनवासी लक्ष्मण, रामदास इत्यादि.

या दिवशीं लाठी, कवायत आणि संघव्यायाम ठेवतां येईल.

---

माघ व० ९ १ दिवस.

लोकसंग्रह हा रामदासांचा धर्म होता. जनतेंतील धर्मवृत्तीपासून धर्मतेज कसें अुत्पन्न करावें याची त्यांनी अखंड काळजी वाहिली. ब्रह्मचारी आणि गृहस्थाश्रमी असे दोन प्रकारचे सेवक त्यांनी तयार केले, आणि संस्था कशा चालवाव्यात याचें बाळकडू त्यांनीं महाराष्ट्राला दिलें.

आखाडे, मारुती, मठ आणि भिक्षा या त्यांनी स्थापन केलेल्या चार संस्था; मर्यादापुरुषोत्तम रामाची अुपासना हा त्यांचा युगधर्म. रामदासांचें कार्य म्हणजे संन्याशाचा विराट् संसार.

रामदासांचें मिशन अशाप्रकारचें असल्यामुळें लग्नापासून जीव घेऊन पळ काढणाऱ्या या ब्रह्मचाऱ्याला शिव्याणी कराव्या लागल्या आणि लोकापवादहि सहन करावा लागला. इतर संतांनी सदाचाराचा प्रचार केला. रामदासांनी सदाचारी लोकांचें संघटन केलें.

शिवाजीच्या अितिहासांत रामदासांचें आणि रामदासी संप्रदायाचें स्थान कोणतें आहे या विषयाच्या चर्चेनें भलतें रूप धारण केल्यानें रामदासांचा बराचसा कार्यभाग वर्तमानकाळीं नासला आहे. एका बाजूनें अतिशयोक्ति झाली म्हणजे दुसऱ्या बाजूनें तितकाच निकराचा आणि आंधळा प्रतिकार करणें हा आपल्या महाराष्ट्रीयाचा स्वभावगुण आहे. त्याची मीमांसा करून तो दूर करण्याचा अुपाय शोधणें हा दासनवमीचा प्रधान कार्यक्रम ठरविला पाहिजे. ' वारकरी आणि धारकरी ' असा वाद माजविणें म्हणजे रामदासांचा खून करून त्याच जागीं इतर संतांचा बळी देणें आहे

रामदासांच्या कार्यांत धर्मांतराला आळा घालण्याचा अेक भाग असल्यानें त्यांनी वर्णाश्रमाच्या रूढीला, जातीभेदाला आणि कांहीं अंशीं अस्पृश्यतेला अुचलून

धरलें असेल. पण तेवढ्यामुळें त्यालाच महाराष्ट्रधर्म समजणें म्हणजे रामदासांना न जाणणें आहे.

दासनवमीच्या दिवशीं दासबोधाचें पारायण न ठेवतां त्यांतील निवडक वेच्यांचें वाचन झालें पाहिजे. अेखाद्या ग्रंथाचें पारायण म्हणजे त्याचें मारण आणि अुच्चाटण आहे. अर्थाकडे ध्यान न देतां अतिशय वेगानें अमुक वेळांत तो ग्रंथ ओढून काढणें आणि नंतर सावकाशीनें प्रसादाचें भक्षण करणें याचें नांव पारायण अशी स्थिति झाली आहे. या प्रकारानें पाप वाढत नसलें तरी पुण्यसंचय खात्रीनें होत नाहीं.

मनाच्या श्लोकांचा नित्यपाठ महाराष्ट्रांत शिथिल झाला आहे. ' मनाचे श्लोक ' ही समर्थांची मुख्य शिकवणूक आहे. तिचा नित्यपाठ पुनः जागृत केला पाहिजे. हा सत्पुरुषधर्म पुनः जागृत झाला तरच आपल्या समाजाचा अुद्धार होअील.

दासनवमीच्या दिवशीं आखाड्याच्या अुत्सवाबरोबर बालचर, बालचमू आणि व्रतचारी वगैरे संस्थांचे अुत्सवसुद्धां केले पाहिजेत.

रामदासांची भिक्षा आज मुष्टिफंडाच्या रूपानें नवा अवतार घेअूं शकते. मुष्टिफंडांतील रहस्य हे आहे कीं, अधिक दिलें असतां तें घेअूं नये. ज्याप्रमाणें सर्वांचें अुत्पन्न सारखें असलें पाहिजे अशी अेक कल्पना आहे त्याचप्रमाणें गरीबांच्या मदतीनेंच चालणारीं समाजहिताचीं कामें करावयाचीं असतील तर सर्वांवर भार सारखा पडावा. अेखाद्याचा अुत्साह जास्ती आहे अेवढ्यासाठीं त्याच्यावरच सगळा भार पडूं नये, अशी कल्पना नियमाच्या मुळाशीं आहे.

आपल्या प्रांतांत ठिकठिकाणीं मुष्टिफंड सुरू होअून बंद पडले आहेत याचें कारण मुष्टिफंडाच्या प्राप्तीच्या मानानें श्रम अधिक पडतात. प्रारंभिक अुत्साह शेवटपर्यंत टिकत नाहीं ( पण जीं कामें अखंड चालावयाचीं आहेत त्यांना शेवट असा नसतोच ). आणि मुष्टिफंडाच्या जोरावर जीं कामें हातीं घेतलीं जातात तीं केवळ मुष्टिफंडाच्या अुत्पन्नांतूनच चालणारीं असलीं पाहिजेत, ही मर्यादाहि ध्यानांत घेतली

जात नाहीं. मुष्टिफंड मागण्यासाठीं शाळेंतील मुलांना वापरणें ही मोठीच चूक आहे. ज्यांनी जीवनरहस्य ओळखलें आहे आणि ज्यांनी स्वार्थत्यागपूर्वक देशसेवा करण्याचें व्रत घेऊन दीक्षित जीवन पसंत केलें आहे अशांनीच मुष्टिफंड मागावा. शाळेच्या मुलांना भिक्षा मागावयास लावलें असतां त्यांचा तेजोवध होतो.

वारकऱ्यांच्या तत्त्वज्ञानाला कंटाळून राष्ट्रीय वृत्तीच्या रजोगुणी लोकांनी रामदासी संप्रदाय चालविण्याचें घातलें होतें. पण त्यांतील तत्त्व ओळखून व तें संभाळून त्यांत कालोचित्त रूपांतर करण्याची कला त्यांचेजवळ नसल्यानें भुताप्रमाणें अुलट्या पायांनीं पुढें जाण्याचा प्रयत्न त्यांनी केला. जिवंत शरीरांत ज्याप्रमाणें हळूहळूं जीवनानुकूल फेरबदल होत असतात त्याचप्रमाणें सामाजिक संस्थांतहि झालें पाहिजेत.

रामदासी संप्रदाय महाराष्ट्रांत चांगलाच रुजला होता. आधुनिक धर्मपरायण राष्ट्रसेवक हे त्या संप्रदायाचे अुत्तराधिकारी आहेत. पण समर्थभक्तांमध्यें समाजशास्त्राचें आकलन नसल्यानें आणि राष्ट्रसेवकांमध्यें धर्माचें भव्य दर्शन नसल्यानें अिष्ट कार्य घडून आलें नाहीं.

१९-१२-३९

## महाशिवरात्र :: ४१

### ( माघ वद्य १४ )

### १

### ( अेक पत्र )

...तुम्ही आज महाशिवरात्रीचा सण कशा प्रकारें घालवीत असाल याचाच विचार सारखा मनांत येत आहे. शिवरात्रीचा सण हा अुत्सव नसून व्रत आहे. शिवरात्रीचा सण शैवसांप्रदायी मानला जातो म्हणून वैष्णव त्याविषयीं अुदासीन असतात. हा शैव–वैष्णवाचा भेद अेके काळीं आपल्या देशांत बराच तीव्र होता. माणसांत जोंवर भांडणाची वृत्ति आहे तोंवर वाटेल तो भेद पुढें करून तो भांडेल. थेट दक्षिणेकडे शैव--वैष्णवांनी जुन्याकाळीं परस्परांचें रक्त कांहीं थोडे नाहीं वाहविलें !

शिवरात्रीचें माहात्म्य तुम्हां सर्वांना माहीतच आहे. 'हरणांचें संस्मरण' याविषयीं तुम्हीं वाचलें अैकलें आहेच. वचन पाळण्याचा निर्धार, मातृवात्सल्य आणि दुसऱ्यासाठीं स्वात्मार्पण हा बोध तुम्ही या गोष्टीतून घेतलाच असेल. पण दुसऱ्या अेका दृष्टीनें शिवरात्रीचें महत्त्व मला स्फुरत आहे.

आपल्या धर्मात जीवदयेचा बोध अेका सर्वोच्च आणि शुद्ध भूमिकेवरून केला गेला आहे. तिर्यंच अर्थात् मनुष्येतर प्राणी हेहि अीश्वराचींच लेकरें आहेत. अीश्वराच्या हृदयांत आपल्या अितकेंच त्यांच्याविषयींहि वात्सल्य वसत आहे. मूक पशुपक्षांनाहि आपल्यासारख्याच भावना असतात. त्यांना दुःखी करणें हा अधमपणा आहे. पशूंना पीडा दिल्यानें अीश्वर विशेष नाराज होतो हा बोध आपल्या धर्मात अनेक सुंदर आणि परिणामकारक रीतींनी केला गेला आहे. पशु दयापात्र नसून आपल्या प्रेमाचे अधिकारी आहेत हा आपला धर्मसिद्धांत आहे. जीवदया नव्हे तर जीवमात्राविषयीं आत्मौपम्य–प्रेम ही भावना आपल्या धर्माला मान्य आहे, अभीष्ट आहे.

जीवप्रेमाचा पहिला पक्षपाती म्हणजे आपला वाल्मीकी. त्यानें रामायणांतील गोष्टींत देव, राक्षस, माणसें यांच्याबरोबर पशुपक्ष्यांनाहि सारखेंच स्थान दिलें आहे. तिर्यग् योनींताहि वीर, मुत्सद्दी, साधू आणि प्रेमसेवक असतात याविषयीं--जणूं आपण कांहीं नवीन गोष्ट सांगत नाहीं, स्वाभाविकच लिहीत आहों अशा पद्धतीनें-वाल्मीकीनें गान केलें आहे. भक्तशिरोमणि हनुमान, अुग्रशासन, सुग्रीव, आर्तत्राण जटायु आणि सेनुपति जांबुवान यांच्याविषयीं मनांत दयाभाव अुत्पन्न होत नाहीं, आदरभावच अुद्भवतो. ते पशुपक्षी आहेत ही गोष्टहि आपण विसरून जातों. अितका समभाव हाच जीवप्रेमाचा खरा पाया आहे.

वसिष्ठ आणि कामधेनु, दिलीप आणि नंदिनी, मुंगूस आणि राजसूय यज्ञ, गज–ग्राह, वेदांतील सरमा आणि चोरी करणारे पणी लोक (फेनीशिअन्स), धर्मराजाचा श्वान, दमयंतीचा हंस, नळ आणि कर्कोटक, भगवान् मनूला वांचाविणारा मत्स्य, रामाला मदत करणारी खार--असे अेक ना दोन असंख्य प्रसंग आपल्या धर्मग्रंथांतून वर्णन केलेले आहेत, त्यामुळें प्राण्यांविषयीं समभाव दृढ होतो. आपले कित्येक अवतारसुद्धां मनुष्येतर आहेत. जातककथा, पंचतंत्र, हितोपदेशांतील गोष्टी या सर्व याच दिशेनें काम करतात. ' हरणांचें संस्मरण ' सुद्धां आपल्यांत मनुष्येतरांविषयीं प्रेम आणि समभाव अुत्पन्न करतें.

तेव्हां शिवरात्रीच्या दिवशीं आपण काय करूं या ? सिद्धैया म्हणेल गोरक्षणासाठीं २००० वार सूत कांतूं या. किशोरलालभाअी म्हणतील, आपल्या आश्रमांत विनवारशीं कुत्रीं आहेत त्यांना आपण कां आपलेंसें करूं नये ? प्रत्येक कुत्र्याला जर आपला म्हणून आपल्या आ खायला घालणारा कोणी आहे असें वाटूं लागलें तर तो आर्य बनेल आणि नालायक कुत्र्यांना येथें येअूं देणार नाहीं. डाह्याभाअी म्हणतील कीं प्रथम गाडींत शक्य तर न बसण्याचा आणि ओझें कमींत कमी ठेवण्याचा नेम जर आपण पाळूं तर जीवप्रेमाचें सार्थक होअील. मगनलालभाअी म्हणतील मुलें कुत्र्यांच्या मागें लागून त्यांना मारतात तेवढें बंद केलें म्हणजे पुष्कळ झालें. ठाकोरभाअी म्हणतील खोल्या स्वच्छ ठेवून त्यांत जाळीं होअूंच न देणें हें जीवदयेचें सुंदर अंग आहे. माझ्यासारखा म्हणेल कीं रात्रीं नदीच्या पाण्यांत पडून आंत निजलेल्या माशांना त्रास नाहीं दिला म्हणजे शिवरात्रीच्या

प्रसंगीं माशांना शिव-रात्रि होअील. शंकर म्हणेल अुन्हाळ्यांत चिमण्यांच्यासाठीं प्यायला पाणी ठेवणें हें अगत्याचें आहे. प्रत्येक प्रस्तावांत कांहींना कांहीं सौंदर्य आहे, आणि हे सारेच नियम आश्रमजीवनांत शोभण्यासारखे आहेत.

मग शिवरात्रीचें स्मरण करून तुम्ही कोणता नेम घेता बोला ! हें काम प्रेमाचें आहे आणि प्रेमानेंच करायचें आहे. हें व्रत जाहीर करण्याची आवश्यकताच आहे असें नाहीं. आपली निवड करावी आणि त्याप्रमाणें अुत्साहपूर्वक चालूं लागावें.

## २. हरणांचें संस्मरण

अेक विशाल अरण्य होतें. वीसवीस तीसतीस कोसपर्यंत माणसाची झोंपडी कीं प्रवाशाची कामचलाअू चूलहि कुठें आढळायची नाहीं. त्या अरण्यांत अेका रमणीय तलावाच्याजवळ कित्येक हरणें राहात असत. तलावाच्या कांठीं अेक बेलाचें झाड होतें. या झाडाखालीं पाषाणरूपानें महादेव वास करीत होते. हरणें रोज तलावांत स्नान करायचीं. महादेवाचें दर्शन घ्यायचीं आणि चरायला जायचीं. दुपारीं येअून बेलाच्या सावलींत विश्रांति घ्यायचीं, आणि संध्याकाळीं तलावाचें पाणी पिअून महादेवाचें दर्शन घेअून झोंपून जायचीं. कोणत्याहि शास्त्राचें अध्ययन न करतांच हरणांना धर्माचें ज्ञान झालें होतें, त्यामुळें तीं संतोषपूर्वक आपलें निर्दोष जीवन चालवीत होतीं.

माघ महिना होता; कृष्णपक्षांतील चतुर्दशी. अेक भयंकर पारधी त्या वनांत शिरला. नुक्तीच संध्याकाळ झाली होती. पारध्याला भूक फार लागली होती. पारध्याची भूक म्हणजे सामान्य नव्हे. दुसरें कांहीं मिळालें नाहीं तर कच्चेंच्या कच्चें मांससुद्धां दाढेखालीं रगडून तो खाअील. पण या आपल्या पारध्याला स्वतःच्या भुकेचें दुःख वाटत नव्हतें. घरांत कच्चींबच्चीं भुकेली आहेत, त्यांना काय देअूं ? कोणत्या तोंडानें घरीं जाअूं ? शिकार नाहीं मिळाली तर रित्या हातांनीं घरीं जाण्यापेक्षां रानांतच रात्र काढावी; कदाचित् कांहीं हातीं लागेलहि. असा विचार करीत तो तलावाजवळच्या बेलावर चढून बसला.

आपल्या कच्च्याबच्च्यांचें भरणपोषण करण्यासाठीं स्वतः कष्ट सोसावे आणि जीव धोक्यांत घालावा अेवढाच आपला धर्म असें तो मानीत होता. याहून व्यापक, धर्माची त्याला जाणीव नव्हती.

रात्र झाली. कृष्णपक्षांतील काळीकुट्ट रात्र. डोळ्यांत बोट घातलें तरी दिसायचें नाहीं. पारध्यानें तलाव दिसावा म्हणून आड येणारीं बेलाचीं पानें तोडून खालीं फेकून दिलीं. अितक्यांत दोन चार हरणें पाणी पिण्यासाठीं जवळ आलीं. झाडावरील पारध्याला पाहून तीं चपापलीं; आपण आतां वांचत नाहीं अशी त्यांची खात्री झाली. निराश स्वरानें तीं बोलली: ' भो भो व्याध, आपल्या धनुष्यावर बाण चढवूं नकोस. आम्ही मरायला तयार आहोंत, पण घरीं जाअून आमच्या मुलांबाळांना आणि आप्तेष्टांना भेटून येण्याअितका वेळ आम्हांला दे. सूर्योदय होण्याच्या आंत आम्ही येथें येअून हजर होअूं. '

पारधी खदखदा हंसला. ' तुम्ही काय मला मूर्ख समजतां आहां ? अशी हातांत सांपडलेली शिकार मी घालवूं होय ? माझीं मुलेंबाळें भुकेनें तडफडत आहेत तीं ? '

'आम्हीसुद्धां तुझ्या मुलांबाळांसारखीच आमच्या मुलांबाळांची आठवण करून तुझी परवानगी मागत आहों. आम्ही वचन पाळतों कीं नाहीं याची अेकवार परीक्षा तर पहा.'

पारध्याच्या मनांत श्रद्धा आणि कौतुक अुत्पन्न झालें. बरोबर सूर्योदयाच्या अगोदर येण्याची पुनः ताकीद देअून त्यानें हरणांना परवानगी दिली आणि बेलाचीं पानें तोडीत तोडीत त्यानें झाडावरच ती रात्र काढली. श्रद्धायुक्त पारध्याच्या हातांतून आपल्या डोक्यावर पडलेल्या बिल्वदलांनीं महादेव संतुष्ट झाले.

अगदीं सूर्योदयाची वेळ झाली, आणि हरणांचा अेक मोठाच्यामोठा कळप तेथें येअून दाखल झाला. तीं हरणें घरीं गेलीं, मुलांबाळांना भेटलीं, आपापल्या शिंगांनीं त्यांनीं अेकमेकांना खाजविलें. अगदी छोटीं छोटीं पाडसें होतीं त्यांना पोटभर चाटून घेतलें, घडलेली हकिकत सर्वांना सांगितली आणि त्यांचा निरोप मागितला.

'अरे, दुष्ट पारध्याला दिलेलें वचन कसलें पाळायचें? शठं प्रति शाठ्यं कुर्यात्। पायांत जितका जोर असेल तितका अुपयोगांत आणून येथून मुकाट्यानें पळून जा.–' अशी सल्ला देणारें त्यांत कोणी निघालें नाहीं. आप्तेष्ट बोलले:

'चला, आम्हीहि तुमच्याबरोबर येतो. स्वेच्छेनें मरण पत्करल्यानें मोक्ष मिळतो. तुमचा अपूर्व आत्मयज्ञ बघून आम्ही पावन होऊं.'

मुलेंबाळें बरोबर निघालीं. पारध्याच्या हिंसकपणाची कसोटी घेण्यासाठींच जणूं सारेजण निघाले असावेत!

सूर्योदय होण्यापूर्वीच हा कळप येऊन दाखल झाला. रात्रीचीं हरणें पुढें आलीं आणि म्हणालीं: 'चल बाबा, आम्ही वधासाठीं तयार आहों.' दुसरीं हरणेंहि म्हणालीं 'आम्हांलाहि मार. तुझ्या मुलांबाळांची भूक तरी शमूं दे.'

पारध्याची हिंसावृत्ति रात्रीप्रमाणेंच नाहींशी झाली. सबंध दिवसाचा अुपवास आणि सबंध रात्र जागरण यांमुळें त्याची वृत्ति अंतर्मुख झालीच होती. त्यांतहि या प्रतिज्ञापालक हरणांचें धर्माचरण पाहून तर तो चकितच झाला. त्याच्या हृदयांत नवीन प्रकाश पडला. प्रेमशौर्याची दीक्षा त्याला मिळाली. तो झाडाखालीं अुतरला आणि हरणांना शरण गेला. दोन पायांच्या माणसानें चार पायांच्या पशूंचे पाय धरले. आकाशांतून श्वेतपुष्पांची वृष्टि झाली. कैलासाहून मोठें विमान अुतरलें, त्यांत पारधी आणि हरणें बसलीं आणि कल्याणकारी शिवरात्रीचें माहात्म्य गात गात शिवलोकाला गेलीं. आजहि तीं आकाशांत दिव्य रूपानें प्रकाशत आहेत. ÷

महाशिवरात्रीचा दिवस म्हणजे या धर्मनिष्ठ सत्यव्रती हरणांच्या स्मरणाचा दिवस. ×

मार्च, १९२२

---

÷ मृगनक्षत्र आणि व्याध.

×अेकादशी, अष्टमी, चतुर्थी, शिवरात्र हे सर्व हिंदु महिन्यांत नेहमीं येणारे सण आहेत. अेकादशी हीं वैष्णवांनी लोकप्रिय केली आहे; गणपतीचे अुपासक विनायकी आणि संकष्टी चतुर्थीचें व्रत करतात; देवीचे उपासक अष्टमीचें व्रत आचरतात. शिवरात्र हीं दरमहिन्याला कृष्णपक्षांतील चतुर्दशीच्या दिवशी येते. शैव लोक शिवरात्र करतात. अेकादशींत जशा आषाढी आणि कार्तिकी अेकादशी या महा-अेकादशा तशीच माघ महिन्यांतील शिवरात्र ही महाशिवरात्र.

महिन्यांतील प्रत्येक सणाचें महात्म्य आणि त्याविषयीं अेक कथा असतेच. त्यांत महाशिवरात्रीची कथा वरीलप्रमाणें आहे.

कथेच्या या पुरातन क्षेत्राकडे लोककथांचा संग्रह करणाऱ्या संशोधकांचें लक्ष गेलें पाहिजे.

# महाशिवरात्र

**माघ वद्य १४** **अर्धा दिवस**

हा सण अपरिग्रहाचा आणि भूतदयेचा आहे. महाशिवरात्रीच्या दिवशीं अेकट्या शिवअुपासकांनीच नव्हे तर सर्वांनी जर अुपवास केला, आणि आपल्या जीवनक्रमांतून अनावश्यक वस्तूंचा त्याग किती होअूं शकेल याचा विचार केला तर फार चांगले. आपला सर्वांत मोठा परिग्रह म्हणजे लोभ आणि आळस हा होय तो कमी व्हावा असा कांही अिलाज शोधून काढण्यापायीं जर आज थोडासा वेळ खर्च झाला तर तो अिष्ट आहे. अपरिग्रही महादेवाच्या दर्शनाला जाण्याची चाल तर चालू ठेवण्यासारखी आहेच. महादेवाच्या घरीं सर्वदा मुक्तद्वार असतें. शिक्षकांनीं या दिवशीं महादेवाची अेखादी चांगली धर्मबोधक गोष्ट मुलांना सांगावी. महादेवाला आंब्याचा मोहोर काढून वाहातात हें चुकीचें आहे असें कारणें दाखवून समजावून दिलें पाहिजे.

'हरणांचें संस्मरण' हा माझा लेख शिवरात्रीचें माहात्म्य दाखवितो.

---

# राष्ट्रमाता कस्तुरबा :: ४२

म. गांधींसारख्या थोर पुरुषाची सहधर्मचारिणी म्हणून पू० कस्तुरबांविषयीं राष्ट्राला आदर वाटणें स्वाभाविक आहे. दरवर्षी किंवा वेळोवेळीं कॉंग्रेसचे राष्ट्रपती बदलतात. पण राष्ट्रानें महात्माजींना ' बापूजी ' या नांवानें राष्ट्रपित्याच्या स्थानीं कायमचें स्थापिलें आहे. आणि म्हणूनच कस्तुरबा या ' बा ' या अेकाक्षरी नांवानें राष्ट्रमाता झाल्या आहेत.

पण महात्माजींच्या संबंधामुळेंच नव्हे तर स्वतःच्या आंतरिक सद्गुणाच्या आणि निष्ठेच्या परिणामामुळें देखील कस्तुरबा राष्ट्रमाता झाल्या आहेत. दक्षिण आफ्रिकेंत काय आणि हिंदुस्थानांत काय, सरकारशीं लढा देतांना जेव्हां जेव्हां चारित्र्याची, तेज प्रकट करण्याची पाळी आली तेव्हां तेव्हां कस्तुरबा त्या दिव्यांतून यशस्वी रीतीनें पार पडल्या आहेत.

आणि त्याहून विशेष म्हणजे आर्य सती स्त्रीचा जो आदर्श झपाट्यानें बदलणाऱ्या आजच्या युगांत देखील हिंदुस्थानानें अुराशीं जतन करून ठेवला आहे त्या आदर्शाची जिवंत प्रतिमा म्हणून राष्ट्र कस्तुरबांना ओळखीत आहे.

अशा त्रिविध लोकोत्तर योग्यतेमुळें कस्तुरबांची सबंध राष्ट्र आज पूजा करीत आहे.

पू० कस्तुरबा अशिक्षित होत्या. त्यांचें भाषाज्ञान सामान्य खेडवळाच्या ज्ञानाहून अधिक होतें असेंहि म्हणतां येणार नाहीं.

दक्षिण आफ्रिकेंतच जाअून राहिल्यामुळें त्यांना थोडेंसें अिंग्रजी समजत असे आणि २५-३० अिंग्रजी शब्दहि बोलतां येत असत. मि० अँड्र्यूजसारखे परदेशी पाहुणे घरीं आले असतां तेवढ्या शब्दांच्या भांडवलावर त्या आपलें काम

---

जिन्हा हॉल मुंबअी येथें ता. २२ फेब्रुवारी १९४७ रोजीं मुंबअीच्या सर्व स्त्रीसंस्थांच्या वतीनें भरलेल्या सभेपुढें दिलेलें व्याख्यान.

भागवीत असत, आणि केव्हां केव्हां तर त्यांच्या त्या संभाषणांतून अभावितपणें विनोदहि अुत्पन्न होत असे.

कस्तुरबांना गीतेविषयीं असाधारण आस्था होती. कोणीहि शिकविणारे भेटले म्हणजे त्या मोठ्या भक्तीनें गीता शिकावयास बसत. पण त्यांचें गाडें कधींच फारसें पुढें गेलें नाहीं. तरीहि अगदीं आगाखान जेल–महालामध्यें देखील त्यांनी पुनः पुनः गीतेची संथा घेण्याचा प्रयत्न चालू ठेवला होता.

त्यांचा निष्ठेचा दुसरा ग्रंथ म्हणजे तुलसीरामायण. मोठ्या मुश्किलीनें मिळणाऱ्या दुपारच्या अर्ध्या तासांत मोठमोठ्या बटबटीत टाइपाच्या तुलसी रामायणाचे दोहे चष्मा चढवून वाचीत बसलेल्या त्यांना पाहून मोठी गंमत वाटत असे. कस्तुरबांना रामायण देखील नीटसें कधीं वाचतां आलें नाहीं. पण जरी त्यांना राष्ट्रीय संत तुलसीदासांनीं केलेलें सती सीतेचें वर्णन नीटसें समजलें नाहीं तरी त्यांना प्रत्यक्ष सती सीता होतां आलें.

जगामध्यें अमोघ अशा दोन शक्ति आहेत. अेक आहे शब्द, आणि दुसरी आहे कृति. शब्दांनी सारी पृथ्वी हालवून सोडली आहे यांत शंका नाहीं; पण अंतिम शक्ति कृतीचीच आहे. महात्माजींनी या दोन्ही शक्तींची असाधारण अुपासना केली आहे. पू० कस्तुरबांनी या दोहोंपैकीं अधिक श्रेष्ठ शक्तीची नम्रपणें अुपासना करून संतोष मानला, आणि जीवनसिद्धीहि मिळविली.

द० आफ्रिकेच्या सरकारनें त्यांना तुरुंगांत डांबलें. कस्तुरबांनी आपला बचाव केला नाहीं, किंवा अेखादें सळसळणारे निवेदनहि बाहेर पाडलें नाहीं. ‘ महात्माजींची मी धर्मपत्नी नव्हे असें ठरविणारा कायदा मला मोडलाच पाहिजे ’ असें म्हणून त्या सरळ तुरुंगांत गेल्या. तेथें त्यांची ही तेजस्विता मोडून काढण्याचा सरकारनें प्रयत्न केला. पण सरकारचा त्यावेळचा तो हट्टच मोडून गेला.

डॉक्टरांनी त्यांना धर्मविरुद्ध आहार घेण्यास सांगितलें त्यावेळीं देखील त्यांनी धर्मनिष्ठेवर व्याख्यान दिलें नाहीं; फक्त अेवढेंच सांगितलें: ‘ मला निषिद्ध आहार घेअून जगायचें नाहीं, मरण येणार असेल तर येवो. ’

कस्तुरबांची कसोटी केवळ सरकारनेंच केली असें नाहीं. प्रत्यक्ष महात्माजींनी कितीतरी वेळां त्यांना ‘ माझा त्याग कर, ’ ‘ माझ्या घरांतून चालती हो, ’

' माझ्या म्हणण्याप्रमाणें तुला वागलेंच पाहिजे ' असें म्हणून त्यांना छळून घेतलें. पण कोणत्याहि वेळीं त्या त्यांना हार गेल्या नाहींत. स्त्रीचें कर्तव्य पतीला अनुसरण्याचें आहे अशी त्यांची निष्ठा असल्यामुळें मनांत कोणताच किंतु टिकवूं न देतां त्या धर्माच्या बाबतींत पतीचें अनुकरण करीत राहिल्या.

कस्तुरबांचें प्रथम दर्शन मला शांतिनिकेतनमध्यें घडलें. १९१५ च्या प्रारंभी जेव्हां महात्माजी तेथें आले होते तेव्हां स्वागताचा सर्व समारंभ संपल्यानंतर सर्वांनी निघण्याची तयारी केली. आंगणांत मध्यभागीं अेक चौथरा होता. महात्माजी म्हणाले, " आम्ही दोघे यावरच निजूं." शेजारीं शेजारीं अंथरुणें घालून बापू आणि बा निजले आणि आम्ही सर्व मंडळी अंगणाच्या आसपास आपापली अंथरुणें करून झोपून गेलों. त्यादिवशीं मला वाटलें कीं आपल्याला नव्यानें आअीबाप मिळाले.

बांचें मला शेवटचें दर्शन, सरकारनें त्यांना मुंबअींत बिर्लाहौसमधून पकडून नेलें त्यावेळीं झालें होतें. सरकारनें सकाळीं महात्माजींना पकडलें त्यावेळीं कस्तुरबांना सांगितलें कीं ' तुमची अिच्छा असल्यास तुम्हीहि बरोबर या'. बा म्हणाल्या, ' पकडत असाल तर अेअीन, सुखासुखी येण्याची तयारी नाहीं.' अुलट महात्माजी ज्या सभेंत बोलणार होते या सभेंत जाण्याचा त्यांनीं निश्चय केला. पतीला पकडल्यानंतर त्यांचें काम पुढें चालविण्याची जबाबदारी बांनी अनेकवेळांच जावली होती.संध्याकाळीं त्या व्याख्यानाला निघाल्या. सरकारच्या अमलदारांनी येअून त्यांना सांगितलें कीं ' माताजी, सरकारचें म्हणणें आहे कीं आपण कष्ट घेअूं नयेत. घरींच असावें. सभेला जाण्याची दगदग कां करतां ?' बांनी त्यांना देशसेवेचें महत्त्व समजावलें नाहीं; देशद्रोह करणारे कुत्रे म्हणून त्यांची निर्भर्त्सनाहि केली नाहीं. त्यांनीं अेकच शब्दांत सरकारच्या सूचनेची बोळवण केली.–'सभेंत जाण्याचा माझा निश्चय आहे, आणि मी जाणारच.' सरकारनें त्यांना पकडून तुरुंगांत ठेवलें. आगाखान पॅलेसमध्यें खाण्यापिण्याचे हाल नव्हते. जागा हवाशीर होती. महात्माजींचा सहवास होता. पण कस्तुरबांना आपण कैदेंत आहोंत हा विचारच असह्य होअी. ' नको येथील हें वैभव, आपली सेवाग्रामची झोपडीच बरी ' असें त्या वारंवार म्हणत. सरकारनें त्यांच्या शरीराला कोंडून ठेवलें पण त्यांच्या आत्म्याला हें सहन झालें नाहीं. पिंजऱ्यातला पक्षी ज्याप्रमाणें प्राणत्याग

करून बंधनमुक्त होतो त्याचप्रमाणें सती कस्तुरबांनी सरकारच्या तुरुंगांत आपला देह ठेवला, आणि त्या स्वतंत्र झाल्या. त्यांच्या या मूक पण तेजस्वी बलिदानामुळें साम्राज्याचा पाया ढासळला आणि त्यांची हिंदुस्थानांतील सत्ता खिळखिळी झाली. कस्तुरबांनी आपल्या कृतिनिष्ठेमुळें दाखवून दिलें कीं शब्दाच्या आणि साहित्याच्या डोंगरापुढें कृतीचा एक खडाच अधिक मूल्यवान् आणि अधिक पाणीदार असतो. शब्दशास्त्रांत निपुण असणाऱ्या लोकांना कर्तव्याकर्तव्याची नेहमींच विचिकित्सा करावी लागते. कृतिनिष्ठांना असली दुविधा कधीच भोंवत नाहीं. कस्तुरबांच्या पुढे त्यांचें कर्तव्य अगदीं दिव्यासारखें स्पष्ट असे. केव्हांहि कसलीहि चर्चा होऊं लागली म्हणजे आपल्या हातून अमुकच होणें योग्य आहे आणि अमुक होणें योग्य नाहीं, अशा दोन वाक्यांत त्या निर्णय देत असत.

आश्रमांत कस्तुरबा सर्वांच्याच माता असत. सत्याग्रहाश्रम म्हणजे तत्त्वनिष्ठ महात्माजींची संस्था. उग्रशासन मगनलालभाऊ ती संस्था चालवीत असत. अशा ठिकाणीं प्रेमाचा आणि वात्सल्याचा विशेष ओलावा मिळत असे तो कस्तुरबांकडूनच. पुष्कळ वेळां तर बा आश्रमांचे नियम देखील धाब्यावर बसवीत. आश्रमांतील मुलें भुकेजलीं म्हणजे त्यांची दाद त्यांच्याकडेच लागावयाची. नियमनिष्ठांनीं बांच्याविरुद्ध पुष्कळदां तक्रारी करून पाहिल्या. शेवटीं महात्माजींना हार खाऊन ठरवावें लागलें कीं आपले नियम बांना लागू नाहींत.

आश्रमांत थोर थोर पुढारी येवोत किंवा लहानसान कार्यकर्ते येवोत, त्यांच्या खाण्यापिण्याची वास्तपुस्त अगदीं प्रेमानें करावी कस्तुरबांनीच. आणि त्यांना आळस असा कधीच नव्हता. जिवावरच्या दुखण्यांतून उठल्या तरी अंगांत थोडी शक्ति येतांच आश्रमाच्या स्वयंपाकघरांत जाऊन त्या कामाला लागावयाच्या. अगदीं शेवटीं शेवटीं त्यांचे हातपाय थकले होते, शरीर सुरकतून गेलें होतें, तोंडांत एकहि दांत उरला नव्हता, डोळे निस्तेज झाले होते. तरीहि त्या स्वयंपाकघरांत जाऊन पोचावयाच्या आणि झेपेल तें काम अंतःकरणपूर्वक करावयाच्याच. त्यांना भेटावयास गेलों आणि त्यांनी कांहीं खावयास दिलें म्हणजे लहान मुलाप्रमाणें हात पुढें करतांना मला असाधारण धन्यता वाटे.

त्या जरी अशिक्षित होत्या, संस्था चालविण्याची जबाबदारी किंवा महत्त्वा-'कांक्षा जरी त्यांच्यांत नव्हती, तरी देशांत काय चाललें आहे याची सूक्ष्म माहिती त्या प्रश्न विचारून किंवा वर्तमानपत्रें चाळून घेत असत.

दोन तीन वेळां महात्माजी जेलमध्यें असतांना कस्तुरबांना राजकीय परिषदांचें किंवा शिक्षण संस्थांचें अध्यक्षस्थान घ्यावें लागलें होतें. त्यांचें अध्यक्षीय भाषण मला लिहून द्यावें लागलें होतें. मी त्यांना म्हणालें, 'मी माझ्या पदरचा अेकहि मुद्दा भाषणांत आणणार नाहीं; तुम्ही सांगाल तेंच ठीकठाक भाषेंत सजवून देअीन' थोडी कांकूं केल्यानंतर त्या भाषणाचे मुद्दे सांगत त्यावेळीं त्यांची ती शक्ति पाहून मी तर चकितच होअी.

अध्यक्षीय भाषण कोणाकडूनहि लिहून घेणें सोपें असतें, पण परिषद संपल्यानंतर अुपसंहार करावयाचा तो स्वतःच्या प्रत्युत्पन्नमतीच्या जोरावरच करावा लागतो. प्रत्येक वेळेला कस्तुरबांनी केलेले अुपसंहार, अगदीं सोप्या भाषेंत कां असत ना, परिपूर्ण होते. त्यांच्या त्या भाषणांत परिस्थितीची जाणीव, भाषेची सावधगिरी आणि खानदानीचा थोरपणा अुत्कटपणें दिसून येअी.

आजच्या काळीं स्त्रीजीवनासंबंधीचा आपला आदर्श आपण बराच बदलला आहे. आज कोणी स्त्री कस्तुरबाप्रमाणें अशिक्षित राहिली आणि कसल्याच महात्त्वाकांक्षेचा तिच्यांत अुदय दिसला नाहीं तर आपण तिचें जीवन यशस्वी किंवा कृतार्थ झालें असें म्हणणार नाहीं. असें असूनहि पू॰ कस्तुरबा वारल्याबरोबर सबंध राष्ट्रानें स्वयंस्फूर्तीनें त्यांचें स्मारक करण्याचें ठरविलें आणि सहजासहजीं गोळा न होणारा प्रचंड निधि गोळा करून दाखविला. यावरूनच सिद्ध होतें कीं आपला प्राचीन तेजस्वी आदर्श अजूनहि राष्ट्रमान्य आहे, आपल्या संस्कृतीची मुळें अजूनहि चांगलीच भरभक्कम आहेत.

हा सर्व थोरपणा कस्तुरबामध्यें आला कोठून? त्यांची जीवनसाधना कोणत्या प्रकारची होती? शिक्षणाच्याद्वारा बाहेरून असें त्यांनी कांहींच घेतलें नव्हतें. त्यांच्यामध्यें खरोखर म्हणजे आर्यआदर्शाला साजेसे कौटुंबिक सद्गुणच होते. असाधारण संधि मिळतांच आणि तितकीच असाधारण कसोटी येअून पडतांच त्यांनी आपल्या स्वभावसिद्ध कौटुंबिक सद्गुणांना व्यापक केलें आणि त्यांच्या जोरावरच प्रत्येक वेळीं जीवन-सिद्धि मिळविली. सूक्ष्म प्रमाणांत किंवा लहानशा पायावर जी शुद्ध साधना केली जाते तिचें तेज अितकें कांहीं लोकोत्तर असतें कीं कितीहि

मोठा प्रसंग असो किंवा व्यापक प्रमाणावर कसोटी होवो, चारित्र्यवान् मनुष्याला स्वतःच्या शक्तीचा फक्त गुणाकारच करावयाचा असतो.

सती कस्तुरबांनी अगदीं बाळबोधपणें पातिव्रत्याची, कुटुंबवत्सलतेची आणि तेजस्वितेची कास धरली, आणि तेवढ्या जोरावर महात्माजींच्या माहात्म्याला त्या पुऱ्या पडल्या. आज हिंदु, मुसलमान, पारशी, शीख बौध, ख्रिस्ती सर्व धर्मांच्या लोकांचा बनलेला हा विशाल देश अत्यंत निष्ठेनें कस्तुरबांची पूजा करीत आहे आणि स्वातंत्र्यापूर्वीच्या शिवरात्रीच्या दिवशीं त्यांचें स्मरण करून स्वतःची तेजस्विता परजीत आहे.

---

# सौ. कस्तुरबा–दिन

## ( महाशिवरात्र किंवा ता. २२ फेब्रु. )

हा दिवस महाशिवरात्रीला किंवा २२ फेब्रुवारीला पाळावयाचा असतो. या दिवशीं कस्तुरबांच्या गुणसंकीर्तनाखेरीज कस्तुरबा–स्त्री-सेवानिधीच्या द्वारा होत असलेल्या राष्ट्रव्यापी कार्याची माहिती लोकांना द्यावी मागासलेल्या जातीच्या स्त्रियांना त्यांच्या मुलांबाळांसकट आमंत्रण देऊन, त्यांना साधा पण पोटभर असा फराळ द्यावा स्त्रीजीवनांतील निरनिराळ्या प्रश्नांचा ऊहापोह करणारीं व्याख्यानें ठिकठिकाणीं करवावींत. अशीं व्याख्यानें निदान अर्धीं तरी स्त्रियांनी दिलेलीं असावींत. लहान मुलांना दुधाचा पुरवठा कसा होईल या विषयींच्या योजनांची चर्चाहि याच दिवशीं करून संघटित योजना आंखण्यांत याव्या. बालशिक्षणाची चर्चाहि या दिवशीं करणें योग्य होईल. या दिवशीं जेथें शक्य तेथें हरिजनांना बरोबर घेऊन मोठ्या मोठ्या मंदिरांत हरिकीर्तन करावें.

---

## गुलामांचा सण :: ४३

### ( फाल्गुन पूर्णिमा )

प्रत्येक सणांत कांहींना कांहीं ग्रहण करण्याजोगें असतें. पण आजच्या आपल्या होळीच्या सणांत असें कांहीं मिळण्याजोगें आहे का ? गेल्या वीस पंचवीस वर्षांत ज्या पद्धतीनें हा सण साजरा करण्यांत येतो ती पद्धति पहातां या सणासंबंधीं कांहींहि अुत्साह वाटण्याजोगा नाहीं. याचा जुना अितिहास किंवा पौराणिक कथा का होअीना, या सणावर काहीं सुंदर प्रकाश पाडील म्हणावें तर तसेंहि वाटत नाहीं. तरी अेवढें मात्र कबूल केलें पाहिजे कीं होळी हा अतिशय जुना सण आहे. हिंवाळा पुरा होतांच अेक मोठी थोरली होळी पेटवून आनन्दोत्सव करण्याचा रिवाज प्रत्येक देशांत आणि प्रत्येक काळीं चालूच आहे. या अुत्सवांत संयमाचा लगाम ढिला सोडून स्वच्छंदाचा थोडासा अस्वाद घेण्याची लोकांची अिच्छा असते.

हिंदुधर्मांत माणसांना जात असते अितकेंच नव्हे तर देव, पशुपक्षी आणि सण यांनासुद्धां जात असते. अष्टावसु जातीनें वैश्य आहे, नाग आणि कबूतर ब्राह्मण आहे आणि पोपट हा वाणी आहे, तसा होळीचा सण हा जातीनें शूद्र आहे. अेवढ्याचसाठीं कां होळीचा कार्यक्रम कोणत्यातरी काळच्या बिघडलेल्या शूद्रांनीं तयार केला आणि त्यांचा हक्क संभाळण्यासाठीं अितर वर्णांनी त्याचा स्वीकार केला ? होळीच्या दिवशीं अंत्यजांना शिवावें असा अेक नियम पुराणांत आहे त्याचा अुद्देश काय असावा ? द्विज लोक तेवढे संस्कारी म्हणजेच संयमी आणि शूद्र तेवढे स्वच्छंदी असें समजूनच होळीमध्यें अितर स्वच्छंद ठेवला आहे काय ? होळीच्या दिवशीं राजा आणि प्रजा अेक होऊन अेकमेकांवर रंग अुडवितात तें काय निदान वर्षांचे चारपांच दिवस तरी समानतेचें तत्त्व अनुभवण्यासाठीं ?

होळी म्हणजे कामदहन, वैराग्याची साधना. विषयाला काव्याचें मोहक स्वरूप दिल्यानें तो वाढतो. त्यालाच बीभत्स स्वरूप देऊन त्याला नागडा अुघडा करून त्याचें खरें स्वरूप समाजापुढें अुभें करून विषयाविषयीं शिसारी अुत्पन्न

करण्याचा अुद्देश तर यांत नसेल ? सबंध हिंवाळाभर ज्याच्या मोहांत आपण सांपडलों त्याची फजीती करून त्याला जाळून टाकून पश्चात्तापाची विभूति शरीराला चर्चून वैराग्य धारण करण्याचा अुद्देश यांत असेल काय ?

प्राचीन काळच्या लिंगपूजेची विडंबना तर यांत नसेल ?

पण होलिका म्हणजे वसंतोत्सवहि आहे. हिंवाळा गेला, वसंताचें नूतनजीवन वनस्पतींमध्येंसुद्धां आलें, तेव्हां हिंवाळ्यांत सांठविलेलीं सर्व लाकडें गोळा करून शेवटची शेकोटी पेटवून थंडीला निरोप देण्याचा तर हा अुत्सव नसेल ? आणि ती ढुंढा राक्षसी कोण ? ती लाहान मुलांना पीडा करते म्हणे. होळीच्या दिवशीं सगळीकडे आग पेटवून आरडा ओरड करून तिला पळवून लावण्यांत येते. यांत काय काव्य किंवा रहस्य असावें ?

लोकांमध्यें अश्लीलता आहेच. तिला मारून ती मरायची नाहीं. 'तुष्यतु दुर्जनः' या न्यायानें तिला वर्षांतील अेक दिवस दिल्यानें ती हीन वृत्ति सगळें वर्ष मग ताब्यांत राहाते असें कित्येकजण म्हणतात. खरोखर तसें जर असेल तर ती भयंकर चूक आहे. अग्नीला तूप दिल्यानें तो कांहीं ताब्यांत राहात नाहीं. पाप आणि आग्नि यांच्याशीं स्नेह कशाचा ? वसंताचा अुत्सव अीश्वरस्मरणपूर्वक सौम्य रीतीनें साजरा केला पाहिजे. दिवाळींत अुत्सवाचा आनंद काय कमी असतो ? लाकडें जाळून होळी केल्यानें काय खरा वसंतोत्सव होतो ? होलिका अेक राक्षसी होती. तिला जाळण्याचा हा सण आहे असें जर मानलें तर चोरून आणलेल्या लाकडांनीं आपण तिला जाळूं शकणार नाहीं. होलिका राक्षसी प्रह्लादाच्या निर्वैर पावित्र्यानेंच जळेल.

आपले सण आपल्या राष्ट्रीय जीवनाचे आणि आपल्या संस्कृतीचे प्रतिबिंबरूप आहेत कीं नाहींत याचा आपण विचार केला पाहिजे. मनुष्यमात्र अुत्सवप्रिय आहे. पण स्वतंत्र माणसांचा अुत्सव निराळा असतो आणि गुलामांचा निराळा असतो. जो स्वतंत्र आहे, ज्याच्या माथ्यावर जबाबदारी आहे, ज्याला अधिकार चालवावयाचा आहे, त्याची अभिरुचि साधी आणि प्रतिष्ठित असते. जो परतंत्र आहे, ज्याला जबाबदारीची जाणीव नाहीं, ज्याच्या जीवनांत महत्त्वाकांक्षेला स्थान नाहीं त्याची

अभिरुचि बेडौल आणि अतिरेकी असते. अेका ग्रंथकारानें लिहिलें आहे कीं स्त्रियांना विविध प्रकारचे रंग पसंत पडतात आणि चित्रविचित्र पोषाखाकडे त्यांचें लक्ष वेधतें याचें कारण त्यांची परवशता हें आहे. स्त्री जर स्वाधीन झाली तर तिचा वेषहि साधा आणि शुभ्र होअील. स्त्रियांच्या बाबतींत ही गोष्ट खरी असो वा नसो, प्रजेच्या बाबतींत मात्र ती अगदीं खरी आहे. प्रजा जेव्हां अधिकारविरहित, परतंत्र, बालिश वृत्तींची आणि बेजबाबदार होती त्या काळींच मूर्खपणाच्या कृत्त्यांनी भरलेला हा सण साजरा करण्याचें प्रचलित झालें असावे.

रोमन लोकांत सॅटर्नेलिया नांवाचा अेक गुलामांचा सण होता. त्यादिवशीं गुलाम आपल्या धन्याबरोबर जेवीत, सोंगट्या खेळत, मोकळेपणानें बोलत आणि मौज करीत. अितका आनंद भोगल्यानंतर पुन: वर्षभर गुलामींत राहाण्याचीं त्यांना हिंमत येअी.

स्वराज्यवादी प्रेजेनें अधिक गंभीर होणें जरूर आहे. आपली योग्यता काय आपली स्थिति काय याचा विचार करून तिला साजेल असें जीवन घालविलें पाहिजे. वसंतोत्सव करावयाचा असेल तर समाजांत नवें जीवन अुत्पन्न करून हा सण साजरा केला पाहिजे. कामदहन करायचें असेल तर ब्रह्मचर्यव्रत धारण करून पवित्र झालें पाहिजे. होलिकोत्सव हें गुलामांना अेकमेव आश्वासन असेल तर तो अुत्सव स्वराज्याप्रीत्यर्थ तरी अेकदम काढून टाकला पाहिजे. भाषेमधून शिव्यांचा कोश कमी होअील याबद्दल दु:ख मानण्याचें कारण नाहीं. होळीचे दिवस शहरें आणि खेडी स्वच्छ करण्यांत आपल्याला घालवितां येतील. मुलांना मर्दानी कसरत आणि खेळ खेळण्यांत आणि दारूच्या व्यसनांत सांपडलेल्या लोकांच्या वस्तींत जाअून दारूनिषेधाचा व्यक्तिगत अुपदेश करण्यांत हे दिवस घालवितां येतील, आणि स्त्रिया स्वदेशीचीं गाणीं गात गात खादीचा प्रचार करू शकतील.

प्रत्येक सणावर स्वराज्यसंस्करण झालेंच पाहिजे, कारण स्वराज्य म्हणजे आत्मशुद्धि आणि नवजीवन.

१२–३–२२

---

# होळी

फाल्गुन पूर्णिमा १ दिवस

होळीचा सण हा काढून टाकण्याजोगा आहे. या दिवशीं करावयाच्या जुन्या कार्यक्रमांत अुन्नतीचा अेकहि अंश नाहीं. तरी हा सण देशभर अितका रूढ आणि लोकप्रिय आहे कीं त्याचा जर आपण अुपयोग केला नाहीं तर तो आपलाच दोष म्हणावा लागेल. आजपर्यंत होळीच्या दिवशीं संस्कारी लोकहि असंस्कारी बनले आहेत. अितःपर संस्कारी म्हटले जाणारे लोक जर असंस्कारी लोकांची सेवा करण्यांत हा दिवस घालवितील तर या सणाचें सार्थक होअील. होळीच्या दिवशीं आपण विशेषेंकरून हरिजनांना बोलवावें, समानभावानें त्यांचें स्वागत करावें, त्यांचीं सुखदुःखें समजून घ्यावीं; अथवा हरिजनवस्तींत जाअून कोरडा अुपदेश न करतां सक्रिय सहानुभूति दाखवावी. त्यांच्या मुलांना आपल्या येथें खेळायला बोलवावें. हुतुतु, आट्यापाट्या वगैरे खेळ त्यांच्याशीं खेळावें.

होळीचा सण हा मैदानी आणि मर्दानी खेळांसाठीं विशेष अनुकूल आहे. दिवसां तऱ्हतऱ्हेच्या कसरतींची चढाओढ व्हावी. त्यानंतर सगळ्यांनी जेवावें. रात्रीं चांदण्यांत आट्यापाट्या खेळाव्या.

होळी पेटविण्याची प्रथा काढून टाकलेली बरी. गरजेच्या वस्तू गंमतीनें जाळून टाकणें आपल्या समाजाला परवडणार नाहीं. गवत, गोवऱ्या वगैरे शेतीला अुपयोगी असणाऱ्या वस्तू जाळणें म्हणजे शेतीसंबंधीं बेदरकारी दाखविणें आहे. तरीपण गोशाळेंत धूर करून जनावरांचें डांसांपासून रक्षण करतां येअील, हें समजावून द्यावें.

होळीच्या दिवशीं कच्च्या आंब्याचे निरनिराळे पदार्थ बनवून खाण्यांत औचित्य आहे.

त्या दिवशीं आपल्या सहवासांत येणारे मजूर, नोकर तसेच अितर गरीब लोक यांना बरोबर घेअून खाण्याची प्रथा फारच चांगली आहे. सर्वांना मिळतील अशा प्रकारचे पदार्थ खाण्यांत असावेत.

होळीच्या दिवशीं मद्यपाननिषेधाचें काम होअूं शकलें तर तें सर्वोत चांगलें. हरिजनांमध्यें झालेल्या अनेक साधूंच्या चरित्रांचें संकीर्तन या दिवशीं विशेषेंकरून व्हावें, अुदा० गुहक, नंदनार, चोखामेळा अि०

## ( फाल्गुन व० २ )

ज्ञानदेव, तुकाराम आणि समर्थ हेच काय ते महाराष्ट्राचे खरे राजे होत. यांनी महाराष्ट्राच्या हृदयावर आपलें सिंहासन जें स्थापन केलं तें आजवर अबाधित आहे. या तिघांमध्येंदेखील महाराष्ट्राचा हृदयेश्वर म्हणजे तुकाराम. ज्ञानेश्वर योगमार्गांतून आणि ज्ञानमार्गांतून भक्तिमार्गांत आले, रामदास कर्ममार्ग आणि अुपासना–मार्गांतून भक्तीला समजूं शकले, तुकारामांनी 'आधीं, मधीं आणि अंतीं' अेक भक्तीच ओळखली आणि मग ज्ञान, योग, अुपासना आणि कर्म हीं सर्व या भक्तीच्या मागोमाग आपोआप आलीं.

" सत्य असत्याशीं मन केलें ग्वाही । मानियेलें नाहीं बहुमता ।। " या अेका ओळींत तुकारामाचें आत्मचरित्र आणि तत्त्वज्ञान येअून गेलें आहे. ' मेणाहून मअू असलेला ' हा विष्णुदास कधींहि लोकांचा दास झाला नाहीं. " लोक तैसा ओक धरीनां धरवेना " हें प्रथमपासून पाहिल्यामुळें लोकांविषयीं तुकाराम निःस्पृह आणि निर्भय झाले होते. एकदां निकरावर येअून ते म्हणाले कीं, " माझें बरें वाईट करण्याचें काय या लोकांच्या हातीं आहे कीं मीं यांची मुर्वत ठेवावी ? यांनी मला मुक्त म्हटल्यानें मी कांहीं मुक्त होअूं शकत नाहीं, आणि मी मोक्षाचा अधिकारी झालों तर हे सगळे मिळून मला कांहीं अडकवून ठेवूं शकणार नाहींत. "

जें हृदयांत तेंच मनांत, जें मनांत तेंच जनांत अशी ज्याची स्थिति असेल त्याचा मार्ग बऱ्याच अंशीं सोपा होतो. तुकारामानें हा प्रांजळ मार्ग स्वीकारला होता यामुळें त्याला बरीचशीं ओझीं अुचलावींच लागलीं नाहींत.

तुकाराम जातीनें वाणी होता. पण तो स्वतःला शूद्र म्हणवून घेत असे, अेवढेंच नव्हे तर तो म्हणतो कीं अीश्वराची कृपा कीं मी शूद्रवंशांत जन्मलों, नाहींतर मी दंभानें मेलों असतो. वेदांत्यांनादेखील त्यानें अेका शब्दांत सांगून बाळविलें कीं, ' अद्वैतीं तों माझें नाहीं समाधान. ' अितकें असून चित्तशुद्धि आणि ज्ञान याबाबतींत त्याचेजवळ यत्किंचितहि कमतरता नव्हती.

तुलसीदास किंवा पुंडलीक अथवा वाल्मीकि यांसारख्या संतांच्या जीवनांत अेकाअेकीं परिवर्तन झालेलें आढळतें. दुनियादारीमध्यें–प्रपंचामध्यें–मुरलेले हे लोक अेकाअेकींच ठेंच लागून अुलटतात आणि त्यांच्या जीवनांत कायमचें परिवर्तन होतें. नामदेव किंवा तुकाराम किंवा अेकनाथ यांचें असें नाहीं. लहानपणापासून यांचा ओढाच परमार्थाकडे. दुष्काळांत अेक पत्नी वारल्यामुळें तुकारामाचें वैराग्य दृढावलें असें म्हणतां येअील. पण भक्ति तर त्यांना आनुवंशिक संस्कार म्हणूनच मिळाली होती. दुष्काळामुळें अेक पत्नी वारली याचा तुकारामांच्या मनावर जो परिणाम झाला त्याच्यापेक्षां दुसऱ्याच अेका गोष्टीचा अधिक दळदार परिणाम त्यांच्या मनावर झाला. दुष्काळाचे दिवस होते. लोक अन्नाला मोताद झाले होते. अशा वेळीं तुकारामाचा भावाशीं मतभेद झाला. लोकांकडे थकलेल्या बाकीचा तगादा लावून आपल्या चरितार्थाची सोय करावी असें भावाचें म्हणणं. तुकारामाला वाटलें जशी आपली अडचण तशीच लोकांची. यावेळीं बाकी–वसुलीचा आग्रह करूं नये. मतभेद तुटेना तेव्हां दोघां भावांनी कर्जरोखे आणि हिशेबाच्या वह्या वांटून घेतल्या आणि फारकत केली. तुकारामांनी आपला शुभ संकल्प डळमळित होअूं नये म्हणून आपले रोखे आणि वह्या स्वेच्छेनें इंद्रायणींत बुडविल्या. अशा रीतीनें तुकारामानें आपला संसार स्वेच्छेनें बुडविला.

पुढें ब्राह्मणेतराला शास्त्रवचनें–आणि तींहि मराठींत–लिहिण्याचा अधिकार काय असा प्रश्न अुठवून त्यांच्या समकालीन लोकाग्रणींनी त्यांचेकडून त्यांच्या अभंगांच्या वह्या बुडविल्या. मग मात्र तुकारामाच्या मनाची कालवाकालव झाली. आपण प्रपंच बुडविला आणि परमार्थहि बुडविला, आतां आपल्या वांट्याला काय राहिलें असें वाटून त्यांना भयंकर दुःख झालें. रामकृष्णाप्रमाणें तुकारामालादेखील आपल्या सर्व अडचणी आणि शंका आपल्या अुपास्यदेवतेला अर्पण करण्याची संवय होती. तुकारामानें विठोबाच्या दारीं धरणें धरलें आणि जेव्हां खुद्द विठोबानें हृदयाचें समाधान केलें तेव्हांच तो जगावयास तयार झाला. तुकारामाच्या जीवनांत हा प्रसंग खरोखर क्रांतिकारी होता.

समाधान झाल्यानंतर तुकारामांनी समाजसेवा सुरू केली. लोकांचीं तेलाचीं नळकांडीं गळयांत बांधून लोकांना तीं घरोघर पोंचविण्याचें काम तुकाराम पहिल्या-

पासून करीतच. पण आतां त्यांनी अुपदेश करण्यालाहि आरंभ केला. तुकारामाला शिष्य किती होते हा एक न सुटलेला प्रश्न आहे. आपली सेवा करणाऱ्या शिष्यांना बोधामृत पाजण्याची जबाबदारी समजून ज्याप्रमाणें बुद्ध भगवानांनी प्रारंभ केला, त्याचप्रमाणें तुकारामांनी आपल्या धर्मपत्नीला दीक्षा देअून अुपदेशाचा प्रारंभ केला. तुकाराम पत्नीला सांगून सांगून काय सांगणार ? संसारीसुखांत कांहीं अर्थ नाहीं--' किंचित हें सुख टाकी वो थुंकोनी ' पत्नीला पतीचा उपदेश पटावयाला फार वेळ लागला नाहीं. तिनें घरीं असलेनसलेलें ब्राह्मणांना दान देअून टाकलें. तेवढ्यांत तुकारामानें कुंपणावर वाळत असलेलें पत्नीचें लुगडेंदेखील ब्राह्मणपत्नीला देअून टाकलें. बदलावयाला अेक लुगडें देखील पुरतें नाहीं हें पाहून मात्र त्या माअुलीला ' अुलटी अुपरति ' झाली.

तुकारामाचा स्वार्थावरचा विश्वास अुडाला होता. जिजाअीचा आतां परमार्थावरचा विश्वास अुडाला. अशा दोघांचा जीवनक्रम कसा चालला असेल याची कल्पना सहज होण्यासारखी आहे. मुलाबाळांनाच काय तुकारामाला खाअु घालण्याचा भार देखील त्या साध्वीवरच येअून पडला. नवराबायकोचा जरी असा असहकार असला तरी या प्रेमळ दंपतीनें खूप वर्षें संसारसुख अनुभवलें आणि शेवटपर्यंत आपापला आग्रह कायम ठेवला.

शिष्य करण्यांत पहिलाच असा अनुभव आल्यामुळें कदाचित असेल पण तुकारामानें शिष्य करण्याच्या भानगडींत न पडतां ' मेघवृष्टीनें अुपदेश करण्या ' चा प्रारंभ केला. आतां त्यांना छळणाऱ्या अेखाद्या समाजकंटकाला अुपरति होअून जर तो तुकारामाचा शिष्य झाला तर तुकाराम त्याला काय करणार ?

कोणी साधु झाला म्हणजे त्याचें सत्त्व कसाला लावणारें कोणीतरी भेटतेंच. तुकारामाची कसोटी कांहीं कमी झाली नाहीं. छळणाऱ्यांनी त्याला छळून घेतलें. त्याच्या तितिक्षेची पारख करणारी ' झांटिपी ' त्याच्या घरीं होतीच. तुकारामाच्या सडेतोड अुपदेशानें आणि दंभस्फोटानें भोंदू लोकांचे हाल कमी झाले नसतील; पण तुकारामाला विष देअून मारण्यापर्यंत या लोकांची मजल गेली नाहीं. कारण हिंदु-

स्थान म्हणजे कांहीं गीस नव्हे. त्यांनी फक्त कढत कढत पाणी तुकारामावर ओतून आपल्या रागाचें पारणें फेडलें!

घरीं सुख नसलेल्या या सत्पुरुषाला कांहींतरी सुख द्यावें म्हणून त्यांच्यावर मुग्ध झालेली एक स्त्री त्यांचेकडे आली. पण ' आम्ही तसले नव्हेत माउली, तूं दुसरीकडे जा ' असें सांगून त्यांनीं तिची बोळवण केली, आणि ' तुझें हें पतन नाश्यानें बघवत नाहीं ' म्हणून हृदयाची वेदना त्यांनीं व्यक्त केली.

कामक्रोधाच्या बाबतींत कसोटी झाली. त्यांतून पार पडल्यानंतर त्याहून कठीण कसोटी करण्याचें ओश्वराला सुचलें. त्यानें शिवाजीच्या करवीं छत्री, जोडे, घोडे, अब्दागिरी आणि दक्षिणा पाठवून तुकारामाला राजदरबारचें आमंत्रण दिलें. या संकटाला मात्र तुकाराम खरोखर घाबरला. त्यानें ताबडतोब ओश्वराची मदत मागितली आणि त्याची करुणा भाकून त्याला सांगितलें कीं देवा, असली कसोटी करूं नकोस. आलेली लक्ष्मी माघाल्या पायीं परत करून त्यानें शिवाजीला निरोप पाठविला कीं, घरीं जरी अुपासमार असली तरी आम्ही विष्णुसेवक दीन आहोंत असें समजूं नको. तूं समर्थालाच शरण जा, आणि ओश्वर–कार्य करीत राहून अनाथाच्या काजा साह्य हो. '

'कामः क्रोधस्तथा लोभः' या त्रितयाचा ज्यानें त्याग केला तो नरकाचें द्वार टाळून सदेह स्वर्गाला गेला तर आश्चर्य काय ? ज्याचा देह विकारी असेल त्याला आत्मनाश टाळण्यासाठीं देह सोडून स्वर्गाला जावें लागतें. येथें ती अडचण अुरली नव्हती.

तुकारामांनी कांहीं नव्या प्रकारचा अुपदेश केला नाहीं. सनातन काळापासून जगांतले सर्व संत जें सांगत आले आहेत तेंच त्यांनीं सांगितलें ; पण 'आधीं करून सांगितल्या' मुळें त्यांच्या वाणींमध्यें जिवंतपणा आला. त्यांचा अुपदेश तेजस्वी ठरला, आणि तेव्हांपासून लक्षावधि महाराष्ट्रीयांनीं वैराग्याची ध्वजा सर्वत्र देशांत मिरविली आणि नांदविली. तुकाराम शास्त्रधर्माचे प्रतिनिधि नसून हृदयधर्माचे प्रतिनिधि होते. सत्त्वगुणांचे तेज काय असतें हें दाखविण्या- साठींच ते या जगांत आले होते. राजकारण समर्थ आणि छत्रपति यांच्या हातीं

सोंपवून देऊन अध्यात्मकारण आणि समाजकारण त्यांनी जनतेच्या मदतीनें चालविलें. रामदासांनीं शिवाजीला भगवाझेंडा दिला, तुकारामांनीं महाराष्ट्राच्या हातीं वारकऱ्याची पताका दिली. दोघांनीं अेकच काम केलें, पद्धत मात्र निराळी.

महाराष्ट्राची राजधानी कोणती ? रायगड, सातारा आणि पुणें कां पंढरपूर, देहू आणि आळंदी ? शिवकालीं किंवा पेशव्यांच्याकालीं या प्रश्नाचें अुत्तर सहज देतां आलें नसतें. आज तशी स्थिति नाहीं.

१८–१२–३९.

---

# तुकाराम–पुण्यतिथि

**फाल्गुन व० २** **अेक समय**

नदीच्याकाठीं किंवा समुद्रतीरावर अेखादें तीर्थक्षेत्र आणि मंदिर असावयाचेंच. पण गिरसप्पाच्या कांठीं मात्र मंदिर नाहीं हें अेक मोठें आश्चर्य आहे. संतपुरुषांनीं जेथें देह ठेवला तेथें भक्तांनीं मंदिर बांधून तीर्थक्षेत्र बनविलें नाहीं असें क्वचितच घडतें. देहूला तुकारामाचें मंदिर नाहीं हें अेक असेंच आश्चर्य आहे. तुकारामांनीं बांधलेलें अेक विठोबाचें लहानसें मंदिर आहे खरें, पण तें कांहीं तुकारामाचें मंदिर म्हणतां यावयाचें नाहीं. सदेह स्वर्गाला गेल्यानंतर मंदिर कसें बांधावयाचें ? तुकारामाची पुण्यतिथि साजरी करण्याचा प्रकार निराळा आहे आणि तो म्हणजे 'ज्ञानबातुकारामा' चा जयघोष करीत पंढरपुरची वारी करणाऱ्या दिंड्या काढून.

तुकारामाची पुण्यतिथि साजरी करावयाला भजनाचा कार्यक्रम सर्वांत मुख्य असला पाहिजे; आणि तुकारामाचे अभंग म्हणणें, त्यावर निरूपण करणें आणि सामाजिक सदाचाराची चिंता वाहाणाऱ्या लोकांचीं व्याख्यानें करणें हा भाग मुख्य असला पाहिजे; आणि तुकारामाच्या दयार्द्र नजरेंतून जा वगळलीं गेलीं नाहींत

अशा पांखरांना खाऊं घालणें हाहि या दिवसाचा अेक गोड कार्यक्रम असला पाहिजे. पण कबुतरांचीं खुराडीं बांधून त्यांचेसाठीं पायली पायली दाणे ओतणें हा मात्र प्रकार होअूं नये. स्वतंत्रवृत्तीनें राहाणाऱ्या पांखरांना परावलंबी आणि रोगी बनविण्याचें पाप आपण कां घ्या? आपण शेती करतों आणि सृष्टिमातेकडून धान्य मिळवितों. त्या धान्यावर या अुडत्या लेकरांचा हक्क कमी नाहीं हें ओळखून त्याचेसाठीं त्यांचा भाग राहूं देणे हा अेक भूतयज्ञ आहे अेवढें ओळखलें पाहिजे.

ज्या ऋतूंत पक्ष्यांना दाणें कोठेंहि सांपडत नाहींत आणि गवताचें बींदेखील कुजून गेलेलें असतें अशा वेळीं पक्षासाठीं दाणें टाकण्याची पद्धत सुरू केली पाहिजे.

अीस्ट अिंडिया कंपनीनें हिंदुस्थानांत येतांच अिकडील राजांशीं करारमदार करून अिंग्रजांखेरीज अितर युरोपियनांना या देशांतून बहुतेक हांकून काढलें. त्याचप्रमाणें कावळे आणि चिमण्या यांनीं अितर सर्व गरीब आणि गोजिरवाण्या पक्ष्यांना मनुष्यवस्तींतून हांकून लावलें आहे. यामुळें पांखरांना खाअूं घालण्याचा भूतयज्ञ शहरांतून चालण्याजोगा नसून तो शेतांतच केला पाहिजे. तुकारामदिनी या प्रश्नांचा अूहापोह करणें अुपयोगीं होअील.

---

# धर्मरक्षक शिवाजी :: ४५

( फाल्गुन वद्य ३ )

अेकदां सत्याग्रहाश्रमांत शिवाजी महाराजांची जयंती साजरी करण्यांत आली होती. त्याप्रसंगीं पू० गांधीजी बोलले होते कीं, 'शिवाजी महाराजांच्याविषयीं अितिहासकार काय म्हणतात अिकडे लक्ष देण्यापेक्षां संतांनीं त्यांच्याविषयीं काय अुद्‌गार काढले आहेत त्याला मी अधिक महत्त्व देतों. संतपुरुषांनी जर त्यांना प्रमाणपत्र दिलें असेल तर मला तें पुरेसें आहे.'

शिवाजी महाराजांविषयीं संत तुकाराम तसेच रामदास यांनीं जे आदराचे अुद्‌गार काढले आहेत ते खरोखर बहुमोल आहेत. कारण ते दोघेहि शिवाजीचे समकालीन होते. महाकवी मोरोपंतांनीं शिवाजीची तुलना जनकराजाशीं केली आहे ती अतिशयोक्ति आहे असें समजून आपण सोडून देअूं; पण शिवाजीमहाराज जेवढे राज्यसंस्थापक होते तेवढेंच धर्मरक्षक होते. त्यांनीं ब्राह्मणांना विशेष दान दिल्याचें अुदाहरण आढळत नाहीं; त्यांनीं, अेखादी गोशाळाहि स्थापन केली नव्हती; तरीहि महाराष्ट्राच्या जनतेनें त्यांना 'गोब्राह्मणप्रतिपालक छत्रपति' अशी पदवी अर्पण केली होती.

अि. स. ७०० मध्यें मुसलमान जेव्हां हिंदुस्थानांत येअूं लागले त्यावेळीं या देशाची स्थिति कांहीं चांगली नव्हती. लोकांमध्यें आपसांत फूट, जातीच्या अुच्चनीचतेचा अभिमान, संशय, आळस आणि बेसावधपणा यांचेंच साम्राज्य सर्वत्र फैलावलें होतें. श्रीशंकराचार्यांनीं हिंदुसमाजाला संघटित करण्याकरितां जो प्रयत्न आरंभिला होता तो अि. स. १५०० पर्यंत अनेक संतांनीं पुढें चालविला. वेदांताचा सूर्य आणि भक्तीचें चांदणें या दोहोंचा परिणाम होअून हिंदुधर्माचें सनातनत्व पुनः अेकवार अुजळ झालें, तरी राजकीय आणि सामाजिक स्थिति परिपूर्ण सुधारली नव्हती; त्यामुळें पुष्कळ लोक धर्मांतर करूं लागले. यांत जबरदस्तीचा भाग कितीहि असला तरी जबरदस्तीनें अितके लोक खात्रीनें बाटले गेले नसते. अनेक कारागीर जाती निष्का-

रण अस्पृश्य मानल्या गेल्यानें कष्टी झाल्या होत्या. त्यांना सामाजिक छळाव्यतिरिक्त सरकारी जुलूमसुद्धां पुष्कळ सहन करावा लागे. अितिहासाचा असा पुरावा आहे की या त्रासाला कंटाळून जाअून कित्येक जातीच्या जाती दुसऱ्या धर्मांत गेल्या, आणि अशा रीतीनेंच त्यांना आपली अस्पृश्यता चुकवितां आली.

मुसलमानांचा हल्ला पंजाबापासून जो सुरू झाला तो पूर्वेकडे बंगाल–अुत्कल-पर्यंत गेला, आणि दक्षिणेंत पांड्य, केरल आणि चोल लोकांच्या राज्यांपर्यंत पोचला. अि. स. १३०० पर्यंतच्या [illegible]त हें आक्रमण जवळजवळ पुरें झालें. त्यावेळीं दक्षिणेंत अनागोंदी आणि हम्पीच्या बाजूला होयशळ वंशानें हिंदुसंघटन करण्याचा अेक मोठा जबरदस्त आणि यशस्वी प्रयोग करून विजयनगरचें साम्राज्य स्थापिलें. हें साम्राज्य फक्त दोनशें वर्षेपर्यंतच टिकलें असलें तरी बगदादचा बादशहा आणि चीनचा सम्राट या दोघांहूनहि विजयनगरच्या 'त्रिमुकुटधारी' महाराजाधिराजांचें वैभव मोठें गणलें जात होते. विजयनगरानें जुन्या हिंदु संस्कृतीचा अुद्धार करण्याचा पुनः अेकदां पुरापुरा प्रयत्न करून पाहिला. त्यानें वेदविद्या पुनः सुरू केली; व्रतें अुत्सव अित्यादींचा विस्तार केला. शेवटीं श्रुति–स्मृति– पुराण आणि तंत्र यांच्या द्वारां विस्तार पावलेला हिंदुधर्म राजमान्य झाला.

पण त्यांच्या या प्रयत्नांत आवश्यक तितक्या आधुनिकतेला आणि मानवतेला स्थान न मिळाल्यामुळें राकसतागडीच्या लढाअींत ( जिला तालीकोटचें युद्ध असेंहि म्हणतात ) विजयनगरच्या साम्राज्याचा अेकाअेकी नाश झाला आणि हिंदुधर्म त्याचप्रमाणें हिंदुसमाज पुनः अनाथ झाले.

अशा स्थितींत येअून पडलेल्या हिंदु समाजांत पुनः सजीव होण्याची जी तळमळ होती आणि ज्या तळमळीवर साधुसंतांनीं चिंतन केलें होतें ती तळमळ शिवाजी महाराजांमध्यें प्रगट झाली आणि त्यांनी ' हिंदवी स्वराज्य' पुनः प्रस्थापित करण्याची प्रतिज्ञा केली.

शिवाजीच्या मनांत मुसलमानी धर्माविषयीं, त्यांच्या साधूविषयीं किंवा धर्मग्रंथा-विषयीं लेशमात्रहि तिरस्कार नव्हता ही नमूद करून ठेवण्याजोगी गोष्ट आहे. मुसलमानांच्या मशिदी, रोजे किंवा कबरस्तानें हिंदु लोकांनीं फोडल्याचें अुदाहरण अेकहि नाहीं. हिंदु लोकांना केवळ आपल्याच धर्माविषयीं नव्हे तर

धर्ममात्राविषयीं श्रद्धा आणि आदर असतो. माणसाला वर चढवितो तो धर्म. त्याचा नाश होऊं दिला तर मानवतेचाच नाश होईल, ऐवढें हिंदूंना चांगलें समजूं लागलें होतें. त्यांचा जर कांहीं दोष असेल तर तो ऐवढाच कीं फुंकणीचा उपयोग करून अग्नि जसा प्रज्वलित ठेवावा लागतो तसें जीवनाच्या शुद्धीकरणाच्या आणि संस्करणाच्या द्वारां धर्माचेंहि संस्करण करण्याची जी आवश्यकता असते त्या बाबतींत ते पुरेसे जागृत नव्हते.

शिवाजीच्या वेळीं समाजावर संतमताची छाप पुष्कळ पडली होती. संतमताचा प्रसारहि पुष्कळ झाला होता आणि तुकाराम व रामदास हे दोन प्रभावशाली धर्मसुधारक धर्मसेवा करीत होते. तुकारामांनी पंढरपुरच्या 'वारी'ची संस्था चालवून भक्तिसंप्रदायाचें संघटन केलें तर रामदासांनी ठिकठिकाणीं आपले मठ आणि हनुमानाच्या मंदिराबरोबर आखाडे स्थापून वर्णाश्रमधर्माचें संघटन केलें.

याचबरोबर शिवाजीनें प्राचीन काळापासून देशाचें संरक्षण करीत आलेले किल्ले जिंकून घेऊन राज्याचें संघटन केलें. धर्मांतर केलेल्या सरदारांना परत हिंदुधर्मांत घेणें, सैन्यांत हिंदूंच्याबरोबर मुसलमानांनाहि दाखल करून घेणें, राज्यकारभारांत सर्व जातीच्या लोकांना स्थान देणें, जहागिरी आणि इनामें कोणालाहि न देण्याचा नियम करून राज्य बळकट करणें, चांगल्या लोकांच्या शिफारशीनें आलेल्या निष्ठावान् लोकांनाच फौजेंत आणि राज्यकारभारांत घेणे-अशा प्रकारच्या मार्गांनी शिवाजीनें आपलें राज्यतंत्र संघटित, बळकट आणि कार्यकुशल (efficient) बनविलें आणि हळूहळू आपलें नौकासैन्यहि उभें करून व्यापार वाढविण्याचा प्रयत्न केला.

शिवाजी महाराजांचा इतिहास पाहिला असतां ते आपल्या काळाच्या पुष्कळ पुढें होते हें स्पष्ट दिसून येतें. प्रत्येक काम वेळेवर झालेंच पाहिजे, ठरविलेली योजना ठरलेल्या क्रमानें पार पडलीच पाहिजे, होत असलेला खर्च हिशेबाच्या आणि प्रमाणाच्या बाहेर जातांच कामा नये, हुकुमाच्या अंमलबजावणींत थोडीशीसुद्धां चूक होतां कामा नये, या सर्व बाबतींत शिवाजीची चिकाटी जवळजवळ इंग्रजांमारखी होती. राज्य चालविण्यासाठीं अखंड द्रव्यबळ आणि मनुष्यबळ पाहिजे हें शिवाजीमहाराजांना चांगलें माहीत होतें, आणि म्हणून आपलें सगळें बळ खर्चून त्यांनी या दोहोंचा पुष्कळ संग्रह केला होता. शिवाजीचा मुलगा संभाजी

यानें बापाच्या या हरेक प्रकारच्या कमाओचा पुष्कळ नाश केला तरीसुद्धां राजारामाच्या वेळीं महाराष्ट्र, जातीनें येअून लढणाऱ्या औरंगजेबाशीं अठरा वर्षे झुंजला, अितकेंच नव्हे तर शेवटीं या सम्राटाचा त्यानें बळी घेतला आणि आपलें समवायतंत्र ( अनेक स्वायत्त समूहांचें अेकत्र राज्यतंत्र–फेडरेशन ) त्यानें स्थापन केलें. हीं अेकच गोष्ट शिवाजीच्या योग्यतेचा भरपूर पुरावा आहे.

शिवाजीच्या अेका सरदारानें, त्या वेळच्या रिवाजाप्रमाणें लढाओच्या लुटींत कल्याणच्या सुभेदाराच्या खुबसूरत सुनेला पकडून आणून शिवाजीला नजर म्हणून अर्पण केली. पण तरुण शिवाजीनें मनांत कसलेंहि पाप न आणतां तिला बहिण समजून भावाची भेट म्हणून दोन गांवें अिनाम दिलीं आणि सन्मानानें परत पाठविली. त्या युवतीचें रूपलावण्य पाहून शिवाजी अेवढेंच म्हणाला, ' माझी आओ अितकी खुबसूरत असती तर मीहि खुबसूरत झालों असतों. '

शिवाजीच्या आओनें रामायण–महाभारतांतील आदर्शांचें शिक्षण आपल्या मुलाला दिलें होतें, आणि धर्मासाठीं जगावें आणि धर्मासाठीं मरावें अशा प्रकारची शिकवणहि तिनें त्याला दिली होती. शक्ति–अुपासक शिवाजीनें देशाची धर्मशक्ति झळझळीत केली आणि हिंदुस्थानापुढें अेक अुच्च अुज्ज्वल आदर्श ठेवला. अन्यायाशीं झगडणें आणि कोणत्याहि प्रसंगीं धैर्य खचूं न देणें, हा त्याचा जीवनमंत्र होता.

२५–५–३८.

# शिवाजीजयंती

**फाल्गुन वद्य ३** **१ दिवस.**

[ गुजरातचा आणि महाराष्ट्राचा संबंध तुटण्यासारखा नाहीं. जसे महाराष्ट्रांत गुजराती वसले आहेत तसे गुजरातेंतहि महाराष्ट्रीय कायम झालेले आहेत. महाराष्ट्र हा अुत्सवप्रिय आहे. त्यानें गणेशचतुर्थीसारख्या कित्येक सणांना मोठें सामाजिक आणि राष्ट्रीय स्वरूप दिलें आहे. हे सारे सण गुजरातेंत चालूं शकणार नाहींत. पण महाराष्ट्रीयांसाठीं अेक सण ठेवून तो गुजरातीयांनी आणि महाराष्ट्रीयांनी मिळून साजरा करावा हें अिच्छिण्याजोगें आहे.

शिवाजीजयंती साजरी करण्यांत विशेष अर्थ आहे. अिंग्रज अितिहासकारांनी शिवाजीला गुजरातेचा वैरी दाखविला आहे, ही छाप धुवून काढण्यासाठीं आणि महाराष्ट्रांतील रामदासासारख्या साधुसंतांचें स्मरण करण्याकरितां फाल्गुन वद्य ३, हा दिवस निश्चित करावा. ज्ञानेश्वर, अेकनाथ, तुकाराम, नामदेव, जनाबाअी मुक्ताबाअी वगैरे महाराष्ट्र संतांचें तर्पण याच दिवशीं करतां येअील. हा सण साजरा करण्यांत महाराष्ट्रीयांचा सल्ला आणि मदत खुशाल घ्यावी. पण त्याचा पुढाकार गुजराती लोकांनीच घ्यावा हें अुत्तम. रामदासांचा आणि ज्ञानेश्वरांचा परिचय गुजरातींत होअूं शकेल. अितर साधुसंतांविषयीं या सणाच्या अनुषंगानें थोडीफार माहिती मिळाली, त्यांच्या कवितांचा गुजरातींत अनुवाद झाला तर साहित्यांत तेवढी भरच पडेल.

या दिवशीं सर्व प्रकारचे मर्दानी खेळ ठेवावेत.

—मूळ गुजरातीवरून. ]

फर्ग्युसन कॉलेजमध्यें महाराष्ट्रीय मंडळी शिवाजी-अुत्सव करीत असत. पुढें १९०६-०७ ची राष्ट्रीय चळवळ सुरू झाली तेव्हां या अुत्सवाला सर्व प्रांतांच्या विद्यार्थ्यांचा समावेश होअूं शकेल असें राष्ट्रीय स्वरूप आम्हीं दिलें.

पुढें जेव्हां गुजरातमध्यें वास्तव्य झालें तेव्हां शिवाजीअुत्सवाच्या वेळीं अेक गोष्ट दिसून आली कीं शिवाजीनें सुरत शहर लुटलें आणि पेशव्यांनी आपल्या सरदारांच्या मार्फत गुजरातवर दरारा बसविला, याचा तेथील लोकांच्या मनावर जो परिणाम झाला आहे त्याचा विचार करूनच तेथील शिवाजीअुत्सव चालविला पाहिजे. या प्रयत्नाला यश येअून शिवाजी–अुत्सव महाराष्ट्रीयांनी सुरू न करतां गुजरातच्या लोकांनी सुरू करावा व तो पुढें चालवावा आणि महाराष्ट्रीयांनी त्या अुत्सवांत प्रसन्नतेनें भाग घ्यावा असा रिवाज सुरू केला. त्याला अुद्देशूनच वरील लेख लिहिला होता. आज देशांत जेव्हां हिंदुमुसलमानांची तेढ वाढली आहे अशा वेळीं जर या तेढीच्या दृष्टीनेंच आपण शिवाजी - अुत्सव चालवूं लागलो तर शिवाजीचें जीवनकार्य आपण पूर्णपणें ओळखलें नाहीं असेंच म्हणावें लागेल.

शिवाजीला राज्य स्थापन करायचें होतें, स्वतंत्र व्हायचें होतें, अन्यायाचा प्रतिकार करायचा होता, स्वजनांची भरभराट डोळ्यांनीं पहायची होती; मुसलमानी धर्माचा त्याला द्वेष नव्हता, मुसलमानी समाजाचा अुच्छेद करण्याचा त्याचा हेतु नव्हता. त्याला हिंदूंमधील जातिद्वेष, फूट आणि जहागीर–निष्ठा वगैरे दोष दूर करायचे होते. या दृष्टीनेंच आपणहि शिवाजी–अुत्सव साजरा केला पाहिजे. महाराष्ट्रांतील सर्व जातींच्या लोकांना अेकत्र करून सर्वांचा सामुदायिक अुत्सव करणें व असा सामुदायिक अुत्सव करण्यासाठीं जी कांहीं अुदारता आणि सहिष्णुता दाखवावी लागेल ती दाखविणें हें आपलें मुख्य काम आहे. शिवाजी-अुत्सव हा शिवाजीसाठीं नसून आपल्यासाठीं आहे हें ध्यानांत ठेवून अुत्सव केला पाहिजे. यासाठीं खालील गोष्टी करण्याजोग्या आहेत.

( १ ) शिवकालीन साहित्याचा संग्रह पुष्कळ झाला आहे, आणि पुष्कळ होण्यासारखा आहे. परंतु हें सर्व साहित्य अितिहाससंशोधकांखेरीज अितर लोक फारसे वाचीत नाहींत. या साहित्यापैकीं अुद्बोधक भाग अेकत्र करून त्याचीं पारायणें करणें हा अेक सुंदर कार्यक्रम होअील.

( २ ) शिवकालीन घडामोडींचा अितिहास आपण नेहमीं वाचतों, पण शिव-

कालीन राज्यव्यवस्थाकशी होती, समाजव्यवस्था कशी होती, शिवाजीचें सैन्य कसें बनलें होतें वगैरे गोष्टी तरुण पिढीपुढें अधिकाधिक आल्या पाहिजेत. याविषयीं काल्पनिक वर्णनें न लिहितां अैतिहासिक पुराव्यानिशीं लिहिलेले निबंध तयार करविले पाहिजेत.

( ३ ) शिवाजीच्या अितिहासांत प्रसिद्धीस आलेलीं स्थानें, तीर्थक्षेत्रें, किल्ले, देवळें वगैरेची यात्रा करणें हा अेक महत्त्वाचा कार्यक्रम या अुत्सवांत असलाच पाहिजे.

( ४ ) शिवाजीप्रमाणेंच ज्यांनी राष्ट्रोद्धाराचें कार्य केलें आहे अशा देशदेशांतरांतील स्वराज्यसंस्थापकांचा अितिहास देअून असे राष्ट्रपुरुष कसे निर्माण होतात आणि संस्कृतीवर त्यांचा काय परिणाम होतो याचा अूहापोह शिक्षणसंस्थांतून झाला पाहिजे.

( ५ ) शिवाजीच्या वेळीं आणि राजारामाच्या वेळीं आपले जे सामाजिक दोष नजरेस आले आणि धर्माच्या बाबतींतील जी संकुचित वृत्ति आपल्याला नडली त्याचें विवेचनहि या दिवशीं समाजापुढें निर्भयपणें मांडलें पाहिजे.

( ६ ) पोवाडे आणि भालाबोथाटी यांचा कार्यक्रम ठेवून आपण पाहिला, त्याला द्यायचें तें प्रोत्साहनहि दिलें; आतां तो कार्यक्रम कालग्रस्त झाला आहे असें समजून त्याच्याअैवजीं संघव्यायाम, कवायत वगैरे नवीन पद्धतीच्या गोष्टी सुरू केल्या पाहिजेत.

शिवाजीच्या जीवनकार्याचें यथार्थ आकलन करून घेअून तत्कालीन निरनिराळ्या प्रसंगावर साध्या भारदस्त भाषेंत आणि अगदीं नवीन प्रकारच्या चालींत नवे पोवाडे झाले पाहिजेत, कारण पोवाडे म्हणजे जनतेचा दीक्षामंत्र होय.

( ७ ) शिवकालीं ज्याप्रमाणें अुत्कृष्ट सैनिक तयार करण्याच्या शाळा गांवोगांवीं असत त्याचप्रमाणें घोड्यांची आणि तट्टांची अवलाद सुधारण्यासाठीं सतत प्रयत्न चालू असे. त्याविषयींचे अैतिहासिक अुल्लेख शोधून काढीत बसण्यापेक्षां आपल्या अुत्सवांत फेरफटका करण्याचे कार्यक्रम ठेवले तर विशेष फायदा होअील. महाराष्ट्रांत ज़िकडे तिकडे 'मोटरबशी' चालवून आपण महाराष्ट्रीय संस्कृतीच-

जितका नाश केला आहे तितका इंग्रजी शिक्षणानेंहि झाला नसेल. या डोंगराळ मुलुखांत घोडा हाच मनुष्याचा साथीदार असावयास पाहिजे होता; त्याच्याऐवजी पुण्याच्या आसपास खेडेगांवांत सायकलींचा सुळसुळाट झालेला पाहून देखील महाराष्ट्रीय संस्कृतीच्या अभिमान्यांचें चित्त अस्वस्थ होत नाहीं यावर इलाज शिवजयंतीच्या द्वारां केला पाहिजे.

( ८ ) शिवाजीसंबंधीं नाटकें लिहून नाट्यप्रयोग करण्याच्या पद्धतींतदेखील फारच मोठा फेरफार केला पाहिजे. मुसलमानांचा द्वेष करणें सोपें आहे, पण तसें करण्यापेक्षां त्यांना ओळखण्याचा प्रयत्न केला तर तो अधिक फायदेशीर होईल. विद्रूप चित्रें रेखाटण्यानें स्वकीयांचें शिक्षण बिघडतें. त्यांना सत्यज्ञान नसतें आणि म्हणून सामर्थ्य क्षीण होतें.

फाल्गुन व० ६ १ दिवस

अयाचित दानवृत्तीनें राहाणाऱ्या गृहस्थाश्रमी ब्राह्मणसमाजाचे एकनाथ हे अुत्कृष्ट प्रतिनिधि होत आणि म्हणूनच या समाजावलंबी ब्राह्मणानें दाखविलेलें सुधारकी नीतिधैर्य लोकोत्तर म्हणावें लागेल.

गुरूचें अुपास्यदैवत निराळें आणि गुरुनिष्ठ शिष्याचें अुपास्यदैवत निराळें असा अद्भुत प्रकार अेकनाथाच्या जीवनांत सांपडतो. हिंदुधर्मांतील साधनाक्रम किती अुदार आहे याचें हें अुत्कृष्ट अुदाहरण आहे. जगांतील कोणत्याहि धर्माच्या अितिहासांत असलें अुदाहरण क्वचितच सांपडेल. अेकनाथांच्या जीवनांत काय आणि लेखनांत काय सर्वत्र अुत्कटता दिसून येते. जी बाजू रंगवितील तिच्याशीं अगदीं तदाकार होअून रंगवितील, मागेंपुढें पाहाणार नाहींत.

अेकनाथ गुरुगृहीं गेले. गुरूंनी त्यांना शिक्याखालीं जेवावयाला बसवून त्यांची प्रवेशपरीक्षा घेतली. अुद्देश–प्राप्तीची अेकाग्रता अथवा साधननिष्ठा अेकनाथांत आहे असे दिसल्याबरोबर जनार्दनपंतांनी त्याला जवळ केलें आणि त्याला व्यवहाराचींच कामें सांगितलीं. हा मुलगा एक पैची देखील चूक सहन करणार नाहीं अशी खात्री झाल्यानंतर त्यांनी त्याला अध्यात्मज्ञानाची ओळख करून दिली, अितकेंच नव्हे तर अुपास्यदेवतेचें दर्शनहि करवून दिलें.

हिंदुधर्मामध्यें अभेदभक्तीचें माहात्म्य सांगितलें आहे. भक्त आणि अीश्वर यांचेमधील अभेद अनेक संतांनी आपलासा केला आहे, पण शिष्यानें गुरूशीं अभेद केलेला अशीं अुदाहरणें थोडीं आहेत. आपण जें कांहीं लिहितों तें गुरूच आपल्या-मार्फत लिहीत आहे, जनार्दन आणि अेका यांच्यामध्यें अैक्य आहे असें सांगणाऱ्या आणि अनुभवणाऱ्या अेकनाथाचें अुपास्यदैवत भिन्न असावें आणि जनार्दनांनी त्याला त्याच्या अभिरुचीप्रमाणें भिन्न अुपास्याची दीक्षा द्यावी हें खरोखर आश्चर्यकारक आणि समाधानकारक आहे.

अभेदभक्तीमध्यें मुरलेल्या अेकनाथाला 'अंत्यजतोक कडे घेतांना' संकोच कां म्हणून वाटावा, आणि श्राद्धाचें अन्न भुकेल्या हरिजनांना समर्पण करतांना अधर्म कसा दिसावा? सनातन हिंदु समाजानें हिंदुधर्माचा जितका द्रोह केला आहे तितका तो अितरांनी केला नसेल.

अेकनाथ हृदयधर्म समजत असत, पाळीत असत, आणि शास्त्रांचा अर्थ हृदयधर्माला विचारूनच करीत असत. जें काम व्यास--वाल्मीकींनी केलें-धर्मप्रचारांतील अधिकारवाद काढून टाकला-तेंच काम ज्ञानदेव आणि अेकनाथ यांनी संस्कृत ग्रंथांतील हार्द स्वभाषेंत आणून केलें. आणि हे दोघे महाराष्ट्र-संत स्वतः ब्राह्मण असल्यानें यांच्या कार्याचें महत्त्व विशेष आहे.

संस्कृत विद्येला मराठी पोशाख चढविणाऱ्या या ल्यूथरला काशीच्या पंडितांनी आपल्या धर्मासनापुढें जाब देण्यासाठीं बोलाविलें. पण शेवटीं त्यांना अेकनाथांचा गौरवच करावा लागला.

महाराष्ट्राच्या धार्मिक शिक्षणांत अेकनाथी भागवताला चांगलेंच महत्त्वाचें स्थान द्यावें लागेल. भाषेच्या दृष्टीनें देखील 'नाथभागवत' म्हणजे मराठीच्या साम्राज्यांतील अेक मोठा समृद्ध प्रांत आहे. रूढीधर्माविषयीं अुदासीनता, सदाचार-पालनाचा आग्रह, धर्मप्रचाराची कळकळ आणि अभेदभक्ति हें महाराष्ट्र-संत-धर्माचें खरें स्वरूप आहे. तें अेकनाथामध्य पूर्णपणें प्रतिबिंबित झालेलें दिसून येतें.

---

# नाथषष्टि

## फाल्गुन व. ६

नाथषष्टि हा दिवस अनेक रीतींनी महत्त्वाचा झाला आहे. त्या दिवशीं श्रीजनार्दनस्वामींचेंहि स्मरण केलें पाहिजे आणि नाथांच्या शिकवणुकीला देखील अुजळा दिला पाहिजे.

बंगालकडे चैतन्यसंप्रदायाची भक्ति, मध्यदेशांतील रामानंद संप्रदायाची भक्ति, पंजाबांतील शीख संप्रदायाची भक्ति, गुजरातमधील वल्लभपंथाची भक्ति महाराष्ट्रांतील पंढरपुरी संतांची भक्ति आणि दक्षिणेकडील अळवारांची भक्ति या सर्वांचा संग्रह करून त्यांची तुलना केली पाहिजे, आणि दरेक प्रकारच्या समाजावर त्यांचा बरावाअीट काय परिणाम झाला तें तपासलें पाहिजे; आणि मग अेखाद्या नवीन नारदानें नव्या प्रकारची भक्तिसूत्रें लिहून काढलीं पाहिजेत. नाथषष्टीच्या दिवशीं भागवत धर्माचा अूहापोह केला पाहिजे. न्या. रानड्यांची थोडी बहुत मदत होअीलच.

---

[ डिसेंबर २५ ]

प्रेममूर्ति भगवद्भक्त ब्रह्मचारी ओशूनें ओश्वराची अेक अद्भुन विभूति प्रगट केली आहे. बुद्ध भगवानाप्रमाणेंच ओशूचें जीवनहि करुणगंभीर आणि अुदात्तकोमळ आहे. अेक सुताराचा अशिक्षित मुलगा आपल्या काळच्या साधुपुरुषांना आणि धर्माचार्यांना प्रश्न विचारविचारून स्वतंत्रपणें धार्मिकता अंगीं आणीत गेला आणि केवळ श्रद्धेनें आणि ओश्वरकृपेनें ओश्वरपरायण भक्त बनला. ओश्वर सर्वशक्तिमान आहे असें सर्वचजण बोलत होते, पण ओश्वर क्षमावान् आहे अितकेंच नव्हें तर सर्वंसह आहे हें ओळखणाऱ्या सत्पुरुषांतसुद्धां ओशूचें स्थान कांहीं निराळेंच आहे. ब्रह्मचर्याचें माहात्म्य ओळखून हें रसायन ( जराव्याधि दूर करण्याचें औषध ) सिद्ध करणारे तपस्वी पुष्कळ झाले आहेत. पण ब्रह्मचर्य ज्यांना सहजसिद्ध होतें अशा सत्पुरुषांतसुद्धां ओशु विशेषत्वानें नजरेपुढें येतो कारण त्या ओश्वरी प्रसादाचा त्याला अहंकार नव्हता. तो म्हणे ब्रह्मचर्य हे ओश्वरानें ज्याला दिलें असेल त्यालाच सहजसिद्ध आहे. अितरांनीं लोखंडाचे चणेच खावे. कोणा अेखाद्या ब्रह्मचाऱ्यानें स्त्रीजातींच्या अुद्धारासाठीं आपलें हृदय पिळून काढलें असेल तर तें अेक ओशूनेंच. अितकी अुत्तमता त्याच्या युगाला पचवितां आली नाहीं म्हणून ज्या अपराधासाठीं सॉक्रेटिसाला देहांतशासन मिळालें त्याच अपराधाबद्दल प्रभुपुत्र ओशूला क्रूसावर चढावें लागलें. अनेक अवतारी पुरुषांनीं आपापल्या शिष्यांना आणि भक्तांना भक्तिधर्माची दीक्षा दिली आहे. ओशूनें आपल्या श्रावकांना आणि अनुयायांना केलेल्या अुपदेशांपैकीं जे चार दोन संगृहित केले गेले आहेत त्यांचा परिणाम, हजारो वर्षें झालीं, कोट्यावधि लोकांवर झाला आहे. अशा कारुण्यवीराच्या नांवानें अेक स्वतंत्र धर्म स्थापला जावा हें अेकप्रकारें दुर्दैवच म्हणायचें. त्याच्या अनुयायांनीं स्वतंत्र धर्म स्थापून ख्रिस्ताच्या अुपदेशाची व्यापकता मर्यादित केली आहे असें वाटल्यावांचून राहात नाहीं. तें कांहींहि असो.

सर्वच धर्मांच्या लोकांनीं आजच्या खिस्ती म्हटल्या जाणाऱ्या लोकांकडे न पाहातां खिस्ताच्या जीवनाकडे, अुपदेशाकडे आणि बलिदानाकडे पहावें, आणि त्या अुपदेशाप्रमाणें वागणाऱ्या संतांच्या जीवनाकडे पहावें.

हीच दृष्टि अितर धर्मांविषयीं ठेवणेंहि अिष्ट आहे.

९–६–३८

---

# नाताळ

## डिसेंबर २५ — १ दिवस.

हिंदुदेवीच्या दरबारांत प्रत्येक धर्माला, पंथाला आणि मताला स्थान आहे. हिंदुधर्माचा कोणत्याहि धर्माशीं विरोध नाहीं. ‘ यस्मान्नोद्विजते लोको लोकान्नोद्विजते च यः ’ ही वृत्ति हिंदुधर्माच्या हाडांतच आहे.

त्यागी, ब्रह्मचारी, भगवद्भक्त, निष्ठावीर अीशु खिस्ताची जयंतीहि आपण अवश्य साजरी करावी, अर्थात आपल्या पद्धतीनें साजरी करावी. हिंदुधर्मांत सद्गुरूच्या अुपासनेचा जो मार्ग आहे, ‘ यस्य देवे पराभक्तिः यथा देवे तथा गुरौ ’ * ची जी वृत्ति आहे, तिचेंच अेक स्वरूप हा खिस्तीधर्म आहे. या दिवशीं अीशूचें गिरिप्रवचन ( Sermon on the Mount ) वाचावें. आपल्या शेजारीं कोणी दीन, दुःखी किंवा आजारी असेल तर त्याची सेवा करावी. ज्याच्याजवळ न्यून असेल त्याला कांहीं आपण द्यावें. अीशूच्या बलिदानाची हकिकत विद्यार्थ्यांना वाचून दाखवावी. खिस्ती मित्रांना भेटीला बोलवावें. त्यांच्या येथें आपण जावें.

---

* देवाच्या ठिकाणीं जितकी भक्ति तितकीच गुरूच्या ठिकाणीं.

शिया आणि सुन्नी यांच्यांत कोणता मतभेद आहे, अिस्लामी धर्मपुरुषांत हसन आणि हुसेन यांचें काय स्थान आहे, या बाबतींत हिंदूंनीं अुदासीन राहावें वाटलें तर, पण आशियाच्या पश्चिम प्रदेशांत, अरबस्तानच्या पुण्यभूमींत धर्मा-प्रीत्यर्थ केवढें अपूर्व बलिदान करण्यांत आलें आणि पैगंबरांच्या आज्ञा व अुपदेश यांना अिमानदार राहाण्यासाठीं धर्मनिष्ठ मुसलमानांनी काय काय सोडून दिलें, किती सहन केलें आणि सबंध इतिहासांत किती बहादुरीनें क्षात्रधर्माच्या सर्व अंगांचें पालन केलें हें सर्व पहाणें आपल्या दृष्टीनें महत्त्वाचें आहे. मोहरमचा सण हा अिस्लामी बंधूंचा अेक श्राद्धाचा दिवस आहे. आणि अिस्लामच्या मोठ्यांत मोठ्या शहीदांचे ( हुतात्म्यांचें ) स्मरण करून देण्याची शक्ति या सणांत आहे. आपले अिस्लामी बंधू मोहरमांत अशा जुन्या प्रसंगामधून धर्मनिष्ठा मिळवितात, आणि तितक्या अंशांनी भारतवर्षाच्या धर्मनिष्ठेंत भर टाकतात. हिंदुस्थान ही धर्मभूमि आहे. तिच्यामध्यें प्रत्येक जमात जितक्या अंशांनी धर्मनिष्ठा अंगीं बाणवून घेअील तितक्या अंशांनी या धर्मभूमीचीच शक्ति वाढेल.

३–९–२२

---

# मोहरम

१ दिवस

धर्मवीराचा हा सण आहे. ताबूतांत आपण जरी भाग घेअूं शकलों नाहीं तरी धर्माच्या नांवानें जे कोणी प्राणार्पण करण्याला तयार होतात त्यांच्या चरित्रांमधून आणि मरणापासून आपल्याला अवश्य प्रेरणा मिळण्याजोगी आहे. अिमाम हुसेनाची कथा, खिलाफतीचा प्राचीन अितिहास आणि करबला येथील भीषण प्रसंग मुलांना आपण समजावून द्यावा. शिया आणि सुन्नी यामधील भेदहि मुलांना माहीत असावा. ×

या दिवशीं मुसलमान मित्रांना मुद्दाम भेटायला बोलवावें. त्यांच्याकडे त्या दिवशीं पशुवध झाला नसेल तर मुद्दाम भेटायला जावें.

---

× मोहरमसंबंधीं माहिती टीपत दिली आहे.

# ऐक्याचा सण : : ४९

## ( बकर ईद )

ईश्वरभक्ति आणि कौटुंबिक मोह या दोहोंमध्यें परापूर्व काळापासून युद्ध चालत आलें आहे. प्रत्येक धर्मात धर्मपालनार्थ कौटुंबिक मोहाचा नाश करणाऱ्या भक्तांचीं अनेक उदाहरणें आहेत.

एकादशी व्रताची एक अशी कथा आहे की राजा रुक्मांगदानें आपल्या आवडत्या राणीला एक वरदान दिले होतें. राजा परमवैष्णव होता आणि तो एकादशीव्रत करीत असे. राणीनें राजाजवळ वरदान मागितलें कीं व्रत मोडून एक भोजन तरी करा, नाहींतर आपल्या आवडत्या पुत्राचा वध करा. व्रत मोडणें राजाला अशक्य होतें. पितृभक्त पुत्रानें राजाला आग्रह केला कीं वचन पाळण्यासाठीं माझा तुम्ही वध करावा हेंच योग्य; मी मरायलातयार आहे. राजा शस्त्र उगारतो इतक्यांत भक्तवत्सल भगवान विष्णु वरच्यावरच त्याचा हात धरून ठेवतात.

स्त्रीपुत्राला विकून टाकणारा हरिश्चंद्र आणि सीतेचा त्याग करणारे रामचंद्रहि याच कोटीचीं माणसें होऊन गेलीं. धन्याच्या पुत्राचें रक्षण करण्यासाठीं स्वतःच्या मुलाचें बलिदान करणारी पन्नाहि याच भक्त कोटींतील होती.

अशाच एका भक्तराजाचें स्मारक म्हणून मुसलमान लोकांमध्यें बकरईदचा सण प्रचलित झाला. हा सण महंमद पैगंबरांनी सुरू केलेला नाहीं. पैगंबरांच्या पूर्वीच्या धर्मामधून घेतलेला असल्यामुळें तो पुष्कळ प्राचीन आहे.

ईश्वरनिष्ठ इब्राहिमला दोन मुलगे होते. त्यांतल्या लहानाचें नांव इस्माइल. पित्याचें इस्माइलवर असलेलें विशेष प्रेम पाहून सैतान ईश्वराला, म्हणाला, 'बघितली तुझ्या भक्ताची भक्ति' ! तुला वाटतें कीं हा आपला भक्त आहे, पण हा आहे मात्र पुत्रभक्त ! बघ, मुलामागें किती पागल झाला आहे. तो ! ' इब्राहिमच्या स्वप्नांत येऊन ईश्वरानें त्याला कुरबानी करायला सांगितलें. कुरबानीचा कायदा असा आहे कीं जी वस्तु अपल्याला अत्यंत प्रिय असेल, जी

आपण बहुमोल मानीत असूं तीच कुरबान केली पाहिजे. अिब्राहिमनें दुसऱ्या दिवशीं गायीची कीं बकऱ्याची कुरबानी केली. पण पुनः तसेंच स्वप्न पडलें कीं कुरबानी कर. त्यानें जास्ती बलिदान केलें तरी पुनः आपलें तेंच स्वप्न! त्यानें नम्र होअून अीश्वराची प्रार्थना केली आणि विचारलें, ओ मालिक, तुला कोणाची कुरबानी पाहिजे?, अीश्वरानें सांगितलें ' तुझ्या लाडक्या मुलाची. '

भक्तश्रेष्ठ अिब्राहिमच्या हृदयावर अेवढासासुद्धां आघात झाला नाहीं. त्यानें अीश्वराला सर्वस्व अर्पण केलें होतें. दुसऱ्या दिवशीं मुलाला घेअून भक्तराज कुरबानीच्या जागीं जायला निघाला. सैतानानें आअीला आणि मुलाला फुसलावण्याचा प्रयत्न केला, पण या प्रेमळ कुटुंबांत अीश्वरभक्ति अितकी कांहीं दृढ होती कीं तिघांतून अेकजणसुद्धां मोहवश झालें नाहीं. बापानें मुलाच्या मानेवर सुरी ठेवली, पण अीश्वरानें त्याला थांबविलें आणि अिस्माअिलच्या बदलीं अेखाद्या पशूचीच कुरबानी मान्य केली. अिब्राहिम, अिस्माअिल आणि अिस्माअिलचा माता तिघांची परीक्षा पुरी झाली आणि सैतान फजित पावला.

या अिस्माअिलच्या वंशांतच अिस्लामी धर्माचे देवदूत जे महंमद पैगंबर त्यांचा जन्म झाला.

अशा या अद्भुत प्रसंगाच्या स्मरणार्थ अिस्लामी बंधू बकर-अीदच्या दिवशीं कुरबानी करतात. कौटुंबिक मोह टाकून देअून शुद्ध अीश्वर-भक्ति करणें, कर्तव्यापुढें मोहाचा नाश करणें हेंच धार्मिक तत्त्व या सणांत अंतर्भूत आहे. तें तत्त्व जितकें अिस्लामला प्रिय तितकेंच अितर धर्मांनाहि प्रिय आहे. स्वार्थ, मोह, लोभ या सर्वांचा नाश करण्याकरितां आपली आणि आपल्या प्रिय वस्तूची कुरबानी करणें हीच खरी धार्मिकता आहे. हाच महान यज्ञ आहे. त्याचें स्मारकचिह्न म्हणून प्रत्येक धर्मांत बलिदानाची प्रथा प्राचीन काळापासून चालत आलेली आहे. पण जसजशी जीवदया आपल्यांत वाढत गेली तसतशा या बलिदानामधून बाह्य वस्तू अेकअेक आपण कमी करीत आलों. नरमेध आपण सोडला, अश्वमेध सोडला मांसाचा नैवेद्य सोडला, आणि शेवटीं रेडा किंवा बकरा बळी देण्याअैवजीं अुडदाच्या पिठाचा पशु बनवून त्याचें बलिदान आपण करूं लागलों. शेवटीं कोहाळा

आणि नारळ फोडूनच आपण संतोष मानूं लागलो. पण बलिदानाची कल्पना आपण जागृत ठेवली आहे. जे मांसाहारी आहेत ते बलिदान देतांना पशु अर्पण करतात. हें आश्चर्यकारक किंवा अयुक्त नाहीं. आपण पशुहत्येचें पाप ओळखून मांसाहार सोडला म्हणून पशूचें बलिदानहि सोडलें.

हिंदुस्थानांत दयाधर्म आहे. जैनांत आहे तसा तो अितर हिंदूंतहि आहे; आणि हिंदुलोकांत आहे तसाच मुसलमानांतहि आहे. या दयाधर्मावर आपण विश्वास ठेवला तर त्याचा परिणाम सार्वत्रिक झाल्यावांचून राहाणार नाहीं. मुसलमान बंधू नेहमीं हिंदूंची भावना दुखविण्याकरितां म्हणूनच गोवध करतात ही कल्पना चुकीची आहे. ती जर आपण सोडून दिली तर आपण न सांगतां, कसल्याहि प्रकारच्या अटी न घालतां किंवा कायदे पास न करतां मुसलमान लोक यथाकाळीं गोवध सोडून देतील. मुसलमान समाजांत खानदानी आहे. शेजारधर्माचें पालन करण्याकरितां त्यांनी आजपर्यंत असंख्य वेळां आपला प्राण संकटांत घातला आहे आणि अनेकवेळां सर्वस्व गमावून ते बरबाद झाले आहेत. मुसलमान लोकहि आपल्याप्रमाणेंच शेतीवर निर्वाह करतात, आपल्याप्रमाणें त्यांचेंहि आपल्या ढोरांवर प्रेम असतें. गोऱ्या लोकांप्रमाणें गोमांस ही त्यांनी नित्याच्या आहाराची वस्तु बनविलेली नाहीं. गोरक्षणाच्या बाबतींत मुसलमान हे आपले शत्रू नाहींत, मित्र होण्याची शक्यता आहे. अिस्लामवर आपण विश्वास ठेवला तर हिंदुस्तानांतच नव्हे तर अिस्लामी जगांतहि त्यांच्या मदतीनें आपल्याला गोरक्षण करतां येअील.

बकर-ओद हा सण अेकट्या अिब्राहिमचें आणि त्याच्या सत्पुत्राचें स्मरण करण्याचाच सण नव्हे. आजपर्यंत धर्माच्या नांवानें ज्यांनी आपलें सर्वस्व अर्पण केलें आहे अशा सर्व धर्मवीरांचें या पवित्र दिवशीं आपण स्मरण करावें. हिंदुसुद्धां जर बकर-ओदच्या दिवशीं या भक्तराजाचें स्मरण करतील तर त्यांची धार्मिकता वाढल्याशिवाय राहाणार नाहीं, आणि बकर-ओदचा सण हा हिंदुस्तानांतील राष्ट्रीय अैक्य नष्ट करण्याअैवजीं तें वाढवील. जिल्हेजची दहा तारीख ही जशी अिब्राहिमचें स्मारक म्हणून आहे तशी खिलाफत व स्वराज्य यासाठीं हिंदु आणि मुसलमान अेक झाले याचेंहि ती स्मारक होअून राहील. अिब्राहिमसारख्या

पवित्र पुरुषाचा स्मारकदिन हिंदुमुसलमानांमधील झगड्यानें आपण विटाळूं नये अेवढी काळजी धार्मिक वृत्तीचे हिंदुमुसलमान अवश्य घेतील, अशी आपण आशा बाळगूं. अेकामेकाच्या खऱ्या हृदयाची ओळख झाल्यानंतर तंट्याचें मूळच राहाणार नाहीं.

६-८-२२

# बकर ओीद

## १ दिवस

आब्राहामच्या प्राचीन धर्मांतील हा सण आहे. बलिदानाचा महिमा समजावून देण्यासाठीं मुसलमानांच्या नबीसाहेबांनी त्याचें महत्त्व वाढविलें. पशूंना मारण्याची हौस म्हणून कांहीं हा सण ठेवलेला नाहीं; तर स्वःला अत्यंत प्रिय असणारी वस्तु ओश्वराला अर्पण करण्याअितकें मन तयार व्हावें यासाठीं या सणाचें प्रयोजन आहे या दिवसाची गोष्ट मुलांना सांगण्यांत यावी.

---

# स्वातंत्र्यदिन : : ५०

## ( २६ जानेवारी )

सन १८५७ च्या प्रयत्नानंतर राणी व्हिक्टोरियानें एक गोड जाहीरनामा प्रसिद्ध केला आणि कंपनी सरकारचें राज्य आपल्या ताब्यांत घेतलें. तेव्हांपासून सुशिक्षित हिंदवासियांमध्यें ब्रिटिश साम्राज्याविषयी आशा अुत्पन्न झाली आणि अिंग्रजांचें राज्य स्वीकारून त्या कृपाछत्राखाली आपल्या राष्ट्राचा विकास होअूं शकेल अशी श्रद्धा त्यांनी धारण केली. या श्रद्धेच्या पायावरच हिंदी राष्ट्रीय महासभे (कॉंग्रेस)ची स्थापना झाली. कॉंग्रेसचा सबंध अितिहास म्हणजे ही धारण केलेली श्रद्धा हळू हळूं कशी वितळत गेली या प्रक्रियेचाच अितिहास होय.

या प्रक्रियेच्या समाप्तीचा प्रारंभ गांधीजींनी नागपूर कॉंग्रेसच्या वेळेला केला. साम्राज्यांतर्गत स्वराज्य ही जुनी शब्दावली त्यांनी काढून टाकली आणि ‘ स्वराज्य ’ अेवढाच सुटसुटीत शब्द वापरला. पण राज्यकर्त्यांना त्या शब्दांतहि येथें राहावयाला कांहीं अवकाश होता. पण त्यांच्या चुकांमुळें तोहि अवकाश त्यांनी घालविला. सन १९२९ सालीं रावी नदीच्या तीरीं कॉंग्रेसनें स्वातंत्र्य अथवा पूर्ण स्वराज्य हेंच आपलें ध्येय आहे असें जाहीर करून स्वतःचें राजकीय मुख उज्ज्वल केलें. या ठरावाचें माहात्म्य स्वतंत्रतेच्या प्रतिज्ञेंत सामावलेलें आहे. हिंदुस्थानचें स्वातंत्र्य केवळ राजकीय नसून तें आर्थिक, शैक्षणिक, सांस्कृतिक, आणि आध्यात्मिकहि आहे आणि या सर्व बाबतींत ब्रिटिश राज्य शापरूपच ठरलें आहे असें त्या प्रतिज्ञेंत घोषित करण्यांत आलें. हिंदुस्थानाला ‘ मुकम्मिल आजादी ’ मिळवून देण्याचा संकल्प हा आपल्या राष्ट्राचा अत्यंत महत्त्वाचा दस्तअैवज आहे. दरवर्षी २६ जानेवारी दिवशीं राष्ट्रांतील आपण आबालवृद्ध स्त्रीपुरुष ठिकठिकाणीं जमून त्या संकल्पाची पुनरुक्ति करीत असतों, आणि त्या संकल्पाप्रमाणें अजूनहि आपल्याला पूर्ण स्वातंत्र्य नाहीं याचा विचार हृदयांत बाळगून प्रयत्नांची मात्रा वाढविण्याचा निश्चय करतों

महात्मा गांधी, जवाहरलाल नेहरू, मौ. आझाद यांसारख्या राष्ट्रपुरुषांनीं केलेली ही प्राणवान् प्रतिज्ञा प्रत्येक घरापर्यंत आणि झोपडीपर्यंत पसरल्यास त्यांत कांहीं नवल नाहीं.

कलकत्त्याच्या कॉंग्रेसमध्यें राष्ट्रपितामह दादाभाअी नवरोजींनीं राष्ट्राचा सर्व द्वेष अेकवटून अुद्गार काढले कीं ब्रिटिश सत्तेविरुद्ध बंड करावें अशी अिच्छा होते. लो. टिळक म्हणाले, कीं स्वराज्याचे हक्क मला देणारे हे लोक कोण? स्वराज्य माझा जन्मसिद्ध हक्कच आहे आणि मी तो घेणारच. याच संकल्पाची पूर्णता आपल्या स्वातंत्र्याच्या प्रतिज्ञेमध्यें आहे. या संकल्पाच्या द्वारां राष्ट्रीय हृदय बोलत असतें. अितिहास तिचा प्रतिध्वनि अुमटवीत असतो. स्वातंत्र्याची प्रतिज्ञा करून राष्ट्रानें कायाकल्प केला आणि त्यामुळें त्याच्या अंगप्रत्यंगामध्यें नवीन जोम आला.

आज स्वातंत्र्याचा अुपभोग घेणारे आपले वंशज एक पवित्र स्मृति म्हणून स्वातंत्र्याचा प्रतिज्ञेचा कितीतरी वर्षें पाठ करीत राहातील. फक्त तशा पाठांत आतां अिंग्रजाविषयींचा रोष अुरणार नाहीं.

ता. २५ २-४७

# स्वातंत्र्यदिन

## २६ जानेवारी

या दिवशीं तिरंगी झेंड्याचें वंदन आणि स्वातंत्र्याच्या प्रतिज्ञेचा पुनरुच्चार हाच मुख्य कार्यक्रम असतो. याखेरीज अितर कार्यक्रम व्यक्तींनीं किंवा स्थानिक संस्थांनी ठरवावयाचा नसून आपली राष्ट्रीय सभाच दरवर्षी ठरवीत असते. आपल्या विधायक कार्यक्रमाचा पुनरुच्चार त्या दिवशीं करून पुढल्या वर्षांसाठींचा कार्यक्रमहि आंखणें हें या दिवसाचें काम आहे.

---

# गोखल्यांना श्रद्धांजलि * 

(फेब्रुवारी १)

आजचा दिवस हा श्राद्धाचा आहे. श्राद्ध म्हणजे श्रद्धेच्या योगानें भूतकाळाला जिवंत ठेवण्याचा अेक अद्भुत अुपाय. गोखले हा लोक सोडून गेले त्याला आज सात वर्षें झालीं आहेत, तरी अजून आपण त्यांच्याकडून प्रेरणा घेतों, स्फूर्ति घेतों, अखंडसेवेची दीक्षा घेतों, आणि अशा रीतीनें त्याना आपण आपल्यामध्यें जिवंत ठेवतों. १९१५ च्या फेब्रुवारीच्या १९ तारखेपर्यंत ते स्वतःच्या चैतन्यानें जगत होते, आज ते तुमच्या आमच्या चैतन्यानें जगूं शकतात. आपल्यांत जेवढें चैतन्य असेल तेवढेच ते जगतील. गोखल्यांच्या जीवनानें आपल्यांत जें जीवन ओतलें तें जर आपल्यांत जिवंत राहील तर गोखले हे अजूनहि जगतील तें जीवन आपल्यांत वाढेल तर गोखले चढतील. आणि जेव्हां तें जीवन आपल्यामधून निःशेष होअून जाअील तेव्हांच गोखले मरतील. आज आपण येथें जमून गोखल्यांचें श्राद्ध करीत आहोंत. त्यांच्या द्वारां आपण म्हणत आहोंत कीं भारतसेवक गोखले चिरंजीव होवोत !

कोणत्याहि माणसाचें जीवन पहा, त्यांत फेरफार होत जातातच. जीवन म्हणजे परिवर्तन. जीवन म्हणजेच प्रगति. प्रतिवर्षी, प्रतिदिवशीं आणि प्रतिक्षणीं मनुष्याचा अनुभव वाढत जात असतो, मनुष्याची दृष्टि विशाल होत जाते आणि मनुष्याचें जीवन विकसत जातें. विद्यार्थी गोखल्यांच्यापेक्षां अध्यापक गोखले वाढले, अर्थशास्त्रज्ञ गोखल्यांपेक्षां नामदार गोखले श्रेष्ठ ठरले, नामदार गोखल्यांहून राष्ट्रनायक गोखले श्रेष्ठ झाले. अशा रीतीनें गोखल्यांची श्रेष्ठता दिवसेंदिवस वाढतच गेली आहे. सामान्य लोक समजतात कीं मरणापर्यंतच मनुष्य वाढतो, पण हें चूक आहे. जिवंत गोखल्यांच्यापेक्षां राष्ट्राच्या हृदयांत वसणारे आजचे गोखले अनेक पटींनी श्रेष्ठ आहेत. जिवंत गोखले निजत होते, काम करून थकत होते, कंटाळत होते, वेळीं रागवतहि होते, पण आजचे गोखले–हृदयस्थ गोखले आदर्श आहेत.

---

* १९२२ च्या गोखलेपुण्यतिथीच्या निमित्तानें मुंबअी भगिनीसमाजापुढें अर्पिलेली श्रद्धांजलि.

१४...

आजचीं त्यांचीं देशसेवा अमर्याद आणि अखंड आहे आणि दिवसेदिवस ती चढत जाओील व विशुद्ध होत जाओील.

ही शक्ति कोणाची आहे ? ही शक्ति श्राद्धाची आहे. श्राद्ध म्हणजे स्मृति नव्हे, श्राद्ध म्हणजे अितिहासाचें अध्ययन नव्हे, श्राद्ध ही अमृतसंजीवनी आहे. स्मृति दुःखरूप असते आणि दुःखाप्रमाणेंच ती अल्पजीवी असते. दुःखाला जसा अंत असतो तशी स्मृतीसुद्धां पुसून जाते. दुःख जसें आपल्याला दुर्बळ करतें तशी स्मृतीहि आपल्याला करुणार्द्र करून सोडतें. अितिहासाचीहि हीच स्थिति आहे. अितिहास चालत नाहीं, वाढत नाहीं. अितिहासाची स्थिरता मारक असते अितिहासांत जीवन असत नाहीं. अितिहास हा पुतळा आहे, तो फोटो आहे. नअू वर्षांची बालिका जेव्हां प्रसन्नतापूर्वक हंसते तेव्हां त्या हास्यांत किती अपूर्व चैतन्य, माधुर्य आणि पावित्र्य असतें बरें ! पण त्याच हास्याचा फोटो काढा किंवा त्याची मूर्ति बनवा आणि पहा. त्याची स्थिरताच सर्व कांहीं मारून टाकते. अितिहासाचेंहि असेंच आहे. अितिहास हा सत्याचें वर्णन स्थिर करूं पहातो आणि त्यांतच तो असत्यरूप बनतो. अितिहास हें सत्याचें प्रेत आहे. अितिहास हा व्यक्तीचें आणि राष्ट्राचें स्वरूप स्थिर करून अेकप्रकारें त्याला निर्जीव करून टाकतो.

श्राद्ध याहून वेगळें आहे. श्राद्ध मृत व्यक्तीला अमर करतें. रामायण महाभारत हे कांहीं अितिहास नाहींत, ते श्राद्ध स्वरूप आहेत. त्यामुळेंच हे राष्ट्रीय ग्रंथ युगानुयुगें राष्ट्रांत चैतन्य ओतीत आले आहेत. अितिहासांत ही शक्ति नाहीं. आपण वार्षिक श्राद्धाच्याद्वारां पूज्य व्यक्तीला दिवसेदिवस अधिकाधिक राष्ट्रीय बनवीत असतो. सन १८६६ पासून १९१५ पर्यंत जिवंत गोखले कसे होते याचें यथार्थ चित्र अितिहास खुशाल काढून ठेवो, आपल्याला त्याची पर्वा नाहीं. जे गोखले आज आपल्या हृदयांत आहेत त्यांचेंच आपण दर्शन घेअूं, त्यांचेंच स्मरण करूं, त्यांच्याचकडून देशसेवेची दीक्षा घेअूं. त्यावेळचे गोखले आपल्याला सांगत कीं जास्त पैसे द्यावे लागले तरी स्वदेशी कपडाच वापरा. तेच गोखले आज हृदयांत प्रवेश करून आपल्याला सांगत आहेत कीं पैशाचा विचारच करूं नका, खादीच वापरा. हृदयस्थ गोखले सांगतात कीं मी अर्थशास्त्राचा अध्यापक होतो, पण आज मी तुम्हांला सांगतो कीं धर्मशास्त्रापुढें अर्थशास्त्र शून्य आहे. जे धर्मशास्त्राच्या आधीन रहातें तेंच खरें अर्थशास्त्र. खादी वापरणाऱ्या हिंदुस्थानाचें कधींहि आर्थिक अकल्याण होणार नाहीं; कारण खादींत धर्म आहे.

सरयू नदीच्या कांठीं राहाणाऱ्या रामानें काय केलें, त्याचें जीवन कसें होतें हें आपल्याला समजण्याला मार्ग नाहीं. आपल्याला त्याची गरजहि नाहीं. पण वाल्मीकीच्या प्रतिभास्रोतांत जन्माला आलेल्या आणि आर्यावर्ताच्या हृदयावर राज्य करणाऱ्या राजा रामचंद्रालाच आपण ओळखूं अिच्छितों; कारण अैतिहासिक रामापेक्षां वाल्मीकीच्या राष्ट्रीय रामानेंच भारतवर्षाचें जास्त कल्याण केलें आहे. शकुंतलेचें भावगम्य चित्र रेखाटत असतांना विरही दुष्यंताच्या मनांत शकुंतलेचें ध्यान जसजसें वाढत जाअी तसतसा तो 'यद्यत्साधु न चित्रे स्यात्क्रियते तत्तदन्यथा' असें म्हणून त्यांत फेरफार करीतच जात होता आणि तरी तें जसें शकुंतलेचेंच चित्र राही, त्याचप्रमाणें आपण राष्ट्रीय पुरुषांच्या श्राद्धांत करीत असतों--त्यांची राष्ट्रीय आवृत्ति काढीत असतों.

असें करण्यांत जितका लाभ आहे तितकी जोखीम हि आहे. पवित्र पुरुषाची स्मृति हा अेक वारसा आहे. त्यांत आपण भर टाकूं शकतों तसा तो बिघडवूंहि शकतो. बहुमोल वारशाबरोबर मोठी जबाबदारीहि आपणांवर येअून पडते आणि या जबाबदारीची जाणीवच आपल्याला प्रेरक आणि तारक झाली पाहिजे.

आजच्या श्राद्धाच्या दिवशीं गोखल्यांच्याविषयीं वास्तविक मी कांहीं सांगितलें पाहिजे, पण खरें म्हटलें तर मी अैतिहासिकदृष्ट्या किंवा अभ्यासाच्या दृष्टीनें गोखल्यांचें चरित्र पाहिलें नाहीं कीं वाचलेंहि नाहीं. गोखल्यांना मी फारसें पाहिलेंहि नाहीं, अेखाद्या फिरस्त्याचें दर्शन व्हावें तसें त्यांना दोनचार वेळांच मला पहायला मिळालें आहे. त्यावेळची स्मृति श्रद्धेच्या भूमींत मी सांठवून ठेवली आहे—छेः छेः सांठवून ठेवलेली नाहीं, पेरून टाकली आहे. या बीजाला वरचेवर सिंचन मिळालें असल्यामुळें हें बीज अंकुरित होअून अनेकप्रकारें फुललें—पसरलें आहे.

गोखल्यांचें प्रथमदर्शन—अव्यक्तदर्शन—मला फर्ग्युसन कॉलेजच्या द्वारां झालें. जेव्हां मी त्या कॉलेजांत गेलों तेव्हां गोखले तेथें नव्हते, पण तेथील वातावरण गोखलेमय होतें. सर्वत्र गोखल्यांची छाप दिसत होती.

फर्ग्युसन कॉलेज म्हणजे वादविवादाचें कुरुक्षेत्र. खुद्द पुण्यांत जितके पक्ष आहेत तितकेच किंवा त्याहूनहि अधिक पक्ष फर्ग्युसन कॉलेजच्या विद्यार्थी-वसती-

गृहांत दिसून येतात. मी पहिल्याप्रथम जेव्हां फर्ग्युसन कॉलेजांत गेलों तेव्हां माझी दशा पहिल्याच खेपेला शहरांत येणाऱ्या गांवठी विद्यार्थ्यासारखी होती. छात्रालयांत प्रत्येक पक्षाचे अनुयायी माझ्याकडे येत आणि मला माझीं मतें निश्चित करण्यांत 'मदत' करीत. पुण्यांत कोणीहि मनुष्य पक्षरहित राहूं शकणार नाहीं. तेथील वातावरण अशा मनुष्याला सहनच करूं शकणार नाहीं. फर्ग्युसन कॉलेजच्या छात्रालयांत मी गोखल्यांची निंदा आणि स्तुति दोन्ही अितकी कांहीं अैकली कीं कसल्याहि निर्णयावर येणें मला अशक्य होतें. माझ्या मनांत अितकें मात्र निश्चित झालें कीं गोखले हे कसेहि असोत, पण ओळख करून घेण्याजोगी व्यक्ति मात्र आहेत. खास निंदा आणि स्तुति यांनीं परस्पर-छेदाचें काम केलें त्यामुळें मी मोकळा राहिलों. मनांत मात्र अेवढा भाव राहिला होता कीं गोखले हे मोठे देशसेवक खरे तरी त्यांनी गोऱ्या शिपायांची जी माफी मागितली तो त्यांना कलंकच आहे. पुरावा मिळाला नाहीं म्हणून काय झालें? जोवर आपल्या मनाची खात्री आहे तोंवर आपण माफी काय म्हणून मागावी? माझें हें मत पुष्कळ वर्षें राहिलें. आज तें तसें नाहीं. सार्वजनिक जीवनाचें स्मृतिशास्त्र आतां मला अधिक समजूं लागलें आहे.

कॉंग्रेसतर्फे विलायतेंत प्रसिद्ध होणारें 'अिंडिया' पत्र मी कॉलेजांत लक्षपूर्वक वाचीत असे; त्यामुळें गोखले विलायतेंत भाषणें देत, मद्यपाननिषेधाची योजना तयार करीत, आपल्या देशाला कॅनडासारखें सेल्फ-गवर्नमेंट मागत या सर्व गोष्टींशीं मी परिचित राहात असे, आणि त्यामुळें गोखल्यांच्याविषयीं मनांत हळूं हळूं श्रद्धा अुत्पन्न होत गेली. शेवटीं अेक दिवस अुगवला आणि मी अैकलें कीं आज गोखले कॉलेजमध्यें येणार आहेत. प्रसंग काय होता हें मी आतां विसरून गेलों आहे. गोखल्यांची प्रसन्नगंभीर मूर्ति व्यासपीठावर अुभी राहिली. त्यांच्या भाषेंत किंवा त्यांच्या आवाजांत शास्त्रोक्त वक्त्याचा चमत्कार किंवा चमक नव्हती, पण त्यांच्या भाषेंत संस्कारिता, देशकल्याणाची आणि देशसेवेची तळमळ ही ओतप्रोत होती; त्यांच्या आवाजांत अंतःकरणाच्या अुत्कटतेचें गुंजन होतें. अुदात्त वातावरणांत सदोदित विहरत असणारी ही विभूति आहे असें स्पष्ट दिसत होतें. आणि पुनः फर्ग्युसन कॉलेज म्हणजे त्यांच्याच हातांनीं वाढविलेलें गोकुळ; तेव्हां त्यांच्या अुपदेशांत अधिकार आणि वात्सल्य सारखेंच भरलेलें होतें. त्या

दिवसाचें व्याख्यान मी आतां विसरून गेलों आहें, पण व्याख्यानाची छाप मात्र कायम आहे. अेकच गोष्ट अजून स्पष्ट आठवते. त्यांनी सांगितलें होते: " तुम्हांला माहीत आहे कीं दरवर्षी प्राप्तीवरील कर घेणारे अंमलदार तुमच्या दाराशीं येतात आणि सरकारचा कर तुमच्याकडून वसूल करून घेअून जातात. आज देशाच्या नांवानें असाच अेक टॅक्सगॅधरर–कर वसूल करणारा मी तुमच्या दाराशीं येअून अुभा राहिलों आहे. मला शेंकडा पांच टक्क्याचा कर पाहिजे आहे. पण तो पैशाचा कर नको, युवकांच्या श्रद्धावान जीवनाचा पाहिजे. या महाविद्यालयांत शिकणाऱ्या तरुण विद्यार्थ्यांपैकीं पांच टक्के विद्यार्थ्यांनीं देशसेवेप्रीत्यर्थ आपलें आयुष्य अर्पण करावें अशी माझी अिच्छा आहे. असें झालें तरच मला समाधान होअील. " किती महत्त्वाची मागणी, तरी किती थोडी ! त्या दिवशीं माझ्या हृदयांत नवा प्रकाश पडला, विचारांना अेक नवी दिशा मिळाली आणि थोड्या अंशांनी मी द्विज बनलों.

याच सुमारास गोखले बनारस येथें राष्ट्रीय महासभेचे अध्यक्ष झाले. बनारसच्या भाविक लोकांनी ' पूने का राजा ' म्हणून त्यांचें स्वागत केलें. त्यावेळचे भाषण अितकें कांहीं संपूर्ण होतें कीं पुष्कळ वेळां मी तें वाचलें तरी मला संतोष वाटेना. त्यानंतर वंगभंगाविरुद्ध चळवळ वाढली. स्वदेशी, बहिष्कार, राष्ट्रीय शिक्षण आणि स्वराज्य यांची चतुर्विध चळवळ जोरानें सुरू झाली. त्या चळवळींत मी वाहून गेलों. बिपिनचंद्र पाल आणि अरविंद घोष यांनी हृदयांत स्थान मिळविलें आणि गोखल्यांची छाप पुसून गेली. गोखल्यांनीच माझ्यामध्यें देशसेवेची ज्योत पेटविली होती हेंहि मी विसरून गेलों. त्यानंतर सुरतेंत यादवी झाली. त्यावेळचीं दोन्ही पक्षांचीं वर्तमानपत्रें वाचून निराश झालों. दोन्ही पक्षांच्या वर्तमानपत्रांत अितकी कांहीं क्षुद्रता आढळून येअी कीं तिला दुर्गंधाचीच अुपमा देतां येअील. त्यानंतर राजकारण विचित्र रीतीनें वाहूं लागलें. सरकार वेडें झालें आणि देशांतील दोन्ही पक्ष अीर्षा, असूया आणि हिंसा यांनी भरून गेले. त्याचाहि माझ्यावर पुष्कळ परिणाम झाला. राष्ट्रीय पक्षाचीं तत्त्वें मला पसंत होतीं, अराजक लोकांचा युक्तिवाद मला यथार्थ वाटत असे, तरी नेमस्त पक्षाच्या पुढाऱ्यांविषयीं जे निंदाप्रचुर बीभत्स लेख आणि चित्रें येत त्यांची मात्र मला शिसारी येअी. असूयावृत्ति समाजांत अितकी कांहीं वाढली कीं गोखल्यांना ' हिंदु पंच ' पत्रावर

अब्रूनुकसानीची फिर्याद लावावी लागली. महान गोखल्यांनी ' हिंदु पंचा ' सारख्या क्षुद्र पत्रावर अब्रूनुकसानीची फिर्याद करून माफी मागायला लावावी हें तर मला बिलकुल आवडलें नाहीं. ब्रिटिश सोल्जरांची गोखल्यांनी माफी मागितली यांत त्यांची महत्ता वाढली हें आज मला समजतें आहे. पण ' हिंदु पंचा ' ला माफी मागायला लावण्यांत गोखल्यांच्या पेक्षां माझ्यासारख्यांचाच दोष मला अधिक दिसतो. गोखल्यांची अभद्र निंदा अैकून संतप्त होणारे पुष्कळ असतील. पण आम्ही मूग गिळून बसलों. आम्ही जर त्यावेळीं जाहीर रीतीनें अशा निंदेचा निषेध केला असता तर गोखल्यांना आपल्या समाजाविषयीं अितकें निराश व्हावें लागलें नसतें.

याच सुमारास मुंबअींत प्रभुज्ञातीच्या स्त्रियांनी अेक कलाप्रदर्शन भरविलें होतें आणि गोखल्यांच्या हस्तें तें अुघडायचें होतें. कलेविषयींहि त्यांनी विचार करून ठेवला होता. त्यांचें तें भाषण अैकण्यासाठीं मी गेलों आणि गोखल्यांना अगदीं पहिल्याप्रथम मराठीं बोलतांना मी अैकलें. त्याचवेळीं मनांत विचार आला कीं हा राष्ट्रपुरुष लेजिस्लेटिव कैन्सिलपेक्षां समाजात आणि अिंग्रजीपेक्षा मराठींत काम करील तर याची देशसेवा खचित वाढेल आणि कीर्तीहि वाढेल. पण लेजिस्लेटिव कौन्सिलांत भरीव काम करणारे लोक कमी होते म्हणूनच मला वाटतें कीं गोखल्यांना कौन्सिलांत आपला वेळ जास्त द्यावा लागला असेल.

अंत्यजोद्धाराविषयींचें त्यांचें अेक भाषण याच सुमारास मी मुंबअींच्या टाअुन हॉलमध्यें अैकलें होतें त्यानंतर देशांत क्रांतिकारक प्रवृत्ति वाढली. लोकमान्य हे मंडालेच्या तुरुंगांत ' गीतारहस्य ' लिहीत होते आणि देशांत ग्लानि पसरली होती. मी गुजरातमध्यें गेलों आणि थोडे दिवस अध्यापनाच्या कामांत गुंग झालों. गोखले कोठे आहेत, काय करतात हें मला माहीतहि नव्हतें. रामकृष्ण परमहंस, स्वामी विवकानंद, भगिनी निवेदिता वगैरेंच्या ग्रंथांतच मला विशेष गोडी वाटत असे. १९११ कीं १२ मध्यें भगिनी निवेदिता विदेह झाल्या त्यावेळीं गोखल्यांची त्यांच्याविषयीं श्रद्धांजलि प्रगट झाली होती. ती लहान असूनसुद्धां अितकी सुंदर होती कीं माझी श्रद्धां फिरून जागृत झाली. न्यायमूर्ति रानडेविषयींचीं त्यांचीं भाषणें आणि लेख यांचें मला स्मरण झालें आणि गोखल्यांच्याविषयींचा आदर

माझ्या अंतःकरणांत फिरून जागृत झाला. गोखल्यांचा मी अधिक अभ्यास करूं लागलों. विद्यार्थी आणि राजकारण, हिंदुमुस्लीम ऐक्याचा प्रश्न, जगांतील समस्त लोकांच्या काँग्रेसपुढें झालेलें त्यांचें भाषण वगैरे वाचून माझी खात्री झाली कीं गोखले हे दहापांच वर्षांचा विचार करणारे 'पॉलिटिशियन्' नाहींत, तर राष्ट्रहिताचा दीर्घदृष्ट्या विचार करणारे अेक राष्ट्रोद्धारक आहेत. विशेषतः हिंदूमुसलमानांच्या अैक्याविषयीं जें धोरण त्यांनी स्वीकारलें होतें तें पाहून तर त्यांच्या ध्येयाची आणि त्यांच्या दीर्घदृष्टीची मला खात्री झाली. हिंदूमुसलमानांचें अैक्य हाच हिंदी राजकारणाचा पाया आहे हें त्यांना दिसलें होतें. या अेकाच कामासाठींसुद्धां हिंदुस्थानानें गोखल्यांविषयीं कृतज्ञ राहाणें वाजवी आहे.

देशाचें राजकारण पायाशुद्ध आणि आध्यात्मिक करण्याचा त्यांचा आग्रह होता. देशाची स्थिति पहातां गोखल्यांना असें वाटलें कीं जोंपर्यंत देशसेवेचा अहर्निश विचार करणाऱ्या आणि आपलें सारें आयुष्य देशसेवेलाच अर्पण करणाऱ्या लोकांचा वर्ग देशांत निर्माण होत नाहीं तोंपर्यंत देशाचें राजकारण असेंच रखडायचें. व्यवहारांतहि मिसळूं आणि फावल्या वेळांत देशसेवाहि करूं या वृत्तीनें देशसेवा व्हायची नाहीं, ही गोष्ट अनुभवानें त्यांना बरोबर कळली होती. दुसरी अेक गोष्ट जी हिंदी स्वभावांत–हिंदी संस्कृतींत अनादिकाळापासून आहे ती त्यांनीं विशेष आग्रहपूर्वक देशसेवेंत दाखल केली आणि देशापुढें विशेष रूपानें मांडली. ती गोष्ट म्हणजे गरीबीचें महत्त्व. देशसेवेंत पैशाची जरूर आहे, पैशाशिवाय केलेलें काम थांबून राहातें, सदुपयोग केला तर अमुक अंशांनीं संपत्ति ही आशीर्वादरूप होअूं शकते हें सर्व खरें आहे. तरी देशसेवक स्वतः जितक्या अंशांनीं निर्धन राहील तितक्या अंशांनीं त्याची देशसेवा अधिक ठोस होण्याचा संभव असतो ही गोष्ट गोखले पुरतेपणीं जाणत होते. बुवा वैरागी होअून यात्रा करीत फिरणें हें अेकपरी सोपें आहे, पण समाजांत मिसळणें, समाजाला बरोबर घेअून देशोन्नतीचीं कार्यें करणें, देशाचें पुढारीपण करणें आणि त्याचबरोबर दारिद्र्याचें व्रत घेअून थोड्यांत निर्वाह चालवून द्रव्यलोभ अेका बाजूला सारून निःस्पृहता अंगीं बाणून घेणें ही गोष्ट कठीण आहे. विद्वान असूनहि नम्र, गरीब असूनहि तेजस्वी आणि तपस्वी असूनहि दयाळु असे लोकच समाजावर आणि

विशेषतः हिंदी समाजावर प्रभुत्व मिळवूं शकतात. धन मिळविण्याची शक्ति असूनहि जो मनुष्य गरीबी पत्करतो, लाखो रुपये हातांत असूनहि जो मनुष्य पैशानं मिळणारीं सुखें भोगण्याच्या लोभांत सांपडत नाहीं त्याच मनुष्याला समाजाची खरी सेवा करतां येते आणि त्याला स्वतःला स्वतंत्र राहातां येतें. गरीबीचा आदर्श नसेल तर देशसेवक हा पहातां पहातां द्रव्यसेवक, धनवंताचा आश्रित आणि देशहिताचा द्रोही होण्याची सदोदित भीति असते.

गरीबीच्या आदर्शाबरोबरच अखंड अुद्योगाचें व्रत जर नसेल तर गरीबी ही जडतेचें रूप घेते. तमोगुणी गरीबी कसल्याहि कामाची नाहीं. मनुष्यानें समाधान ठेवून स्वार्थासाठीं किंवा अैषआरामासाठीं वाटलें तर मेहनत न करावी, पण त्यानें मेहनत ही केलीच पाहिजे. सकाम असो किंवा निष्काम असो कर्म हें केलेंच पाहिजे. कर्म नाहीं तर आपल्याला जगण्याचा हक्कच राहाणार नाहीं. श्रम करण्याची संधि न मिळणें हा ओश्वराचा मोठ्यांत मोठा शाप म्हटला पाहिजे. अुद्योग हा अुदर-निर्वाहाकरितांच आहे असें नाहीं. अुद्योग हा जीवनाचा आनंद आहे, कायिक, वाचिक आणि मानसिक शक्ति वाढविण्याचें तें साधन आहे आणि पवित्रतेची तशीच मोक्षाची ती साधना आहे असें मी मानतों. देशसेवा म्हणजे रिकामटेकडा वेळ घालविण्याचा अेक अुपाय किंवा नांव मिळविण्याचा अेक प्रकार असें समजून कोणाहि व्यक्तीला वा संस्थेला अखंड देशसेवा करतांच येणार नाहीं. देखाव्याकरितां केलेलें काम भडक असेल कदाचित् पण तें फार वेळ टिकूं शकत नाहीं.

देशसेवा करण्याचा मुख्य अुपाय अेकच आहे, तो हा कीं आपण आपलें जीवन निष्पाप करावें. समाजांत जीं दुःखें आपण पाहातों त्यांपैकीं अर्धीं दुःखें आपण स्वतःच अुत्पन्न केलेलीं असतात. प्रत्येकानें जर स्वतःचें जीवन सुधारण्याचा प्रयत्न केला तर समाजसेवकाचें काम पुष्कळ कमी होअील, आणि दुसऱ्या दृष्टीनें पाहिलें तर आपण स्वतः जोंपर्यंत निष्पाप बनलों नाहीं तोंपर्यंत आपल्याला समाज-सेवकाचा अधिकार अथवा सामर्थ्य प्राप्त होअूंच शकणार नाहीं. हें पाहूनच गोखल्यांनी भारतसेवकसमाजाच्या योजनेंत आणि कार्यपद्धतींत साधेपणा, गरीबी, आज्ञाधारकपणा वगैरे व्रतें मुद्दाम ठेवलीं आहेत.

गोखले दक्षिण आफ्रिकेला गेले होते त्याची हकिकत तर सर्वांनाच माहीत आहे. त्यावेळीं जनरल स्मट्स् आणि गोखले यांच्यामध्यें ज्या गोष्टी झाल्या त्याविषयीं जेव्हां गैरसमज अुत्पन्न झाला तेव्हां विलायतेंतील पत्रांनासुद्धां आपले गोखलेच अधिक विश्वासपात्र आप्त वाटले हें पाहून माझें हृदय अभिमानानें फुललें आणि गोखल्यांच्या निर्मळ चारित्र्याचाच हा परिणाम आहे अशी माझी खात्री झाली. दक्षिण आफ्रिकेंतील काम वाढलें. महात्माजींनी तेथें युद्ध पुकारलें आणि हिंदुस्थानांत देशभक्त गोखले यांनी या यज्ञासाठीं ब्राह्मणोचित भिक्षा मागणें सुरू केलें हा अपूर्व प्रसंग आठवणींत अजून ताजाच आहे.

हा यज्ञ पूर्ण झाला. गांधीजी हिंदुस्थानांत परत आले आणि कवींद्रांना भेटण्याकरितां शांतिनिकेतनाला आले. गांधीजींचें स्वागत चाललें होतें अेवढ्यांत तार आली कीं गोखले मृत्युलोक सोडून गेले. शांतिनिकेतनांतील अेका आंब्याच्या झाडाखालीं आम्ही कित्येकजण गांधीजींच्या आसपास बसलों होतों. गांधीजींच्या डोळ्यांत अश्रू नव्हते पण अश्रूंहूनहि मृदु आणि गंभीर असा श्रद्धेचा सागर त्यांच्या डोळ्यांत अुसळत होता. गोखल्यांच्या जीवनांतील धार्मिकता त्यांनी आम्हांला समजावून दिली. राजकारणासाठींसुद्धां खानदानी आपण सोडूं नये हा गोखल्यांचा आग्रह त्यांनीं आम्हांला समजावून दिला. आणि त्याच क्षणीं गोखल्यांची श्रद्धानिर्मित मूर्ति माझ्या हृदयांत सुप्रतिष्ठित झाली. मी गोखल्यांचा अनुयायी नाहीं, त्यांचा शिष्य नाहीं, पण त्यांच्या शिष्याचा शिष्य आहे, गोखल्यांचा मी पूजक आहे आणि गोखल्यांना समजून घेण्याचा माझा प्रयत्न आहे. गोखल्यांच्या खऱ्या अनुयायांचीं देशसेवा, धर्मनिष्ठा आणि निर्भयपणा पाहून मनांत गोखल्यांची मूर्ति अधिकाधिक स्पष्ट आणि रूढ होत चालली आहे. त्या मूर्तीचेंच आज मी श्राद्ध करतों आणि त्या मूर्तीपाशीं आशीर्वाद मागतों.

भगिनीसमाज हा या मूर्तीचें अेक मंदिर आहे हें जाणून मी येथें श्रद्धांजलि घेअून आलों आहे. गोखल्यांची देशभक्ति त्यांच्या देशसेवेपेक्षां मोठी होती. पन्नास वर्षांहूनहि कमी अशा आयुष्यांत त्यांच्या देशभक्तीला संपूर्ण अवकाश कोठून मिळणार! शिक्षण आणि राजकारण या दोनच दिशांनी त्यांनी कांहींशी देशसेवा

केली. जी कांहीं सेवा केली ती अपूर्व आणि अुज्ज्वल रीतीनें केली. पण तेवढ्यांतच त्यांना संतोष नव्हता. ते नेहमीं म्हणत कीं कामाचे डोंगर पडले आहेत, अुचलण्याला हजारो देशसेवकांची जरूर आहे. स्त्रीशिक्षण या महत्त्वाच्या विभागाची गोखल्यांची देशभक्ति भगिनीसमाजाच्या द्वारां कार्यांत परिणत होत आहे; म्हणूनच मी या मंदिरांत श्राद्ध करण्यासाठीं आलों आहे. ही संधि मला दिली हा आपणां सर्वांचा प्रसाद मी मानतों.

१९–२–२२

---

# गोपाळ कृष्ण गोखले

## फेब्रु. १९

देशसेवक, अध्यापक, अर्थशास्त्री आणि लोकांचे राजदरबारांतील प्रतिनिधि या नात्यानें झालेली गोखल्यांची सेवा विसरण्याजोगी नाहीं. हिंदुस्थानाच्या आर्थिक स्थितीविषयींची त्यांची मीमांसा अजूनहि ताजी आहे. सक्तीचें आणि मोफत प्राथमिक शिक्षण देशांत सुरू करण्याच्या आणि मिठावरील कर कमी करविण्याच्या त्यांच्या प्रयत्नांमुळें गरीबांशीं असलेलें त्यांचें अनुसंधान स्पष्ट होतें. भारतसेवकसमाज स्थापन करून राजकीय चळवळीला त्यांनी दीक्षेचें स्वरूप दिलें. गरीबींत वाढलेलें असूनसुद्धां देशासाठीं ते प्रसन्नतापूर्वक गरिबीलाच चिकटून राहिले. या सर्व गोष्टी आजहि विद्यार्थ्यांच्या मनावर ठसविण्यासारख्या आहेत. गांधीजींशीं त्यांचा असलेला संबंधहि विद्यार्थ्यांना समजणें आवश्यक आहे. न्यायमूर्ति रानडे यांची गोखल्यांच्यावर पुष्कळ छाप होती. म्हणून रानडे यांचें चरित्रसुद्धां या दिवशीं सांगावें.

दांडीकूचचा मिठाच्या करावर काय परिणाम झाला त्याविषयींहि सांगतां येअील.

---

# स्वराज्यमहाव्रत. : : ५२

( ओप्रिल ६ ते १३ )

व्रत असो कीं सण असो त्याच्यामागें कांहीं ना कांहीं महान सामाजिक अथवा आध्यात्मिक तत्त्व असतें. चैत्री पाडव्यादिवशीं दक्षिण हिंदुस्थानांत मोठा अुत्सव केला जातो, कारण त्यादिवशीं श्रीरामचंद्रांनी वालीचा पराभव करून दक्षिण हिंदुस्थानाला स्वतंत्रता आणि निर्भयता मिळवून दिली. त्याच दिवशीं प्रजाअुद्धारक शालिवाहनानें विदेशी हूण आणि शक लोकांच्या तापांतून प्रजेला मुक्त केलें. आणि तें तरी कसें ? मातीच्या बाहुल्यांत संजीवनी ओतून, त्यांना लढवैये बनवून ?

आजचा आपला स्वराज्यसप्ताह हा असाच अेक महाव्रताचा दिवस आहे. स्वराज्यस्थापना झाल्यानंतर तो अुत्सवाचा दिवस होअील. त्याच्यामागें अनेक तारक तत्त्वें आहेत. या सप्ताहांत मातीच्या बाहुल्यासारख्या बनलेल्या लोकांत सत्याग्रह संजीवनी ओतली गेली, त्यामुळें पोटावर चालणारें राष्ट्र अुभें झालें. याच सप्ताहाच्या प्रेरणेच्या बळानें शतकानुशतकें परस्परांत लढून हाडवैरी बनणारे हिंदुमुसलमान अेक झाले आणि याच अैक्याच्या योगानें अितके दिवस अशक्य भासणारें स्वराज्य अेकदम प्रगट झाल्यासारखे दिसूं लागलें आहे. निराशेंतच वाढलेल्या अनेक जणांना तर असेंच वाटत राहिलें आहे कीं स्वराज्य अितक्या लवकर संभवित तरी कसें होअूं शकेल ? पण स्वराज्याचें आगमन अितकें कांहीं प्रत्यक्ष आहे कीं तें मानण्याची तयारी असो नसो, तें मानल्यावांचून गत्यंतरच राहिलेलें नाहीं.

जे अितके दिवस अशक्य अशक्य म्हणत होते ते आज हें सारें काय अिंद्रजाळ पसरलें आहे असें म्हणूं लागले आहेत. पण यांत अिंद्रजाळ कसलें आलें

आहे? ताशीं चाळीस मैलाच्या वेगानें जाणारी आगगाडी जर हवेच्या दाबानें अेकदम अुभी करतां येते तर असहकारानें अेका अुन्मत्त साम्राज्याला ठिकाणीं आणणें यांत अिंद्रजाळ तें काय?

आपल्या पायांनीं चालत येणाऱ्या या स्वराज्याचें आपण कशा प्रकारें स्वागत करावें? आपल्या हृदयमंदिरांत स्वराज्यदेवतेनें येअुन बसावें अितकें आपण शुद्ध आणि पवित्र आहों कीं नाहीं हें आपण तपासलें पाहिजे, म्हणून या आठवड्याला आपण 'आत्मशुद्धीचा सप्ताह' म्हणत असतों.

या सप्ताहांत आपण सर्व व्यसनांचा त्याग करण्याचा निश्चय करावा. स्वराज्याप्रीत्यर्थ यथाशक्ति द्रव्य द्यावें. हें कांहीं दान नव्हे. स्वराज्याचा हा अेक स्वेच्छेनें भरावयाचा कर समजला पाहिजे. स्वराज्य म्हणजे सक्तीचा अभाव. आणि म्हणून अशा स्थितींत प्रत्येकानें आपापल्या श्रद्धेप्रमाणें जास्तींत जास्त कर भरला पाहिजे. 'रामराज्य, रामराज्य' म्हणजे निराळें तें काय असणार? सत्तेचा अुपदेश न करतां राष्ट्रीय महासभा आज हिंदुस्थानावर राज्य करीत आहे. रामराज्यांत याहून निराळें तें काय असणार?

आज आपण हृदयस्थ परमात्म्याची प्रार्थना करावी कीं हे हृदयस्थ देवा! हे जनतारूपी जनार्दना! आम्हांला स्वराज्याचे खरे अुपासक बनीव. स्वराज्यावरील आमची श्रद्धा चळण्यापूर्वीच आमच्या शरीरांतून आमचे प्राण निघून जावोत! आम्हीं आजवर पुष्कळ दुःख भोगलें, म्हणून कोणालाहि दुःख देण्याची आम्हांला बुद्धि न होवो; अमर्याद साम्राज्यपदाला आम्ही बळी पडलों आहोंत, अैहिक साम्राज्य स्थापण्याची लालसा आमच्या हृदयांत कधींहि अुत्पन्न न होवो. साम्राज्य अेक तुझेंच व्हावें आणि अितक्या तपश्चर्येनें पुनीत झालेला हा राष्ट्रीय सप्ताह कधीं काळीं कलुषित न होवो. अनंत काळपर्यंत हा सप्ताह सत्य, अहिंसा आणि संयम यांच्या अुत्सवरूपानें जगतीतलावर शाश्वत राहो!

१२-४-२१

# राष्ट्रीय सप्ताह

**एप्रिल ६ ते १३ ८ दिवस**

या राष्ट्रीय ऐक्याच्या पर्वाच्या प्रसंगीं सुताच्या धाग्यानें सारीं हृदयें एकत्र बांधणें, हाच एकमेव कार्यक्रम होऊं शकेल. प्रत्येक भारतवासियाच्या माथ्यावर समान संकट लोंबतें आहे, ही गोष्ट विद्यार्थ्यांच्या मनावर ठसवावी; आणि सगळा सप्ताह शक्य तितका कांतण्यांत घालवावा.

अमृतसरपासून आजपर्यंतचा महासभेचा इतिहास आज वाचावा किंवा त्यावर विवेचन करावें.

---

## ( जून १६ )

' देवांना आपलें अमृत पाजून पाजून क्षीण झालेला कृष्णपक्षांतील चंद्रमा हा शुक्लपक्षांतील चंद्रापेक्षां अधिक सुंदर दिसतो ' असें कालिदासाचें वचन आहे. देशबंधु चित्तरंजन दास हे या सुंदरतेप्रत पोंचले होतें. विद्यार्थी–दशा संपवून ते जेव्हां धंद्यांत पडले तेव्हां त्यांच्या डोक्यावर वडिलांच्या वेळचें मोठें कर्ज होतें. अविश्रांत श्रम करून त्यांनी तें फेडलें. या कर्जापायीं त्यांना कष्ट सहन करावे लागले होते. सार्वजनिक कामांत ते भाग घेअूं शकत नव्हते. अृणमुक्त झाल्यानंतर शुक्लपक्षांतील चंद्राप्रमाणें त्यांची समृद्धि वाढली. सदोदित दान करीत असून-सुद्धां त्यांची प्राप्ति वाढतच गेली. ज्या दिवशीं त्यांनी आपलें भव्य घर पुरें केलें त्या दिवशीं त्यांना केवढा बरे आनंद झाला असेल?

पण देशबंधूंची देशभावना दानानेंच तृप्त होण्याजोगी नव्हती. त्यांना त्याग-धर्माचा रंग लागला. त्यांनी आपली वकिली सोडून दिली; स्वत: गरीब बनले, आणि गरीबांची सेवा करण्याची त्यांनी दीक्षा घेतली. त्यांचें तें घर कोर्टानें लिलावांत काढलें. देशबंधूंनी कमाअी करण्याचा विचार ठेवला असता तर अेका क्षणांत आपली मिळकत त्यांना वांचवितां आली असती. पण त्यांना त्यागधर्माची लज्जत लागली होती. घर बांधतांना त्यांनी जो आनंद अनुभवला होता त्याहून जास्त आनंद घर हातांतून जाअूं देतांना त्यांना झाला असेल.

अशा पुण्यपुरुषांच्या त्यागानें जर हिंदसमाजाची आत्मशुद्धि झाली नाहीं तर अशा समाजाविषयीं काय आशा बाळगतां येणार? प्राचीन काळापासून शिबि आणि हरिश्चंद्र यांसारख्या त्यागवीरांनी चालविलेली परंपरा हिंदुस्थानांत अजून कायम आहे; पण त्याचबरोबर दानावर परिपुष्ट होण्याची आणि शुद्ध स्वार्थी मनुष्याला किंवा पामराला साजेल अशा मोहासाठीं मलिन जीवन घालविण्याची परंपराहि जर आपण चालूं ठेवूं तर अीश्वराची दयाहि संपून जाअील आणि त्याचा महान् कोप मात्र आपण जागृत करूं.

देशबंधूंनीं देह सोडल्याबरोबर महात्माजींनी त्यांच्या स्मारकासाठीं लाखो रुपये गोळा करून देशबंधूंचा तो भव्य प्रासाद सोडवून घेतला आणि त्यांच्याच नांवानें स्त्रियांच्यासाठीं एक मोठें रुग्णालय अुघडलें.

स्वराज्याची चळवळ चालविण्याच्या पद्धतीविषयीं गांधीजींशीं मतभेद होअून देशबंधूंनी मोतीलाल नेहरूंच्या मदतीनें आपला निराळा स्वराज्यपक्ष चालविला. पण दोघेंहि थोर मनाचे असल्यानें मतभेद दूर होतांच गांधीजींशीं अत्यंत प्रेमानें त्यांनीं अेकोपा केला. गांधीजींनी अर्थातच अगदीं पहिल्यापासून त्यांच्याशीं अखंड प्रेमादराचें वर्तन ठेवलें होतें.

शेवटीं शेवटीं देशबंधु आणि गांधीजी यांच्यामध्यें कोणताच मतभेद अुरला नव्हता. गांधीजींच्या सर्व कार्यक्रमाला त्यांनीं आपला कार्यक्रम म्हणून स्वीकारल होता.

२५–१–२३

---

# देशबंधु पुण्यातिथि

जून १६ समय १

देशबंधु म्हणजे बंगालची खानदानी आणि बंगालचें हृदय. जणुं विश्वजित् यज्ञ केला असावा असें त्यांचें जीवन होतें. देशभक्तांची सेवा आणि भक्ति करणें हा त्यांच्या जीवनाचा सूर होता. अितका बोध देशबंधूंच्या चरित्रांतून विद्यार्थ्यांना द्यावा. ग्रामसंघटन आणि स्त्रियांचा अुद्धार यांविषयीं यादिवशीं विवेचन करावें. त्यांनी रचलेली कित्येक भजनेंहि या दिवशीं गावीं. ' सागर–संगीत ' हें त्यांचें काव्य वाचावें.

---

जुन ३०

राष्ट्रीय महासभेच्या अितिहासांत दादाभाअींचें नांव हिंदुस्थानचे पितामह म्हणून अमर झालें आहे. हिंदुस्थानचा मुख्य रोग त्याचें वाढतें दारिद्र्य हा आहे, त्याचें कारण अिंग्रजाचें राज्य हें आहे आणि त्याचा अुपाय स्वराज्य हा आहे, अितकें सप्रमाण सिद्ध करून दादाभाअींनीं या देशाला जागृत केलें. ' पुष्कळ वेळां बंड करावेंसें वाटतें, असें अध्यक्षपदावरून सांगून देशाची दुर्दशा दूर करण्याचा अुपाय किती लवकर हातीं घेतला पाहिजे हें त्यांनीं दाखविलें. अशा रीतीनें स्वदेशीचा आणि असहकाराचा जणूं त्यांनीं पायाच घातला. याकरितां ' दादाजयंती ' साजरी केली पाहिजे. दादाभाअींचें सबंध आयुष्य साधें, निर्मळ आणि विलक्षण अुद्यमी होतें, याविषयींहि पुष्कळ सांगतां येअील.

---

## स्व. लोकमान्य टिळक. : : ५५

### ( आगस्ट १ )

अि. स. १८५७ च्या निष्फळ प्रयत्नानंतर अिंग्रजांच्या सत्तेचा या देशांत चांगला जम बसला, कारण बेकीमुळें देशाचें शारीरिक बळ छिन्नभिन्न झालें होतें. शरीरबळाच्या या युद्धांत शिस्त आणि अैक्य यांच्या अभावीं देश हरला, पण हिंदी राष्ट्र आणि हिंदी संस्कृति अिंग्रजांना वश झाली नाहीं आणि होणार नाहीं याचें हिंदी लोकांना त्याचप्रमाणें अिंग्रज सरकारला अखंड स्मरण आणि खात्री करून देणाऱ्या ज्या कित्येक व्यक्ती या देशांत अुत्पन्न झाल्या त्यापैकीं अेक विक्रमवीर हा लोक सोडून गेला आहे. सत्तावन सालीं स्वतंत्रता मिळविण्याचा महाप्रयत्न झाला त्यावर्षी बाळ गंगाधर हें अेक वर्षाचें लहान मूल होतें. ज्या शिक्षणाच्या योगानें अिंग्रजांना जय मिळवितां आला तें शिक्षण घेअून त्यांच्याशींच लढण्याचा विचार बाळगणाऱ्या व्यक्तींत ते अग्रेसर ठरले. सार्वजनिक जीवनांत त्यांचे सहकारी आणि गुरु विष्णुशास्त्री चिपळूणकर अिंग्रजी साहित्य म्हणजे 'वाघिणीचें दूध' आहे म्हणत. त्याचें पान करून राज्यकर्त्यांशीं प्रजाहितार्थ लढण्याचा त्यांनी निश्चय केला.

पहिल्यापासूनच स्वदेशसेवेच्या स्वप्नांत रमणाऱ्या टिळकांच्या आयुष्यांत, ते विसाव्या वर्षी बी. अे. पास झाले, त्यानंतर अेल्‌अेल्. बी. झाले वगैरे हकिकत फारशी महत्त्वाची नाहीं. सत्तावन सालच्या अनुभवानें अितकें निश्चित झालें होतें कीं प्रजाशरीर दुबळें बनलें आहे. तें सशक्त करण्याचा--लोकजागृति करण्याचा अेकमेव अुपाय राष्ट्रीय शिक्षण हा आहे असा निर्णय लहानपणींच टिळकांनीं चिपळूणकर, नामजोशी, आगरकर वगैरे मित्रांसह केलेला होता. विष्णुशास्त्री म्हणजे स्वाभिमानाची मूर्तीच; स्वधर्म, स्वदेश आणि स्वभाषा यांविषयीं त्यांना अत्यंत आदर आणि अभिमान असे. म्हणूनच सरकारी नोकरीचा रस्ता सोडून लोकशिक्षणाच्या कार्यांत त्यांनी आपलें जीवित अर्पण केलें होतें. देशांत तेजस्वी शिक्षणाचा

प्रसार व्हावा, लोकांना निर्दोष साहित्य वाचण्यास मिळावें, देशाहिताच्या प्रश्नांची चर्चा व्हावी, अितकेंच नव्हे तर लोकांची अभिरुचि धर्माला हानिकर न व्हावी या अुद्देशानें ' न्यू अिंग्लिश स्कूल ' नांवाची शाळा, ' नवीन किताबखाना ' नांवाचें, पुस्तकाचें दुकान, ' निबंधमाला ' नांवाचें अेक तेजस्वी मासिक आणि ' चित्रशाळा ' नांवाचें पौराणिक आणि हिंदुजीवनाविषयींचीं चित्रें छापण्याकरितां अेक कलागृह

अितकीं विष्णुशास्त्र्यांनी स्थापन केलीं. आगरकर तितकेच देशाभिमानी होते, पण त्यांचा कल अिंग्रजी साहित्याकडे विशेष असल्यामुळें समाजसुधारणा करण्याकडे त्यांची वृत्ति अधिक तीव्र होती. या लोकांनी लोकशिक्षणाचें कार्य सुरू केलें. टिळक हे न्यू अिंग्लिश स्कूलमध्यें गणित शिकवीत. नंतर या मित्रमंडळीनें अेक कॉलेज स्थापन केलें, त्याचें नांव ' महाराष्ट्र कॉलेज ' ठेवण्याचा प्रथम विचार होता, पण मागाहून त्याला ' फर्ग्युसन कॉलेज ' हें नांव देण्यांत आलें. याबरोबरच टिळक हे अेक लॉ क्लासहि चालवीत असत. देशभक्तांचें हें युवकमंडळ सर्व प्रश्नांवर चर्चा करीत असे. पण राष्ट्रीय शिक्षणाचें कार्य हातीं घेतल्यानंतर शक्य तर अितर प्रवृत्तींत पडूं नये ही वृत्ति टिळकांची होती. विद्यार्थिजीवनांत त्यांची अध्ययनांतील अेकाग्रता आणि अध्यापनाची त्यांची रुचि आणि कला ही पहातां ही वृत्ति त्यांना स्वाभाविक होती; आणि याच कारणानुसार डेक्कन सोसायटी 'जेस्युअिट' संस्थेच्या ढबीवर चालवावी आणि त्यांत काम करणाऱ्या व्यक्तींनी आपलें सर्वस्व संस्थेलाच अर्पण करावें हा आदर्श ठेवण्यासंबंधीं त्यांचा आग्रह असे. आगरकर या विचाराशीं सहमत होअूं शकले नाहींत. मतभेद वाढला आणि टिळकांनी फर्ग्युसन कॉलेज सोडलें. जन्मसिद्ध अशा अध्यापकाच्या जीवनांत परिवर्तन झालें आणि पत्रकार बनून लोकशिक्षणाचें व्यापक कार्य हातीं घेअून ते लोकमान्य झाले.

टिळकांनी ' केसरी ' पत्र हातांत घेतलें आणि अिंग्रजींत ' मराठा ' पत्राहि चालू केलें. ' केसरी ' त मतभेद उत्पन्न झाला त्यामुळें आगरकरांनी ' सुधारक ' पत्र सुरू केलें. या दोन पत्रांनीं समाजसुधारणेविषयीं आणि हिंदु समाजव्यवस्थेंत सरकारला कितपत हात घालूं द्यावा याविषयीं अनेक वर्षें चर्चा करून महाराष्ट्र'ला बरेंवाअीट पण मोठ्यांत मोठें शिक्षण दिलें. ' केसरी ' त फूट पडली त्यापूर्वीच या युवकमंडळावर मोठी आपत्ति आली. शिवाजी महाराजांचे वंशज जे कोल्हापूरचे

महाराज त्यांना वेडे ठरवून मद्रासेला पाठविण्यांत आलें त्यावेळीं या देशाभिमानी नवयुवकांचा पुण्यप्रकोप खवळला. त्यांनी या प्रकरणांत खोल शिरून ' केसरी ' त लेख लिहिले, त्याचा परिणाम म्हणुन ' केसरी ' वर खटला झाला. हा खटला चालू असतांना विष्णुशास्त्री हे ३२ व्या वर्षी तरुण वयांतच मरण पावले, आणि आगरकरांना व टिळकांना १०१ दिवस सरकारचा पाहुणचार भोगावा लागला. पुण्यांत लोकमत तयार करून सरकारपुढें ठेवण्यासाठीं म्हणून महामति रानडे सारख्यांनी ' सार्वजनिक सभा ' स्थापिली होती. सार्वजनिक सभा ही काँग्रेसची जननी म्हटली जाते. या सभेंतहि सरकारशीं किती सहकार करावा याविषयीं मतभेद झाला आणि टिळकांचे विचार ज्यांना पसंत नव्हते त्यांनी ' डेक्कन सभा ' काढली. अशा रीतीनें पुण्यांत तीव्र मतभेद सुरू झाले, पण त्यामुळें पुण्यांतील राजकीय वातावरणाचा पारा चढता राहूं लागला; आजपावेतों सुद्धां राजकीय चर्चा करण्यांत आणि अिंग्रजांच्या नीतीविषयीं जागृत राहण्यांत साऱ्या देशांत पुणें हें अग्रेसर शहर राहिलें आहे.

तुरुंगांतून आल्यानंतर टिळकांनीं आपला सगळा जीव ' केसरी ' त गुंतविला. मराठी भाषा घडवून तिला समृद्ध करावी, आधुनिक काळांतील सर्व विचार आणि राजकीय सिद्धांत मराठी भाषेच्या द्वारां जनसमुदायाला समजावून द्यावे, लोकभावनांच्या सर्व छटा तिच्यांत व्यक्त कराव्या आणि राष्ट्रीय जागृतीचा प्राण भाषेंत अुत्पन्न करावा या अुद्देशानें दर आठवड्याला त्यांनीं लिहावयाला सुरवात केली. ' केसरी ' नें राजकीय महाराष्ट्र घडविला आहे असें जर कोणीं म्हटलें तर तें अयोग्य नाहीं. लोकमान्यांच्या ' केसरी ' ची भाषा अवडंबरविहीन, सरळ पण प्रौढ असे. त्यांतील लिखाण विषयावर परिपूर्ण काबू दाखविणारें, मुद्देसूद आणि जोरदार असे. ' केसरी ' जेव्हां अखाद्या प्रतिपक्षाविरुद्ध आखाड्यांत अुतरे तेव्हां त्याच्या भाषेंतील तेज सोळाहि कलांनी प्रकाशत असे. तेजाबरोबर कटुता किंवा जहर नसे असें नव्हे, पण त्यांतहि गांभीर्य पुष्कळ राखलें जाअी. प्रतिपक्षाचा पराजय करण्यासाठीं ' केसरी ' ज्या जहराचा अुपयोग करी तें जहर पुष्कळ लोकांच्या सांप्रत अभिरुचीला न झेपण्याजोगें वाटे, आणि टिळकांच्या भाषेंत विनय नसतां, आदर

नसतो अशी टीकाहि पुष्कळांनी केली. टिळकांचें याला अेकच अुत्तर असेः "लढ-ढैयाला याहून दुसरें कांहीं करतांच येणार नाहीं. मला जर निवृत्तींतच काळ कंठा-यचा असता तर मी सर्व प्रकारची अुदारता दाखविली असती. पण ज्याला कांहीं कार्य करायचें आहे त्यानें प्रसंगोपात्त प्रखर झालेंच पाहिजे." 'केसरी' अितकें व्यवस्थित, प्रतिष्ठित आणि लोकप्रिय वर्तमानपत्र हिंदुस्थानांत दुसरें क्वचितच असेल. महाराष्ट्राचें सार्वजनिक जीवन, हिंदुस्थानची जागृति, आशियाचीं भवित-व्यता, युरोपचें राजकारण आणि जगाची प्रगति यांविषयीं 'केसरीं' त नेहमीं विद्वत्तेनें आणि माहितीनें भरलेले प्रौढ लेख येत असत. 'केसरी' हें अत्यंत नियमित वर्तमानपत्र आहे. त्याची सर्व घटना आणि व्यवस्था टिळकांनी स्वतः केली होती. असें म्हणतात कीं दुनियेंत जेथें म्हणून मराठी भाषा बोलली जाते आणि वाचली जाते तेथें तेथें 'केसरी' जात असतो.

पण 'केसरी' हेंच कांहीं टिळकांचें कार्यक्षेत्र नव्हतें. अेका बाजूला सरकारविरुद्ध आणि दुसऱ्या बाजूला समाजसुधारकांविरुद्ध त्यांना लढावें लागे. टिळक हे खरें म्हटलें तर पुराणप्रिय नव्हते. अनेक समाजसुधारणा त्यांना अगत्या-च्या वाटत; तरी त्यांनी पुष्कळ सुधारणांना विरोध केला आणि त्यामुळें गैरसमज अुत्पन्न झाले. लोक त्यांना सुधारक मानूं लागले. त्यांचें मत, समाजसुधारणा हें नित्याचें काम आहे आणि तें आस्ते आस्ते झालें पाहिजे, असें होतें. विशेषतः विदेशी राज्याच्या जोखडाखालीं प्रजा जेव्हां आत्मविश्वास गमावून बसते तेव्हां आणि जेव्हां परधर्मी पाद्री लोकांचे रात्रंदिवस आपल्या संस्कृतीवर प्रहार चालू आहेत तेव्हां समाजाला स्वाभिमानशून्य आणि हतोत्साह बनविणें हें चूक आहे. शिवाय सुधारणांच्या मागें आपण लागलों तर शिक्षित आणि अशिक्षित यांच्यामध्ये अंतराय येअील, तट पडतील आणि राजकारणाच्या मामल्यांत आपण अधिकच दुर्बळ होअूं. म्हणून समाजावर हल्ला न करतां हळूं हळूं समाजाला वश करून होतील तेवढ्या सुधारणा करणेंच योग्य. सरकारच्या शक्तीनें दिपून जाअून आपण त्याच्या-पुढें नरम बनतो, तर मग श्रद्धादरपूर्वक समाजाच्या बाबतींतहि आपण नरम कां बनूं नये? असे त्यांचे विचार असल्यामुळें 'केसरीं' त ते शक्य तोंवर समाजसुधार-णेचे प्रश्न छेडतच नसत. अितक्यांत 'संमति वयाचें बिल' आलें. या बिलाचें तत्त्व

टिळकांना मान्य नव्हतें असें नाहीं. पण त्यांनी या बिलाला कडक विरोध केला. त्यांचं म्हणणें असें कीं अिंग्रज लोक हे परके आहेत ; ते जाणून बुजून आपल्या सामाजिक बाबातींत मध्यें पडत नाहीत ; अुदासीनपणाचें कां असेना पण धार्मिक आणि सामाजिक बाबतींत आपल्याला स्वराज्य आहे तें आपण आपल्याच हातांनीं काय म्हणून गमवावें ? आपण जर आपल्याच हातांनीं सरकारला आपल्या घरांत प्रवेश देअूं तर आपला स्वाभिमान आणि स्वातंत्र्य हें कमी होअील आणि आपण अधिकच दुर्बळ व पराधीन बनूं. टिळक हे सर्वंच जुन्या चालीरीती पाळीत नव्हते. पंक्तिभेदाच्या बाबतींत आज जी मुभा घेण्यांत येते ती सर्व मुभा ते घेत असत. त्यांचें जीवन अत्यंत साधें आणि पवित्र होतें तरी त्यांत धार्मिकपणाचें अवडंबर बिलकुल नव्हतें. विलायतेंत असतांना त्यांनी खाण्यापिण्यांत संपूर्ण शुद्धि राखली होती तरी तिकडून आल्यानंतर समाजाचा आणि धर्माचा अधिकार मानण्याकरितां म्हणून त्यांनीं प्रायश्चित्तहि घेतलें होतें. राजकीय अुत्सवांत मुसलमान आणि ख्रिश्चन यांच्या पंक्तीला बसून त्यांनीं भोजन केलें होतें. अंत्यजांना अस्पृश्य मानावें अशी शास्त्राज्ञा कोठेंहि नाहीं असें त्यांनीं जाहीर केलें होतें. त्यांचे कित्येक जीवश्चकंठश्च मित्र समाजसुधारणेंत अग्रणी होते.

सन १८९६ मध्यें मुंबअींत प्लेग सुरू झाला आणि पुण्यांतहि त्यानें प्रवेश केला. ही आपत्ति अनपेक्षित आणि अगदीं नवी असल्यामुळें सर्व लोक घाबरून गेले. सरकारलाहि प्लेग हटविण्याला काय अुपाय करावेत हें सुचलें नाहीं, आणि त्यामुळें 'सेग्रीगेशन' 'क्वॉरन्टाअीन' वगैरे कडक अुपाय योजण्यांत आले. शिवाय त्याचा योग्य अंमल करण्याकरितां भावना व सभ्यता यांच्याशीं फारकत असलेल्या गोऱ्या शिपायांची नेमणूक झाली. प्लेगाच्या त्रासापेक्षां या सोल्जरांच्या पद्धतीचा जुलूम लोकांना अधिक असह्य झाला आणि सर्वत्र हाहाकार माजला ! ज्याला जिकडे वाट फुटेल तिकडे तो पळाला. पण टिळकांनी याप्रसंगीं पुणें सोडलं नाहीं. गांवांतच राहून अेकीकडून लोकांना ते मदत करूं लागले आणि दुसरीकडून सरकारच्या, अुपायापेक्षां अपाय करणाऱ्या, विवेकशून्य कडकपणामुळें होणारा लोकक्षोभ 'केसरी' द्वारां व्यक्त करीत गेले. टिळकांनीं क्षोभ केवळ व्यक्त केला पण सरकारला वाटलें त्यांनी तो निर्माण केला. लोकक्षोभाची पराकाष्ठा प्लेग–

अंमलदार रॅन्डसाहेब याचा खून होण्यांत झाली. सरकारनें आपली प्लेगनीति बदलली खरी, पण अुग्र स्वरूप धारण करून लोकांना दडपून टाकण्यांत कांहीं बाकी ठेवलें नाहीं. पुण्यांतील सरदार नातुबंधूंना सरकारनें नजरकैदेंत ठेवलें व 'केसरी' वर खटला केला. कित्येक मित्रांनी टिळकांना माफी मागा अशी सल्ला दिली. पण टिळकांनी सांगितलें. 'सच्च्या दानतीनें मी जें केलें आहे त्याच्यासाठीं माफी कसली मागूं ? खलाशाचें काम करणारा जसा केव्हांना केव्हां समुद्रांत बुडूनहि जाअील, त्याच-, प्रकारें देशसेवा करायची असेल तर तुरुंगयात्रेचा प्रसंग हा यायचाच. या आमच्या धंद्यांतल्या जोखमी आहेत. माफी मागून मला देशाची कसलीहि सेवा करता येणार नाही. शिवाय माझें सत्त्व जाअील, मग माझ्यांत राहिलें काय ? ' सरकारनें त्यांना दीड वर्षाची शिक्षा ठोठावली, अितकेंच नव्हे तर मूळ कायद्यांत फेरफार करून राजद्रोहाचें कलम जास्तच कडक केलें. असें म्हणतात कीं तुरुंगांत गेल्यानंतर पहिल्या दिवशीं त्यांना अितकें कठिण काम देण्यांत आलें होतें कीं चक्की ओढतां ओढतां ते बेशुद्ध झाले. पण शुद्धीवर येतांच लगेच ते कामाला लागले. त्यांनीं सूट मागितली नाही ; सूट मागणें हें त्यांना नामुष्कीचें वाटे. अेका वर्षाच्या शेवटीं ते सुटले तेव्हां त्यांचें वजन बरेंच घटलें होतें. पण लोकांत त्यांचें वजन तितकेंच वाढलें होतें. घरीं येतांच पुनः 'केसरी' हातीं घेअून आणि 'पुनश्च हरिः ॐ' म्हणून ते लिहूं लागले.

टिळक जेलमध्यें होते त्या काळांत पाश्चात्त्य संस्कृतपंडित मॅक्समुल्लरच्या हातीं त्यांनी लिहिलेलें 'ओरायन' अथवा 'मृगशिरस्' नांवाचें पुस्तक आलें. 'ओरायन' मध्यें ज्योतिषशास्त्राच्या दृष्टीनें वैदिक कालनिर्णयाचें विवेचन होतें. हें पुस्तक पाहून मॅक्समुल्लर चकित झाले, मुग्ध झाले आणि असें अगाध पांडित्य असणाऱ्या विद्वानाकडे आपण केलेलें ऋग्वेदाचें भाषांतर अभिप्रायाकरितां पाठवावें असें त्यांना वाटलें. पण त्यांना समजलें कीं ग्रंथकर्ता तर तुरुंगांत आहे ! त्यांनीं अगोदर टिळकांना तुरुंगांत पुस्तकें मिळावीं, वाचण्याला वेळ आणि दिवाबत्ती मिळावी अशी व्यवस्था सरकारकडून करविली. मग त्यांच्या मध्यस्थीमुळें सरकारला टिळकांना सहा महिने अगाअू सोडावें लागलें. तुरुंगांत वेदांचें निरीक्षण करीत असतां त्यांना अेकदम स्फुरलें कीं आर्यांचें मूळ वसतिस्थान अुत्तरध्रुवाकडे असलें पाहिजे; आर्य लोक सुमेरूच्या आसपास राहात होते असा अुल्लेख वेदामध्यें आढळतो असें

त्यांना वाटलें. तुरुंगांतून सुटल्यानंतर ताओमहाराज कससारखा डोकें खाऊन टाकणार• खटला चालू होता ; तरी त्याच काळांत त्यांनी आर्क्टिक् होम अिन धी वेदाज् अर्थात् ' आर्यांचें वेदकाळांतील सुमेरुकडील वसतिस्थान ' या नांवाचा विद्वत्तेनें आणि संशोधनानें भरलेला ग्रंथ प्रसिद्ध केला. त्या ग्रंथामुळें त्यांची कीर्ति युरोपांतील विद्वान मंडळींत पसरली. ' आर्क्टिक् होम ' हा ग्रंथ लिहितेवेळी पारशी लोकांच्या धर्मग्रंथांचे त्यांनी अध्ययन केलें. त्यानंतर अिराण, मेसोपोटेमिया, खाल्डिया, सीरिया वगैरे देशांच्या प्राचीन अितिहासाकडे आणि संस्कृतीकडे त्यांचें लक्ष वेधलें, आणि वैदिक संस्कृतीशीं त्यांचें किती साम्य आहे तें त्यांनी कित्येक विद्वन्मान्य निबंधांत दाखवून दिलें. कित्येक लोक तर त्यांची विद्वत्ता पाहून त्यांना विनवीत कीं तुम्ही राजकारणाचे झगडे सोडून द्या आणि विद्वत्तेनें जी जगाची मोठ्यांत मोठी सेवा तुम्हांला करणें शक्य आहे ती करा. ते म्हणत, ' मला असा स्वच्छंद चालवायचा नाहीं, देशासाठी लढणें हेंच माझें कर्तव्य आहे. विद्वत्तेचें काम करणारे अगणित पंडित हिंदुस्थानांत निर्माण होतील. आर्यबुद्धि वंध्या झालेली नाहीं. ' त्यांच्या अेका स्नेह्यानें त्यांना विचारलें, ' स्वराज्य मिळाल्यावर तुम्ही कोणत्या खात्याचे मंत्री व्हाल ? ' त्यांनी सांगितलें, मला राजकारणाचा कंटाळा आहे. स्वराज्य मिळालें कीं मी आपला गणिताचा अध्यापक होओन आणि स्वस्थपणें विद्यानंदाचा लाभ लुटेन, '

जोंपर्यंत आपल्या देशबंधूंना पोटभर खायला मिळत नाहीं तोंपर्यंत विद्यानंदासारखा सात्त्विक आनंदसुद्धां त्यांना हराम वाटत असे. ते नेहमीं म्हणत, ' स्वराज्याची चळवळ हा पोटापाण्याचा प्रश्न आहे.' म्हणून सरकारनें जेव्हां जमीनमहसुलाच्या कायद्यांत फेरफार केला आणि अनादिकाळापासून वंशपरंपरागत चालत आलेल्या जमिनीवरचा मालकी हक्क भूमीच्या लेकरांपासून हिरावून घेऊन सात समुद्रापलिकडून आलेल्या सरकारला हिंदुस्थानच्या भूमीचे मालक ठरविण्यांत आलें आणि हिंदी शेतकऱ्याला फक्त आपले भाडोत्री बनविलें त्यावेळीं टिळकांनी सरकारला महसूल न देण्याची लढाओ चालविण्याचा विचार केला होता; पण त्यावेळीं लोकांची अितकी तयारी नव्हती.

याच काळांत मुंबअींत आणि पुण्यांत हिंदुमुसलमानांत कांहीं क्षुद्र काराणामुळें दंगा झाला आणि मोठी मारामारी झाली. पुण्यांत पुष्कळ वर्षांपासून हिंदू लोक मोहरमांत भाग घेत होते ते बंद झाले. दंग्याचा दोष दोघांकडेहि होता हें टिळकांनी कबूल केलें, पण जास्त दोष मुसलमानांचा होता असें त्यांनी जाहीर केलें. त्यामुळें टिळक हे मुसलमान समाजाविरुद्ध आहेत असा संशय कित्येक मुसलमानांच्या मनांत शिरला, पण तो खोटा असल्यामुळें कालान्तरानें निघून गेला. टिळक मुसलमानांच्या विरुद्ध आहेत ही आमची समजूत चुकीची होती असें खिलाफत डेप्युटेशनमधील सैयद हुसेन यांनी जाहीररीत्या कबूल केलें आहे, कारण लखनौच्या कॉंग्रेसमध्यें हिंदुमुसलमानांत विरोध आणि शंका राहूं नये अेवढ्यासाठीं,जो अधिकार-विभाग करण्यांत आला त्यांत मुसलमान जेवढें कांहीं मागत होते तेवढें सर्व देण्याचा सल्ला स्वतः टिळकांनी पुढाऱ्यांना दिला. प्रथम देशाचा विचार झाला पाहिजे,'मी हिंदु आहे कीं मुसलमान हा भेद देशहिताचा विचार करतांना मनांत येतां कामा नये,' हें त्यांचें त्यावेळचें प्रसिद्ध वाक्य आहे. पुण्यांत हिंदुमुसलमानांमध्यें जो बेबनाव अुत्पन्न झाला तो धर्माविषयींच्या संकुचित भावनेमुळें झाला होता हें पाहून, त्याच प्रमाणें हिंदूंनाहि मोहरमाअैवजीं अुत्सव करण्याचें कांहींतरी साधन मिळावें या हेतूनेंहि त्यांनी गणेश–अुत्सव सुरू केला. गणपतिअुत्सवांत स्वयंसेवकांचे आणि अितर तरुणांचे मेळे भजनें गातात ; विद्वान नेते धार्मिक , सामाजिक आणि कित्येक वेळां राजकीय विषयाची चर्चा करतात ; आणि अशा रीतीनें लोकांना कालानुरूप शिक्षण मिळतें. गणेशअुत्सवानें जशी धार्मिक जागृति झाली तशी गणेशोत्सवाच्या अगोदरच देशाभिमान आणि स्वाभिमान जागृत करण्यासाठीं टिळकांनी जो शिवाजी अुत्सव सुरू केला होता त्या शिवाजी–अुत्सवानेंहि पुष्कळ लोकजागृति झाली. या दोन्ही चळवळीमुळें स्वदेशीचा प्रचार महाराष्ट्रांत पुष्कळ झाला आणि शिक्षित–अशिक्षित यांच्यामधील भेद कमी कमी होत गेला. शिवाजी–अुत्सवामुळेंच जुना अितिहास परीक्षण्याची वृत्ति वाढली आणि कित्येक विद्वानांचें ' भारत–अितिहाससंशोधक–मंडळ ' तयार झालें.

१९०४ मध्यें युनिव्हर्सिटी ॲक्ट पास झाला आणि सरकारनें शिक्षण खातें–अुच्च शिक्षणासुद्धां–आपल्या अंकुशाखालीं अधिक आणलें. १९०५ मध्यें वंगभंग झाला. बंगाली लोकांनी अर्जविनंत्या , सभा वगैरे जेवढें करावयाचें तेवढें केलें आणि शेवटीं

स्वदेशी आणि बहिष्काराची महाराष्ट्रांत चळवळ अुचलली. स्वाभाविकपणेंच बंगाली लोकांना पहिली सहानुभूति महाराष्ट्रीयांकडून मिळाली. सरकार तर असेंच मानतें कीं अत्याचाराचा अुपदेशहि बंगालला पुण्याकडून मिळाला आहे. स्वदेशी, बहिष्कार आणि राष्ट्रीय शिक्षण या तीन अुपायांनी स्वराज्य मिळवावयाचें आहे हा राष्ट्रीय मूलमंत्र सर्वत्र पसरला. यालाच 'लोकमान्यांची चतुःसूत्री' म्हणतात.

बंगालचे राष्ट्रीय पुढारी स्वराज्याचा अर्थ 'पूर्ण स्वातंत्र्य' असा करीत आणि बहिष्काराचा अर्थहि 'अिंग्रजी राज्याशीं व अिंग्रजी राष्ट्राशीं पूर्ण असहकार' असा करीत. त्यावरून पुष्कळ नेमस्त पुढाऱ्यांना असें वाटलें कीं कॉंग्रेसकरितां अेक बंधन (Creed) ठेवलें पाहिजे. टिळकांना वाटलें कीं तशा तऱ्हेचें बंधन अेकप्रकारें आतांपर्यंत सर्वजण स्वेच्छया मानीतच आले आहेत, तरीपण शपथपूर्वक सही करून तें स्वीकारण्यांत अेकप्रकारची मानहानि आहे आणि देशांतील सर्व पक्षांना कॉंग्रेसमध्यें स्थान राहूं देण्याच्या बाबतींत तें अडचणीचें होअील, म्हणून त्यांनीं तें पसंत केलें नाहीं. सुरत येथें कॉंग्रेसमध्यें फळ्या पडल्या.

वंगभंगाच्यामुळें स्वावलंबनाचा मार्ग स्वीकारणाऱ्या प्रजेवरील अेकीकडून कॉंग्रेसचा अंकुश दूर झाला त्याच वेळीं दुसरीकडून सरकारनें दंडनीतीचा अवलंब केला. परिणामीं बंगालांत युरोपचें आसुरी हत्यार म्हणजेच बॉम्ब अवतीर्ण झाला. या परिस्थितीविषयीं 'देशाचें दुर्दैव' या शीर्षकाखालीं लिहिलेल्या अग्रलेखांत टिळकांनी सरकारच्या दुष्ट नीतीलाच जबाबदार धरलें. महाराष्ट्रांत बंगालविषयीं संपूर्ण सहानुभूति होती, पण टिळकांच्या दूरदर्शी धोरणामुळें अत्याचाराची प्रवृत्ति थांबविली गेली होती. याच काळांत स्वदेशी आणि बहिष्काराच्या चळवळीबरोबरच मद्यपाननिषेधाच्या चळवळीला जोर देअून लोकांचें जीवन विशुद्ध करण्याचा त्यांनीं प्रयत्न केला. तोहि सरकारला आवडला नाहीं. दारूच्या गुत्त्यांपुढें अुभे राहून लोकांना अुपदेश करणाऱ्या समाजसेवकांना सरकारनें दडपून टाकलें. टिळकांनी मद्यपाननिषेधाची चळवळ मुंबअीच्या मिलमजूरांतहि चालविली त्यामुळें पुष्कळच लोकजागृति झाली. लोकमान्य मिलमजुरांना सांगत कीं, 'तुम्ही अज्ञानांत आणि व्यसनांत कां बरे कुजताहांत? तुमचें जीवन जर तुम्ही सुधाराल तर मुंबअींत तुम्ही तीन लाख आहांत, मुंबअी तुमची आहे. जीवन सुधारा, अेकी

करा आणि आजची स्थिति समजून घ्या.' ही शुद्ध चळवळपुद्धां सरकारला भारी वाटली. टिळकांमुळें महाराष्ट्रांत अत्याचार याच्या थांबला होता, पण सरकारला याहून उलटेंच भासलें. देशाच्या त्याचप्रमाणें सरकारच्या दुर्भाग्यानें टिळकांच्या 'देशाचें दुर्दैव' या लेखांत सरकारला राजद्रोह आढळला. 'ज्या देशावर प्रेम करण्याचा दावा तुम्ही करीत आहां त्या देशांतून सहा वर्षें तुम्हांला बाहेर राखण्यांतच त्या देशाचें हित आहे' असें म्हणून हायकोर्टानें त्यांना हद्दपारीची शिक्षा केली! 'व्यक्तीचें आणि राष्ट्राचें भाग्य या न्यायमंदिरापेक्षा अधिक उच्च व्यक्तींच्या आणि शक्तींच्या हातीं असतें, आणि ज्या सिद्धांतासाठीं मी लढत आहे त्याचा उत्कर्ष मी मोकळें राहाण्यापेक्षां माझ्या बंदिवासानेंच करण्याची त्या जगन्नियंत्याची इच्छा असेल' असें म्हणून त्या महात्म्यानें झालेली शिक्षा स्वीकारली आणि त्याबरोबर लोकमान्यांच्या या तपश्चर्येनें स्वराज्याचा मंत्र प्रत्येक हिंदवासीयाच्या हृदयांत स्फुरूं लागला. सहा वर्षांच्या या तपश्चर्येचें दुसरें फळ 'गीतारहस्य' हें साहित्यरत्न होय.

टिळकांना शिक्षा करून जो परिणाम घडवून आणण्याची इच्छा सरकारनें बाळगली होती त्याच्या उलट परिणाम झाला. टिळकांची प्रेरणा आणि अंकुश नष्ट होतांच महाराष्ट्रांतील तरुण निरंकुश झाले व जो अत्याचार टिळकांच्यामुळें थांबला होता आणि जो अत्याचार टिळकांना शिक्षा करून सरकार थांबवूं इच्छित होते तोच अत्याचार महाराष्ट्रांत जोरानें सुरू झाला. नाशीक येथें कट झाला. कलेक्टर जॅक्सन याचा खून झाला आणि अनर्थपरंपरेचा प्रवाह वाहूं लागला. जवळजवळ पुन्हा सहा वर्षांनी वयानें वृद्ध, शरीरानें क्षीण, पण उत्साहांत तरुण असे लोकमान्य कर्मयोगाचा संदेश घेऊन परत आले. हा संदेश हिंदुस्थानांतील जवळजवळ सर्व भाषांत पसरला. कर्मयोगाच्या आचार्यानें 'स्वराज्य संघा'ची स्थापना केली आणि देशांत स्वराज्याची चळवळ सुरू झाली. राष्ट्रमदानें अंध झालेल्या युरोपियन राष्ट्रांत युद्ध सुरू झालें आणि हिंदुस्थान आणीबाणीच्या प्रसंगीं इमानदार राहील कीं नाहीं याची साम्राज्यसरकारला भीति वाटली. त्यावेळीं ब्रिटिश साम्राज्याच्याबरोबर राहाण्यांत हिंदुस्थानाचें हित आहे असें जाहीर करून टिळकांनी ब्रिटिशसाम्राज्याची मोठ्यांत मोठी सेवा

केली आहे. तरी शंकाखोर सरकारला टिळकांच्या भाषणांत राजद्रोहच दिसून येअी. पुनः अेक वेळां सरकारनें टिळकांना नोटीस काढली, पण यावेळीं हायकोर्टाला टिळकांच्या निर्दोषीपणाची खात्री झाली आणि ते सुटले.

त्यानंतरचा अितिहास ताजा असल्यासारखा आहे. सैन्यभरतीविषयींचे त्यांचे प्रयत्न, पंजाब दिल्लीकडे जाण्याची त्यांना झालेली मनाअी, मॉंटेग्यूशीं मुलाखत, विलायतेला जाण्याची मनाअी - पण शेवटीं मिळालेली परवानगी, विलायतेंत त्यांनीं केलेली कामगिरी वगैरे सर्व गोष्टी अजून लोकांना ताज्या वाटतात. टिळकांचें सर्व आयुष्य लढण्यांतच गेलेलें आहे. अेका पत्रकारानें म्हटल्याप्रमाणें 'मृत्यूनेंच त्यांना प्रथम शांति दिली!' त्यांचें खाजगी जीवन साधें आणि पवित्र होतें. त्यांची राजकीय प्रवृत्ति जोरदार आणि लढाअू होती. ते आखाड्यांत अुतरले म्हणजे कोणाकडे दयेची याचना करायचे नाहींत, कोणावर दया करायचे नाहींत; तरी त्यांच्या मनांत द्वेष टिकत नसे. आगरकरांना त्यांनीं विरोध केला, पण त्यांची अंतकाळीं सेवा करण्याकरितां ते स्वतः हजर होते. भांडारकरांवर ते प्रहारहि करीत, पण भांडारकरांची कदर करून त्यांच्यांशीं शिष्यभाव ठेवीत. गोखल्याशीं त्यांचें कधींहि जमलें नाहीं, पण गोखल्यांनी १९०४-५ मध्यें विलायतेंत हिंदुस्थानचीं जी सेवा बजावली त्याची कदर करण्यासाठीं पुणें शहरामार्फत त्यांचें सार्वजनिक अभिनंदन करण्यांत टिळक स्वतःच अग्रेसर होते. टिळकांची राजकीय मतें कशीं होतीं हें परीक्षण्याचें हें स्थळ नव्हे. त्यांच्या मतांशीं हिंदी जग पूर्णपणें परिचित आहे. कोणाला तीं माहित नसतील तर तो टिळकांचा दोष नव्हे. आपल्या मताचा प्रचार करण्याची टिळकांची शक्ति आणि कला खरोखर अलौकिक होती. त्यांच्या विद्वत्तेचा साक्षात्कार जगाला झाला आहे, पण त्यांनी आपली सगळी विद्वत्ता हिंदी लोकांच्या मोक्षासाठीं जन्मभूमीच्या चरणीं अर्पण केली होती. 'स्वराज्य' हा त्यांच्या जीवनाचा आधारस्तंभ होता. ते बुद्धीनें ब्राह्मण आणि वृत्तीनें क्षत्रिय होते. हिंदी जागृतीचे ते जनक, आधुनिक महाराष्ट्राचे पंचप्राण, राष्ट्रीय पक्षाचे अध्वर्यु, स्वराज्यमंत्राचे ॠषि, नोकरशाहीचे वैरी आणि हिंददेवीचे अनन्य अुपासक होते. आपण हिंदुस्थानवासी त्यांच्या चरित्रावरून स्वदेशसेवेची दीक्षा घेअून स्वराज्यसेवेचे अधिकारी होअूं तरच त्यांच्या पराक्रमी आत्म्याला शांति

मिळेल आणि तरच त्यांचें जीवन सफळ होओल. स्वप्रयत्नानें मनुष्य जितकें जीवनसाफल्य मिळवूं शकतो तितकें त्यांनी परिपूर्ण मिळविलें होतें.

८–८–२०.

---

# टिळक पुण्यतिथि

**ऑगस्ट १ ली** **१ दिवस**

या दिवशीं लोकमान्यांचें चरित्र मुलांना सांगावें. नोकरशाहीचें स्वरूप जनतेला समजून देण्याच्या कामीं त्यांनी आपलें सारें आयुष्य खर्च करून राष्ट्रीय आचार्याचें स्थान कसें मिळविलें तें समजावून द्यावें. स्वराज्य हा लोकांचा जन्मसिद्ध हक्क आहे आणि तो मिळविण्यासाठीं प्रत्येकानें अीश्वरनिष्ठापूर्वक निष्काम कर्म केलें पाहिजे या टिळक–गीतारहस्यावर विशेष जोर द्यावा. 'गीतारहस्यां' तील अुत्कृष्ट अुतारे वाचावेत.

---

# क्रांतिदिन : : ५६

## ( ता. ८–९ ऑगस्ट )

ब्रिटिश साम्राज्याचा संबंध हिंदुस्थानाला बाधकच झाला असें ठरल्यानंतर आणि अशी जाहीर घोषणा केल्यानंतरहि ब्रिटिश नीति बदलूं शकत नाहीं, असा अनुभव आल्यानंतर अहिंसक वृत्तीच्या लोकांनी पुढें काय करावयाचें? त्यांनी अिंग्रज सरकारला भलेपणानें पण दृढतेनें सांगितलें कीं 'तुम्हीं आतां आमचा देश सोडलेलाच बरा. तुमच्यामागें आमचें काय होओील याची चिंता तुम्हांला नको. ती आमची आम्ही पाहून घेअूं. फार तर चार दिवस आमच्या येथें बजबजपुरी माजेल, रक्ताचे पाटहि वाहतील; पण जळवा लागून होणारें रक्तशोषण अधिक भयंकर आहे. ते दूर होअूं द्या.'

'हिंदुस्थान सोडून जा' या घोषणेच्यामागें अितकी कांहीं सात्त्विक तपश्चर्या आणि राष्ट्रीय निर्धार होता कीं या घोषणेचा राष्ट्रावर अगदीं विजेप्रमाणें परिणाम झाला आणि राष्ट्रांत नवेंच चैतन्य स्फुरूं लागलें. आणि याहून विशेष आश्चर्याची गोष्ट म्हणजे ब्रिटिश शासनकर्त्यांची धृति नाहींशी झाली.

मामुली रिवाजाप्रमाणें त्यांनी धाकदपटशा देअून पाहिला पण राष्ट्राचा निर्धार वाढतच गेला. या सर्व हृदयमंथनाला निर्वाणीची वाचा फुटली. सन १९४२ च्या ऑगस्टच्या ८ तारखेच्या रात्रीं : त्या शुभरात्रीच्या मुहूर्तावर राष्ट्रानें ठरविलें कीं ब्रिटिश सत्तेला आपण दिलेला आजवरचा नैतिक पाठिंबा आपण काढून घेत आहों, आजपासून आपण स्वतंत्र आहोंत. आणि आतां तें स्वातंत्र्य शक्य त्या वेगानें स्थापन करीत जावयाचें.

८ तारखेच्या रात्रीं ही जी मानसिक आणि हार्दिक क्रांति झाली तिचें पहिलें फळ म्हणजे ९ तारखेला सरकारनें राष्ट्रांतील बहुतेक सगळ्या पुढाऱ्यांना पकडलें. राष्ट्रीय महासभेनें ठरविलें होतें कीं शक्य तितक्या वेगानें स्वातंत्र्य स्थापावयाचें. लोकांनी त्याचा अर्थ केला साधतील त्या अुपायांनी स्वातंत्र्याची स्थापना करावयाची.

त्या काळीं लोकांनी ज्या अुपायांचा अवलंब केला त्यांपैकीं कांहीं अुपाय कॉंग्रेसला संमत नव्हते, अहिंसेच्या चौकटींत बसत नव्हते. ते अुपाय शेवटीं जनतेवरच शेकले. हें सर्व जरी खरें असलें तरी राष्ट्राला आलेल्या अन्यायाच्या चिडीचा आणि सरकारच्या अत्याचाराचा विचार करतां म्हणावें लागतें की राष्ट्रानें असाधारण संयम दाखविला आणि कित्येकांनी हिंसेचा अवलंब केला असला तरी ९ ऑगस्टपासून सुरू झालेली क्रांति प्रधानपणें अहिंसकच राहिली. जर राष्ट्राला जवळजवळ पाव शतक महात्माजींकडून अहिंसेचे धडे मिळाले नसते तर देशांत हिंसेचा अेवढा प्रचंड वणवा पेटला असता कीं त्या अग्नीमध्यें साम्राज्य सरकार आणि प्रजा दोन्ही पक्षांची राखरांगोळी झाली असती.

यासाठीं ८–९ ऑगस्टचा क्रांतिदिन अहिंसक क्रांतीचा प्रथम प्रयत्न म्हणूनच ओळखला गेला पाहिजे.

जगभर चाललेल्या महायुध्दाच्या घाअींतच ही स्वदेशी अहिंसक क्रांति घडून आली, म्हणून हिला विशेष महत्त्व आहे. प्रचंड शत्रूशीं वर्षानुवर्षे लढून डबघाईस आलेल्या साम्राज्यानें राष्ट्रांतील ही जागृति आमूलाग्र अुपटून काढण्यासाठीं निर्दयपणाची कमाल केली; पण त्यांत आश्चर्य कांहींच नव्हतें. जीवावर बेतलें तेव्हां क्षीणा नरा निष्करुणा भवन्ति. '

त्या क्रांतीच्या काळानंतर ब्रिटिश साम्राज्याचें डोळे उघडले, पण हृदय स्वच्छ झालें नाहीं. म्हणून त्यांनी हिंदुस्थानावरील आपला अधिकार सोडून द्यावयाचा निश्चय केला. तरीहि प्रायश्चित्तपर्वांतदेखील नवीं नवीं पापे करीत राहाण्याचा स्वतःचा रिवाज कायम ठेवला आहे. ( "Even in penance planning sins anew" )

तेजस्वी राष्ट्राला प्रतिपक्षाच्या या सर्व प्रयत्नांकडे अुपेक्षा आणि क्षमा-वृत्तीनें पहातां येतें. विशेषतः जेव्हां स्वातंत्र्य जवळ येतें तेव्हां अुपासकांनी अुदारता, नम्रता आणि बंधुता या गुणत्रयींचाच आश्रय केला पाहिजे.

ता. २५-२-४७

# कार्यक्रम

क्रांतिदिनाचा प्रारंभ महात्माजींच्या ८ ऑगस्टच्या भाषणापासून झाला पाहिजे.

त्यानंतर, ४२ सालच्या क्रांतीमध्यें जे जे राष्ट्रसेवक कामीं आले त्या सर्वांचें स्मरण करणें हें आपलें मुख्य कर्तव्य आहे. नामनिर्देशपूर्वक असें हें वाङ्मयीन श्राद्ध झाल्यानंतर यापुढें त्या क्रांतीचें फळ पदरांत पाडून घेण्यासाठीं अेकी, परस्परसहकार आणि परस्परस्वीकार यांचा रचनात्मक कार्यक्रम चालू ठेवण्याचा संकल्प केला पाहिजे. अेकीचें सर्वोत्कृष्ट साधन राष्ट्रभाषा हिंदुस्थानी हें होय.

झेंडावंदन तर असणारच.

# जिवंत अितिहास :: ५७

हिंदुस्थानचा अितिहास हिंदुस्थानच्या लोकांनी लिहिलेला नाहीं. या विधानाला आपण कितीहि विरोध केला, तरी प्राचीन काळचा आपला अितिहास आपल्या हातांनी लिहिला गेला आहे असें सिद्ध होत नाहीं. रामायण महाभारत हे कांहीं अितिहास म्हणतां येणार नाहींत. आधुनिक दृष्टीनें तर ते अितिहास नव्हेतच. रामायणमहाभारतांत त्याचप्रमाणें पुराणांत अितिहास आहे, पण तो धर्मनिश्चय करण्याकरितां योजलेले दृष्टांत म्हणून आहे. महावंश आणि दीपवंश हे अितिहास म्हणतां येतील. पण ते सीलोनचे आहेत, आणि त्यांत असलेला अितिहास फारच थोडा आहे. काश्मीरच्या राजतरंगिणीविषयींहि असेंच म्हणावें लागेल. तर मग आपला अितिहास कां नाहीं? जीवनांतील कोणतेंहि अंग घ्या, त्यांत आपल्या लोकांनी असाधारण प्राविण्य मिळविलेलें आहे; तरी आपल्यांत अितिहास कां नाहीं?

अितिहास म्हणजे मनुष्यजातीपुढें अुत्पन्न झालेल्या प्रश्नांची नोंद. यांपैकीं कित्येक प्रश्नांचें निराकरण झालेलें असतें आणि कित्येक प्रश्न अजून अनिर्णीत असतात. ज्या प्रश्नांचा निर्णय होअू शकला आहे ते आतां प्रश्न राहिले नाहींत. त्यांचें निराकरण झालें आहे आणि ते समाजांत–सामाजिक जीवनांत संस्काररूपानें येअून चुकले आहेत. पचलेल्या अन्नाचें जसें रक्त बनतें तसे हे प्रश्न राष्ट्रीय समजुतींचें अथवा सामाजिक संस्कारांचें रूप पावले आहेत. अन्न पचन झालेलें असलें म्हणजे काल मी काय खाल्लें याचा जसा मनुष्य विचार करीत नाहीं, तसे जे प्रश्न सुटले आहेत त्याविषयींहि तो अुदासीन राहातो.

आतां राहिले अनिर्णीत प्रश्न. आपले लोक परमार्थी ( serious ) आहेत. ते अनिर्णीत प्रश्न कागदावर उतरून सोडून देऊं इच्छीत नाहींत. अनिर्णीत प्रश्नांत मतभेद असतो. जितके मतभेद तितके संप्रदाय आपण उभे करतों. वेदाच्या उच्चारणांत मतभेद झाले, आपण भिन्न भिन्न शाखा काढल्या. ज्योतिषांत मतभेद झाला तेथेंहि आपण स्मृति आणि भागवत एकादशी वेगवेगळी मानली. दार्शनिक तत्त्वभेद आढळला तर आपण द्वैतवादी आणि अद्वैतवादी असे पंथ उत्पन्न केले. आहारभेद झाला किंवा धंद्यांत भेद पडला तेव्हां आपण निरनिराळ्या जाती बांधल्या सामाजिक रीतीरिवाजांत जेथें मतभेद पडले तेथें आपण जातींत पोटजाती काढल्या. चुकून माणसानें चाल मोडली किंवा मोठें थोरलें पाप केलें तर त्याकरितांसुद्धां त्याला प्रायश्चित्त आहे ; त्यासाठीं नवीं जात उत्पन्न करीत नाहींत. महान ऐतिहासिक आणि राष्ट्रीय महत्त्वाच्या घटनांचा इतिहास आपण सणांच्याद्वारा जागृत ठेवतों. प्रत्येक सामाजिक चळवळीच्या केंद्राला तीर्थाचें रूप देऊन आपणती ज़िवंत ठेवली आहे. अशा रीतीनें इतिहास लिहून ठेवण्यापेक्षां इतिहास जगणें आणि जगविणें म्हणजेच जीवनांत जगवून दाखविणें ही आपल्या समाजाची खुबी आहे. चिंध्यांच्या बनलेल्या कागदावर इतिहास जतन करून ठेवणें चांगलें कीं जीवनांतच इतिहास जतन करणें हें चांगलें? कोणता मार्ग अधिक सुधारलेला आहे हें सांगणें काय कठीण आहे ? जोंवर परंपरा तुटली नव्हती तोंवर आपला इतिहास आपल्या जीवनांत जिवंत होता. अजूनहि लोकांच्या चालीरीती, लोकांच्या समजुती, ज्ञातिसंघटना, सण वगैरे आपण तपासून पाहिले तर त्यांतून पुष्कळ इतिहास मिळण्याजोगा आहे. मात्र हा इतिहास बव्हंशीं राजकीय नसेल, राजनैतिक नसेल, तो सामाजिक आणि राष्ट्रीय असेल. इतिहाससंशोधक या दिशेनें कांहीं परिश्रम घेणार नाहींत काय ?

---

# टीपा व स्पष्टीकरण

[ ज्या टीपेच्या वा स्पष्टीकरणाच्या खालीं ' का. का ' असें लिहिलें आहे तें लिखाण खुद्द श्री. काकासाहेब कालेलकरांचें आहे. इतर टीपा अनुवादकाच्या आहेत. ]

## प्रकरण १लें—

पृष्ठ ३—' श्रीविष्णूच्या आज्ञेनें...अितिहासक्रम ' : कोणतेंहि धार्मिक कार्य करण्यापूर्वी देशकालाचा अुच्चार करून संकल्प बोलण्याची पद्धति फार प्राचीन आहे. त्या संकल्पांत पुढील शब्द आहेत: — श्रीविष्णोराज्ञया प्रवर्तमानस्य " अि. त्या संकल्पाचाच अुल्लेख येथें आहे.

## प्रकरण २रें—

**पृष्ठ ६—दोन अीद :** ( १ ) अीद–अे–सरवतन; आणि ( २ ) बक्र–अीद. पहिला अीद मुहर्रमच्या चाळीसाव्या दिवशीं हजरत हुसेन यांच्या स्मृत्यर्थ साजरा केला जातो. या दिवशीं हजरत हुसेन यांचें शिर व धड आपोआप जुळलें म्हणतात. म्हणून त्यास ' अीद–अे–सरवतन ' म्हणतात.

दुसरा अीद हा सण हजरत महंमद पैगंबरांचे पूर्वज महाभगवद्भक्त हजरत अिब्राहिम हे आपल्या लाडक्या मुलाची अीश्वराला कुर्बानी करण्यास तयार झाले तत्प्रीत्यर्थ साजरा केला जातो. हा सण अिस्लाम धर्माची स्थापना होण्यापूर्वीपासून चालत आलेला आहे.

**पृष्ठ ६—मोहरम (मुहर्रम) :** हा मुसलमानांत पहिला महिना समजला जातो. या महिन्याच्या सुरुवातीपूर्वी दहा दिवस मुहर्रम सण साजरा केला जातो. हजरत महंमद पैगंबरांच्या मुलीचा मुलगा हुतात्मा हजरत हुसेन यांच्या स्मरणार्थ हा सण योजिलेला आहे. त्याविषयींचा अितिहास असा आहे:—

हजरत हुसेन हे अत्यंत सत्यवादी आणि सदाचारी होते. त्याचप्रमाणें ते दृढ विचाराचे आणि सहनशीलहि होते. यांचे थोरले बंधु हजरत हसन हे पैगंबरांच्या गादीवर लोकांनियुक्त खलीफा म्हणून बसले होते. पण शामदेशचा शासक मआवियां याला खलीफा होण्याची अिच्छा झाली आणि त्यानें हजरत हसनवर चढाअी केली. हजरत हसन यांना आपमांत लढाअी करून अेकमेकांचे गळे कापण्यापेक्षां आपण गादी सोडणेंच बरें असें वाटलें. पण त्यांनीं कांहीं अटींवर राज्य सोडण्याचें कबूल केलें. त्या अटी अशा कीं, मआवियानें आपल्या (हसन यांच्या) परिवाराला कसलाहि त्रास देअूं नये, मआवियानंतर खलिफाची गादी आपल्याकडे यावी आणि मआवियानें हजरत अलींच्या बद्दल अपशब्द बोलूं नये. पण मआवियानें या अटी पाळल्या नाहीत. खिलाफत (खलिफाची गादी) हजरत हसनकडे जाअूं नये म्हणून त्यानें त्यांच्यावर विषप्रयोग केला.

मआवियाच्या मरणानंतर ठरल्याप्रमाणें हजरत हुसेन हे खलीफा व्हावयाचे, पण मआवियानें ही गादी आपला मुलगा यजिद याच्याकडे सोंपविली ही गोष्ट हजरत हुसेन यांना, त्याचप्रमाणें कूफा शहरच्या लोकांनाहि मान्य झाली नाहीं. कूफाच्या लोकांनीं हजरत हुसेन यांना खलीफा म्हणून आपल्या हद्दींत येण्यास सुचविलें. त्याप्रमाणें हजरत हुसेन आपल्या परिवारासह कूफाकडे जावयास निघाले. पण ही बातमी यज़िद यास कळतांच त्यानें आपलें सैन्य पाठवून कूफा शहरच आपल्या ताब्यांत घेतलें. वाटेंत हजरत हुसेन यांना हें कळलें. करबलाच्या मैदानांत कूफा-अधिपतीच्या सैन्यानें त्यांना वेढा दिला. हजरत हुसेन यांच्या परिवारांत त्यांचे बंधू व बायकामुलेंहि होतीं. तहानेनें सर्वजण व्याकुळ झाले होते. नदीकडील रस्ता-सुद्धां शत्रुसैन्यानें रोखला होता. जोंवर हजरत हुसेन यजिदला खलीफा म्हणून कबूल करणार नाहींत तोंवर ते असेच कैदेंत राहतील असें सेनापतीनें त्यांना कळविलें. ती रात्र हजरत हुसेननीं व त्यांच्या परिवारानें परमेश्वराची प्रार्थना करण्यांत घाल-विली. नंतर दुसरे दिवशीं चांगले चांगले कपडे घालून व शरीर सुगंधित करून सर्वजण मरणाला सिद्ध झाले. हजरत हुसेनांच्या तहानलेल्या परिवारांतील प्रत्येक योद्धा अनेक शत्रुसैनिकांना मारून मरूं लागला. शेवटीं हजरत हुसेन लढूं लागले आणि त्यांनीं शत्रुसैन्याला थोडें मागें हटवून नदीची वाट मोकळी करून घेतली. पाणी पिण्याकरितां म्हणून हजरत हुसेन नदीकडे धांवले; पण त्याच वेळीं शिमर नांवाच्या एका सेनापतीनें त्यांचा वध केला.

हजरत हुसेन यांच्या या क्रूर वधामुळें सारे मुसलमान खवळून गेले. करबला येथें घडलेल्या याच हत्याकांडाच्या स्मृतिप्रीत्यर्थ मुसलमान लोक मुहर्रमच्या दिवसांत ' ताजिये ' ( डोले ) काढतात.

—अनु.

धर्मांकरितां प्राण अर्पण करणाऱ्या ' शहीदा '( हुतात्म्या )साठीं शोक करणें धर्माच्या दृष्टीनें कितपत योग्य आहे हा प्रश्न या बाबतींत उठविला जातो. या बाबतीत आपला अभिप्राय स्पष्ट आहे.

—का. का.

## प्रकरण ११वें—

**पृष्ठ ३८**—शंकराचार्यांनीं स्थापन केलेले संन्याशांचे दहा पंथः– तीर्थ, आश्रम, वन, अरण्य, गिरि, पर्वत, सागर, सरस्वति, भारती आणि पुरी.

—का. का.

**पृष्ठ ४०—" ब्राह्मणा......न दधृषुः । "** ( बृहदारण्यकोपनिषत् ) ' तुम्हां ब्राह्मणांमधून ज्याची अिच्छा असेल त्यानें मला विचारावें, अथवा वाटेल तर सर्वजण मला विचारा ; ज्याची अिच्छा असेल त्याला मी विचारतों, अथवा सर्वांना मी विचारतों, ' पण ब्राह्मणांना हिंमत झाली नाहीं.

**पृष्ठ ४०—देवांचें पंचायतन :** शिव, विष्णु, गणपति, देवी, सूर्य.

**पृष्ठ ४१ —मोहमुद्गर स्तोत्राचा प्रसंग :** अद्वैतज्ञान झालें असू-नहि शंकराचार्यांच्या मनांतून ब्राह्मण आणि चांडाळ असा भेद गेला नव्हता ; म्हणून भगवान् शंकरांनीं चांडाळाचें रूप धारण करून रस्त्यांत आचार्यांना स्पर्श केला. आचार्य रागावले, तेव्हां चांडाळानें ' सर्वांची शरीरें सारखीं आणि आत्म्यांत भेद नाहीं, तर अस्पृश्यता उरली कोठे ? ' असा बोध करून आचार्यांच्या उरल्या-सुरल्या मोहाच्या डोक्यांत मुद्गर हाणला व त्यांचें अद्वैत–ज्ञान कृतार्थ केलें.

## प्रकरण १२वें—

**पृष्ठ ४५—महाभिनिष्क्रमण :** वैराग्य अंगीं बाणल्यामुळें राज्यवैभवाचा आणि गृहसुखाचा सर्वस्वीं त्याग करून सिद्धार्थ बाहेर पडला. त्या बाहेर पड-ण्याला हें नांव दिलें आहे.

**पान ५४—गूढवादी धर्म :** साक्षात्काराच्या मागें लागलेल्या लोकांना जो अनुभव होतो तो शब्दांत मांडतां येत नाहीं आणि जगाच्या रूढीशीं त्याचा मेळ बसत नाहीं. म्हणून असे अनुभवी लोक गूढ भाषेमध्यें स्वतःचा अनुभव व्यक्त करतात आणि स्वतःच्या साधनेचा प्रकारहि गुप्त ठेवतात.

—का. का.

**पृष्ठ ५४—'अतिवादी' धर्म :** जो मनुष्य मर्यादा सोडून बोलतो त्याला उपनिषदांत 'अतिवादी' म्हणतात. पण तेथें अनेक ठिकाणीं 'अतिवादी' शब्दाचा अर्थ गूढवादी अशासारखा होतो, आणि तेथें स्पष्ट म्हटलें आहे कीं, अतिवाद्यानें आपण अतिवादी असल्याचें लपवूं नये. जर कोणीं त्याला म्हटलें कीं तूं अतिवादी आहेस तर त्यानें कबूल करावें कीं मी अतिवादी आहें. येथें 'अतिवादी' याचा 'गूढवादी' असाच अर्थ होऊं शकतो. Mystic ला अतिवादी हा चांगला शब्द दिसतो.

—का. का.

**पृष्ठ ५४—सरस्वतीचंद्र :** याच नांवाच्या प्रख्यात गुजराती कादंबरीं-तील कथानायक. याच्या मनामध्यें नेहमीं धर्माधर्माची 'भवति न भवति' चालत असे. जें योग्य आहे असें पटलें त्याप्रमाणें त्याच्या हातून आचरण घडत नसे. कांहीं अंशीं हॅम्लेटसारखी वृत्ति म्हणतां येईल.

—का. का.

## प्रकरण २० वें—

**पृष्ठ ७९—उत्सर्जन आणि उपाकर्म :** जुनें यज्ञोपवीत काढून टाकण्याचा आणि नवें धारण करण्याचा विधि. या विधीप्रमाणें वेदाध्ययनाचा प्रारंभ होत असे आणि ठरलेले दिवस पुरे झाले म्हणजे वेदाध्ययनाची सांगता करीत असत.

—का. का.

## प्रकरण २३ वें—

**पृष्ठ १०५—पर्युषण :** जैन लोकांच्या उपासाचे दिवस.

## प्रकरण ३२वें—

**पृष्ठ १४०--यदिच्छन्तो ब्रह्मचर्यं चरन्ति** : जें ब्रह्मचर्य पद अिच्छितात।

**पृष्ठ १४०--तेऽपि यान्ति परां गतिम्** : तेहि मोक्षास पावती।

**पृष्ठ १४०--महेंद्र आणि संघमित्रा** : असें सांगतात कीं अशोकाचा मुलगा 'महिंद' (महेन्द्र) आपल्या बहिणीला बरोबर घेअून लंकेमध्यें बुद्ध-धर्माचा प्रचार करण्यासाठीं गेला. जातांना त्यानें गया येथील बोधिवृक्षाची अेक फांदी लंकेमध्यें नेली आणि अनुराधापूर येथें तिची स्थापना केली. तो बोधिवृक्ष अजूनहि जिवंत आहे. अशोकाच्या बहिणीनें लंकेंत जो धर्मप्रचार केला त्यावरून तिचें नांव 'संघमित्ता' (संघमित्रा) पडलें असावें. या भाअूबहिणींनीं राज्य-वैभव सोडून संन्यासदीक्षा घेतली आणि लंकेचा अुद्धार केला 'दीपवंश' या पालीग्रंथांत यांचा अितिहास विस्तारानें दिला आहे.

—का. का.

**पृष्ठ १४१--शांता** : राजा दशरथाला राम, लक्ष्मण, भरत आणि शत्रुघ्न या प्रसिद्ध चार पुत्रांव्यतिरिक्त शांता नांवाची अेक मुलगी असल्याचा अुल्लेख वाल्मीकि-रामायणांत आहे.

## प्रकरण ३३वें—

**पृष्ठ १४३—देवशयन आणि प्रबोधन** : पावसाळ्याला सुरुवात आषाढ महिन्यापासून होते. पावसाळा सुरू होतांच देव निजतात म्हणजेच ढगांची चादर ओढून घेअून तारे अदृश्य होतात. पावसाळा कार्तिकांत संपतो, आकाश पुन्हां स्वच्छ होतें, शरदृतूंत आपल्या संपूर्ण वैभवानें तारे प्रकाशूं लागतात, तेव्हां देव अुठतात अशी रूपकात्मक कथा पुराणांत आहे.

## प्रकरण ३५वें—

**पृष्ठ १५०—अयनचलन** : पृथ्वीचा आंस नेहमीं अुत्तरध्रुवाकडे रोखलेला असतो हें जरी स्थूलमानानें खरें आहे तरी भोंवरा डुलावा त्याप्रमाणें पृथ्वी डुलून या आंसाची दिशा हळूहळू बदलते आणि २५००० वर्षांत ती मूळपदाला येते.

पृथ्वीचा आंस बदलल्यामुळें अुत्तरायण आणि दक्षिणायन यांच्यामधील संपातबिंदूहि बदलूं लागतात—मागें मागें सरूं लागतात. या गतीला ' अयनचलन ' असें म्हणतात.

या अयनचलनामुळें वेदकाळीं आकाशाची जी स्थिति होती ती आतां राहिलेली नाहीं. कधीं वर्षारंभ श्रवण नक्षत्रांत असावा, कधीं भाद्रपदांत येत असावा, कधीं रेवतींत, कधीं मृगामध्यें, अशा तऱ्हेनें स्थिति बदलत असल्यानें त्या त्या काळच्या वर्णनावरून तें वर्णन किती जुनें आहे हें ठरवितां येतें. मार्गशीर्ष महिन्यांत जेव्हां वर्षारंभ होत होता तो काळ किती जुना असावा हें गणितानें ठरवून लोकमान्यांनीं वेदकाल–निर्णय होण्यास मदत केली.

—का. का.

## प्रकरण ३८ वें—

**पृष्ठ १५६—घोडापूर** : गुजरातमध्यें डोंगरांच्या अनेक खिंडींतून येणाऱ्या लोंढ्यांनीं नदीचें पाणी अेकाअेकीं फुगलें म्हणजे नद्यांना केव्हां केव्हां असा कांहीं वेगाचा पूर येतो कीं नदीच्या पात्रांत जणूं पाण्याच्या दोन पायऱ्याच झाल्या आहेत असें दिसूं लागतें. जेथें गुडघाभरदेखील पाणी नाहीं असें दृश्य असावें तेथें अेकाअेकीं नदी दुथडी भरून वेगानें वाहूं लागते. या वेगाची कल्पना येण्यासाठीं असें सांगतात कीं जर अेखादा मनुष्य नदीला पाणी नाहीं म्हणून वाळवंटांतून घोड्यावर बसून जात असला आणि अर्ध्यावर गेला असला तर वरून लोंढा दिसतांच घोड्याला टांच मारून देखील तो सुरक्षितपणें पैलतीरीं पोचूं शकत नाहीं. घोडा आणि घोडेस्वार दोघांना बुडवून लोंढा पार पुढें जातो अशीं अुदाहरणें अनेकवेळां घडलीं आहेत. म्हणून अशा वेगाच्या पुराला ' घोडापूर ' म्हणतात. या पुरापुढें होड्यासुद्धां वांचूं शकत नाहींत. पाणी हळूहळू वाढलें तर होड्या तरंगूं लागतात. पण अेकाअेकीं लोंढ्याची पायरी आली म्हणजे होड्यांचा त्या पायरीखालीं बळी घेतला जातो. ' घोडापूर ' हा शब्द मराठींत घेण्यासारखा आहे. याचीच अतिशयोक्ति करून ' हाथीपूर ' ( हत्तीपूर ) हाहि शब्द गुजरातींत वापरला जातो.

—का. का.

## प्रकरण ४६वें—

**पृष्ठ १९८–जें काम व्यास–वाल्मीकींनीं केलें:...आणून केलें:** वेदधर्म आणि वेद फक्त द्विजांसाठीं आहेत असें ठरल्यानंतर ज्या मार्गांत अधिकार भेदाची पीडा नाहीं. असा मार्ग अितिहास–पुराणें लिहून व्यासवाल्मीकींनीं चालविला पौराणधर्मांत ब्राह्मण–ब्राह्मणेतर, आर्य–दस्यू सर्वांनाच सारखा प्रवेश होता. वर्णाश्रमाला यत्किंचित् विरोध न करतां, किंबहुना, वर्णाश्रमाला अुचलून धरूनहि व्यासवाल्मीकींनीं सामान्य जनतेच्या अुद्धाराचा मार्ग दाखविला. अधिकारभेद आणि वर्णजातींचा अुच्चनीच भाव हे सर्व ब्राह्मणी दृष्टीचे प्रकार आहेत. त्यांना गौणत्व आणण्याचें काम पूर्वी जसें व्यास–वाल्मीकींनीं केलें, तसें अर्वाचीन काळीं महाराष्ट्रामध्यें ज्ञानदेव आणि अेकनाथ यांनीं केलें. व्यास–वाल्मीकी ऋषी होते. पण ब्राह्मण नव्हते. त्यांना ब्राह्मणांच्या मक्तयाविषयीं थोडासा असंतोष असणें शक्य होतें. ज्ञानेश्वर आणि अेकनाथ ब्राह्मण असून संत होते. त्यांना ब्राह्मणांच्या अधिकाराचें वैषम्य वाटण्याचें कारणच नव्हतें; तरीहि त्यांनीं वर्णधर्माला विरोध करून संतमताचाच प्रचार केला, हें विशेष आहे.

—का० का०

## प्रकरण ४८वें—

**पृष्ठ २०२—शिया आणि सुन्नी :** मुसलमानांतील हे दोन प्रमुख ‘फिर्के’ ( संप्रदाय ) आहेत. ते विशेषेंकरून खलीफा कोणाला मानावयाचें या प्रश्नावरून पडले आहेत.

**शिया**—हे हजरत अबूबकर, अुमर आणि अुस्मान यांना खलीफा मानीत नाहींत. ते हजरत आलींना पहिला खलीफा मानतात आणि त्यांच्यामागून त्यांच्या वंशांतील दुसऱ्या अकरा लोकांना खिलाफतीचे हक्कदार व अिमाम[१४]( धार्मिक नेते ) समजतात. खुदानें हजरत महंमदसाहेबांमध्यें जें आपलें तेज ओतलें होतें तेंच तेज हजरत अली आणि त्यांचे वंशज यांच्यांत प्रविष्ट झालें, अशी त्यांची श्रद्धा आहे. म्हणून त्यांनाच अिमाम होण्याचा हक्क आहे असें ते म्हणतात. हजरत आली हे पहिले व त्यांच्याच वंशांतील बारावे हजरत अबुल कासीम उर्फ मेहदी असे बारा

अिमाम झाले असें शिया लोक मानतात. शेवटचे अिमाम अजून जिवंत आहेत असा त्यांचा समज आहे.

**सुन्नी**--बहुतेक मुसलमान या संप्रदायाचे आहेत. हे लोक कुराणशरीफ, सुन्नत व अिजमा ( महाजनमंडळाचा निर्णय ) यांना धर्माचा पाया समजतात. हजरत महंमदसाहेबांच्या मागून हजरत अबूबकर, अुमर, अुस्मान आणि अली यांना ते खलीफा मानतात. हजरत अली आणि त्यांचे वंशज यांच्याविषयीं सुन्नी लोक आदर बाळगतात ; पण त्यांना ते ' अिमाम ' समजत नाहीत.

## प्रकरण ५२वें—

**पृष्ठ २१९ — पोटावर...उभें झालें**: जनरल डायरनें अमृतसरला जे अत्याचार केला त्यावेळची गोष्ट आहे. लोकांनीं अेका मिशनरी बाअीला रस्त्यांत त्रास दिला म्हणून त्या रस्त्यानें जाणाऱ्या लोकांनीं अुभ्यानें न चालतां पोटानें सरपटत गेलें पाहिजे असा सरकारी अंमलदारांनीं हुकूम काढला होता आणि लोकांनींहि असहाय्य होअून त्याचें पालन केलें. पण पुढें सत्याग्रहाच्या चळवळीनें ही मनोवृत्ति मावळली आणि लोकांत तेजस्विता आली.

—का. का.